# अभिप्राय.



श्रीयुत राजमान्य राजश्री जगन्नाथ रावजी टुल्लू, बी. ए., यांनीं लिहिलेला, ' अर्वाचीन महाराष्ट्र ' हा ग्रंथ मीं बहुतेक वाचला. इ. स. १८१७ पासून इ. स. १९११ अखेरपर्यंत महाराष्ट्रांत ( जेथें जेथें मराठी भाषा प्रचलित आहे, त्या त्या हिंदुस्थानांतील प्रांतांत ) घडून आलेल्या राजकीय, सामाजिक, नैतिक, धार्मिक व शिक्षणविषयक ठळक ठळक घडामोडींची संक्षिप्त माहिती कालक्रमानें प्रस्तुत पुस्तकांत संगृहीत केली आहे. माझ्या पाहण्यांत अशा प्रकारचा हा पहिलाच प्रयत्न आहे. याला इतिहास असें मोठें नांव न देतां आलें, तरी भावी इतिहासकाराला रा० टुल्लू यांनीं मोठ्या मेहनतीनें व शोधक बुद्धीनें केलेल्या या ग्रंथाचा फार उपयोग होईल यांत संशय नाहीं. आपल्या विधानांच्या पुष्ट्यर्थ रा० टुल्लू यांनीं जागजागीं टीपांतून आधार दिलेले आहेत. असल्या आधारांवरून त्यांनीं जीं कोठें कोठें अनुमानें काढिलीं आहेत, तीं सर्वच सर्वांशीं सर्वांना मान्य होतील असें नाहीं. तथापि, आपलीं मतें साधारपणें, स्पष्टपणें व निस्पृहपणें नमूद करण्याचा त्यांचा प्रयत्न प्रशंसनीय आहे असें मला वाटतें. इतिहासकाराला लागणारी सत्यप्रियता व सहृदयता हे गुणही रा० टुल्लू यांच्या ठिकाणीं वास करीत आहेत, असें त्यांच्या प्रस्तुतच्या ग्रंथावरून दिसून येतें. एकंदरींत ' अर्वाचीन महाराष्ट्र ' हा ग्रंथ वाचनीय व संग्राह्य आहे, असें माझें मत आहे.

पुणें,<br>ता० २६।१२।१३.

लक्ष्मणशास्त्री लेले.

# अर्वाचीन महाराष्ट्र.

( १८१७–१९११. )

सुप्रसिद्ध आधुनिक इतिहासकार मिस्टर
जस्टिन मॅकार्थी एम्. पी.,
यांचा
' आपल्या काळचा इतिहास, '
या सर्वमान्य ग्रंथाच्या धर्तीवर पण अल्प प्रमाणावर, जगन्नाथ
रावजी टुल्लु ( ग्वालियर स्कॉलर ), बी. ए., नृसिंहप्रसाद हरिप्रसाद
बुच् मेटॅफिझिक्स् प्राइझ्मन् ( बनारस ), संस्कृतभाषेचे
माजी अध्यापक, इसाबेला थोबर्न स्त्रियांचें
फर्स्टग्रेड कॉलेज ( लखनौ ); इंग्रजी
भाषेचे माजी अध्यापक, हिंदु-
कॉलेज ( दिल्ली ); व ' मराठी
भाषेचा इतिहास ' कर्ते
यांनीं लिहिला.

पुणें, १९१४.
आवृत्ति पहिली.
किंमत १२ आणे.

## विरुदावलि.

( १ ) ' आत्मैव ह्यात्मनो बंधुरात्मैव रिपुरात्मनः ' ।

—भगवद्गीता ।

No ordinary misfortune, no ordinary mis government will do so much to make a nation wretched, as the constant progress of physical knowledge & the constant effort of every man to better himse f will do to make a nation prosperous. '—Macaulay's *History of England* ( Ch III )

( २ ) ' न बुद्धिभेदं जनयेदज्ञानां कर्मसंगिनाम् ' ।

—भगवद्गीता ।

' यद्यपि शुद्धं लोकविरुद्धं नाकरणीयं नाचरणीयम् ' ।

—मोहमुद्गरः ।

' अपि शास्त्रेषु कुशला लोकाचारविवर्जिताः ।
सर्वे ते हास्यतां यान्ति यथा ते मूर्खपंडिताः ' ॥

—पंचतन्त्रम् ।

' It is to be remembeed that even a just goverument is not a blessing, if at variance with the habits & character of the people '.

—Mr Chaplin, I. C. S., Commissioner of the Dekkan ( cited by Cox in his *Short Histroy of the Bombay Presidency,* ' p. 568 ) .



# अर्पणपत्रिका.



कै० वा० रावसाहेब रावजी वासुदेव टुल्लु
एम्. ए. ( भगवानदास संस्कृतस्कॉलर )
एल्एल्. बी, सुपरिंटेंडंट, स्टेट
एज्युकेशन ( इंदूर ),

यांस

ज्यांनीं संस्कृत-आंग्ल-वाङ्मयपदीं सर्वस्व अर्पीयलें;
ज्यांनीं ‘ होल्करवंश ’ काव्य लिहुनी, सुज्ञांस संतोषिलें;
ज्यांनीं बंधु गणोन्नतिप्रद कृती अल्पायुषीं साधिली;
त्या मत्पूज्यपित्यांस अर्पित असे ही प्रेमपुष्पांजली !

# प्रस्तावना.

[1]नीचैर्गच्छत्युपरि च दशा चक्रनेमिक्रमेण ।

—मेघदूतम् ।

१९०९ च्या एप्रिल महिन्यांत, सुरतच्या ' सार्वजनिक हायस्कुलां ' तील ७ व्या इयत्तेस ' इतिहास ' हा विषय शिकवीत असतां, एके दिवशीं माझ्या मनांत असें आलें कीं, कैलासवासी न्यायमूर्ति रानडे यांचे अंतकाळचे आवडते इतिहासकार, जस्टिन मॅकार्थीसाहेब, एम्. पी., यांस जर ' आपल्या काळचा इतिहास ' सविस्तर व सोपपत्तिक लिहून, ग्रीनसाहेबांसारख्या दुसऱ्या अर्वाचीन इतिहासाविषयीं शंकित अशा नामांकित इतिहासकाराचें समाधान करितां आलें; तर, आपणांसहि ' अर्वाचीन महाराष्ट्रा ' चा इंग्रजी अमदानींतील संक्षिप्त परंतु बोधप्रद इतिहास लिहितां येईल.

परंतु, या कामास लागणारी फुरसत शाळेसारख्या काचाच्या नोकरींत सांपडत नव्हती. प्रभुकृपेनें, ही अडचणहि दूर होण्यास वेळ लागला नाहीं. १९०७।०८ सालीं, अयोध्याप्रांतांतील ज्या राजकुमारांचा मी शिक्षक होतों, त्यांपैकीं मधल्या लाल कोसलेंद्र प्रतापानें आपल्या पित्याकडून ' मुधोळ संस्थानां ' ( दक्षिण महाराष्ट्रां ) तील हेडमास्तराच्या जागेवरून जुलैच्या अखेर मला आमंत्रण करविलें. या पुनरुपलब्ध सुखाच्या स्थळीं येऊन नीट जम बसल्यावर, मीं सेप्टेंबर महिन्यांत ' अर्वाचीन महाराष्ट्र ' म्हणून एक १० फ्रेंच तावांचा इंग्रजी निबंध लिहून, ' ईस्ट अँड वेस्ट ' या

---

१ दशा ही, चाकाच्या धावेप्रमाणें, खाली वर जात असते !

मुंबईच्या वजनदार मासिकपुस्तकाच्या संपादकांकडे प्रसिध्यर्थ पाठविला. परंतु, तो त्यांस योग्य न वाटल्यामुळें, त्यांनीं तो मजकडे परत केला.

तरी, ' छिन्नोऽपि रोहति तरुः '[1] या न्यायानें, निराश न होतां, मीं त्या दिशेनें आणखी प्रयत्न केला. सुमारें २००।२५० पृष्ठांचा एक हस्तलेख तयार करून, त्यास एक इंग्रजी कविताबद्ध अर्पणपत्रिका जोडून, गेल्या वर्षांच्या ' दीपग्राम ' या मराठी स्वतंत्र लघुकाव्याप्रमाणें, राणीसाहेबांसारख्या सुशिक्षित, कुलीन स्त्रीरत्नाच्या आश्रयार्थ, सदहू लाल कोसलेंद्रप्रतापाहस्तें पाठविला. पण, राणीसाहेबांचे ज्येष्ठ चिरंजीव लाल अवधेंद्रप्रताप यांची प्रकृति उन्मादानें अस्वस्थ असल्यामुळें, राणीसाहेबांचें मन उद्विग्न होतें. त्यामुळें, उद्दिष्ट आश्रयाचा योग आला नाहीं.

तरी, हताश न होतां, लंडन येथील ग्रंथकारांचे एजंट, मिस्टर ए. एम्. बर्जेस् ( ३४ पॅटरनॉस्टर स्ट्रीट ) यांस रु० ७५ कमिशन-दाखल अगोदर भरून, तो हस्तलेख त्यांकडे डिसेंबरमध्यें रवाना केला.

मेसर्स जॉन ओस्ले अँड कंपनीला तो पसंत पडून, तो छापून बाहेर पडण्याचा बहुतेक योग आल्यासारखा दिसला. परंतु, सदहू प्रकाशकांनीं जेव्हां छपाईतील रु० २२५०–रु०, १५००–रु०, ७५० येथवर खर्चाची रक्कम मागून, शि. ७ पे. ६ किंमतीच्या पुस्तकावर जो नफा होईल, त्यांपैकीं शेंकडा १५ टक्के मालकी हक्का-बद्दल देऊन, पुढील आवृत्तीवेळीं कांहीं एक खर्च न घेतां, तशीच मालकी हक्काबद्दल रक्कम देत जाण्याची गोष्ट काढली; तेव्हां माझें निष्कांचनत्व तिला आडवें आलें.

मध्यंतरीं, राजकुमारशिक्षकाची जागा, राजेसाहेबांच्या एकतर्फी

---

१ ' कीं तोडिला तरु फुटे ' ( वामनपंडित ).

शासनपद्धतीमुळें, मला सोडावी लागली. या प्रसंगींहि प्रभुकृपा अशी झाली कीं, १९००ते१९०७ पर्यंतच्या ' ग्रंथमालें ' (कोल्हापूर ) तील लेखांनीं माझ्या परिचयाची उत्कट इच्छा प्रदर्शित करणारे, लाल कोसलेंद्रप्रताप यांचे कॉलेजबंधु, रा० नारायण बळवंत पडते एम्. ए., ( आतां एल्एल्. बी. होऊन, बडोदें संस्थानांत मुनसभ झालेले ) यांनीं लखनौ येथील, ' इसाबेला थोबर्न स्त्रियांचे फर्स्ट ग्रेड कॉलेजां ' त संस्कृत प्रोफेसरची जागा मला देवविण्याचा योग आणिला. या ठिकाणीं, वरील शिक्षकाच्या जागेप्रमाणें, तीन तास शिकविण्याचें काम असल्यामुळें, प्रस्तुत इंग्रजी हस्तलेखाच्या प्रतिकृतीकडे लक्ष्य देण्यास फावलें. व मराठी प्रतिकृति स्वतंत्र छापावी किंवा प्रकाशकास द्यावी असा जो प्रश्न राजेसाहेबांकडे असतां मी सोडवूं पहात होतों, त्याच्या गडबडींत, मला प्रभुकृपेनें बढतीची दिल्ली येथील ' हिंदु कॉलेजां ' तील इंग्लिश प्रोफेसरची जागा, नंतर आणखी बढतीची खजूरगांव ( अयोध्याप्रांत ) येथील राजकुमाराशिक्षकाची जागा, नंतर नागपूरकडील खासगी शिक्षकाची जागा अशा जास्त फुरसतीच्या जागा मिळून, शेवटल्या अरण्यवासाच्या जागेस हिंवतापाच्या जबर सांथीमुळें कंटाळून, पुन्हा शाळेच्या काचाच्या कामांत निरुपायानें डोकें खुपसावें लागलें ! अशा अनिष्टस्थितींतहि अंगीकृत कार्यास न विसंबतां, ' अर्वाचीन महाराष्ट्र ' च्या हस्तलेखाची पुष्कळ सुधारणा करून, प्रस्तुत प्रयत्न संकेतानुरूप संक्षिप्त परंतु जितका बोधप्रद होईल तितका केला आहे. इतिहासासारख्या व्यापक विषयाची अटकळ येण्यास, त्याप्रमाणें साहित्य जुळविण्यास, व जुळविलेलें साहित्य मनोरंजक भाषेंत व्यक्त करण्यास,

मजसारख्या साधारण व्यक्तीस एवढी यातायात पडली आहे. तरी, ही अल्प परंतु स्वतंत्र रचना इतिहाससागरांत जरी बिंदुसदृश अशी वाटली, तरी तेवढ्यांत समाधान मानण्यास पुष्कळ जागा आहे.

ही अल्प प्रस्तावना पूर्ण करण्यापूर्वी, पुस्तककर्त्याच्या अनेक कर्तव्यांपैकीं अग्रगण्य असें एक करण्याचें राहिलें आहे. माझ्या पूर्वाश्रमींच्या हितेच्छूंतील बहुमान्य विद्वद्रत्न व सुप्रसिद्ध ग्रंथकार रा० ब० चिंतामण विनायक वैद्य, एम्. ए. एल्एल्. बी, माजी चीफ् जस्टिस्, ग्वाल्हेर संस्थान, यांनीं प्रस्तुत कृतीकरितां आपला अमोल वेळ खर्चून, तिच्या शुद्धीकरणार्थ ज्या अनेक मार्मिक व उपयुक्त सूचना केल्या, त्यांतील ज्या ज्या इष्ट व शक्य वाटल्या , त्यांचा मी अत्यंत आभारपूर्वक स्वीकार केला आहे. तसेंच, हा नवीन प्रयत्न प्रसिद्ध करून, 'क्लेशः फलेन हि पुनर्नवतां विधत्ते' या कविवचनानुसार, मजसारख्या सामान्यव्यक्तीस प्रोत्साहन देणारे चित्रशाळेचे अधिपति रा० वासुदेवराव जोशी व प्रुफें नजरेखालून जाऊं देणारे व्ययसायबंधु रा० गोविंद पंढरिनाथ शिदोरे बी. ए. ( इतिहासविषयाचे शिक्षक ) व वे० शा० सं० लक्ष्मण गणेश शास्त्री लेले ( सुप्रसिद्ध कवि, टीकाकार व संस्कृतशिक्षक ) यांचेहि मनःपूर्वक आभार मानणें उचित आहे. या जोडीपैकीं शेवटल्यांचे उपकार विशेष आहेत. त्यांनीं बंधुप्रेमास शोभतील अशा सूचना करून, साहित्यांतील व्यंगें दूर करण्यास मला अमोल साहाय्य केलें आहे. ही सहानुभूति अनेक पृष्ठें हाणून पाडणारी टीका लिहून, प्रस्तावनेंतील गोष्टींचें विस्मरण सुचविणाऱ्या एकतर्फी टीकाकारबंधूंच्या कृतीपेक्षां किती उच्चप्रतीची आहे, हें सुज्ञांस नव्यानें सांगणें नलगे.

नूतन मराठी विद्यालय, पुणें, ता० २५ डिसेंबर १९१३. **ज० रा० टु०**

# विषयप्रवेश.



**इतिहासोत्तमादस्माज्जायन्ते कविबुद्धयः ।**
**पंचभ्य इव भूतेभ्यो लोकसंविधयस्त्रयः ॥**

—महाभारतम् ।

2 ' Histroy is the biography of a political society ' --Dr Arnold ' s *Introductory Lectures on Modern History.*

१८७५ त, रा० रावजी सदाशिव गोडबोले यांना मुंबई इलाख्यांतील शाळाखात्याच्या अधिकाऱ्यांकडून, त्या वेळीं चालू असलेल्या ' महाराष्ट्रदेशाचें वर्णन व इतिहास ' या प्रश्नोत्तरावलिरूप पुस्तकाऐवजीं त्याचें स्वरूप बदलून, त्याच विषयावर दुसरें पुस्तक लिहिण्याचा हुकूम झाला. त्याप्रमाणें, सदर्हू गृहस्थांनीं ' महाराष्ट्रदेशाचा संक्षिप्त इतिहास ' हें पुस्तक लिहिलें. त्याचे दोन भाग आहेत. पहिल्यांत, महाराष्ट्रदेशाचा प्राचीन ( म्हणजे इ० स० च्या १७ व्या शतकापूर्वीचा ) इतिहास, व दुसऱ्यांत अर्वाचीन ( म्हणजे इ०स० च्या १७ व्या शतकापासून १९व्या शतकाच्या पहिल्या १८ वर्षांपर्यंतचा ) इतिहास, असे संक्षिप्त रूपानें आले आहेत. म्हणजे पहिल्यांत शिवाजीवंशाचें वर्णन आलें आहे, व दुसऱ्यांत पेशवे-

---

१ ' पंचमहाभूतांतून निघणाऱ्या तीन लोकांप्रमाणें, या उत्तम इतिहासांतून कवींच्या व विद्वानांच्या कल्पना निघतात. ' २ ' इतिहास म्हणजे नृपाधिष्ठित समाजाचें चरित्र होय. '

वंशाचें वर्णन आलें आहे; व या दोन्ही भागांस मुख्यत्वकरून ग्रँट डफ्साहेबांच्या सुप्रसिद्ध ' मराठ्यांच्या इतिहासा ' चा आधार घेतला आहे. सरकारचा आश्रय असल्यामुळें, प्रस्तुत पुस्तकाच्या अनेक आवृत्ती निघून, महाराष्ट्राच्या इतिहासाची लहान मुलांमुलींना ओळख करून देण्याचें श्रेय रा० गोडबोले यांनीं संपादन केलें आहे.

परंतु, पुढील मजल मारण्याचें काम आजवर झालेलें नाहीं. यास कारण असें दिसतें कीं, दुसरे एखादे ग्रँट डफ्साहेब जन्मास येते, तर त्यांच्या कृतीची वरीलप्रमाणें प्रतिकृति निर्माण होऊन, सरकारच्या आश्रयानें शाळाखात्यांत विराजमान होऊन, आजला जुनीपुराणी होऊन बसली असती. तें कसेंही असो, पुढील मजल मारण्याचें साहस आजपर्यंत झालें नाहीं, म्हणून पुढेंही होऊं नये हें मात्र अयोग्य आहे. आपण ज्या नवीन राज्यछत्राखालीं प्रभुकृपेनें नांदत आहों, तें कसें आहे याची कल्पना आपणांस येणें अवश्य आहे; तसेंच, या नवीन परिस्थितीचें पर्यवसान कशांत होत आहे, याचा अदमास होणें हेंहि उचित आहे. पूर्वीच्या मराठींतील शिलेदारी व मुत्सद्दीगिरी यांचा जर कांहीं शेष मराठीनंतर राहिला असेल, तर त्यांस जोम येण्यास कितपत वाव आहे; सुधारलेल्या पाश्चात्यांच्या शिक्षणानें व संसर्गानें आपली उन्नति कोणकोणत्या दिशांनीं कसकशी होत आहे: इत्यादि महत्त्वाच्या प्रश्नांनीं विद्यार्थ्यांची घाबरगुंडी उडून जाऊं नये, त्यांचा संसारप्रवेश सुखानें व्हावा, हें देशाच्या भावी स्वास्थ्यास हितावह आहे. समुद्रावर नौकानयन करूं पाहणाऱ्या तरुण नाविकास समु-

---

१ अलीकडे ' आनंद ' कार रा० वासुदेव गोविंद आपटे, बी. ए. यांनीं महाराष्ट्राचा बालबोध इतिहास ' लिहून, तेथपर्यंतच मजल मारिली आहे.

द्राच्या पृष्ठभागावरील तरंगत असणारीं पाषाणसूचक चिन्हें, दीप-गृह, ऋतुमान, वायुगति, आकाशचित्र इत्यादींचें ज्ञान इष्ट असतें, तशीच स्थिति, कांहीं अंशीं, गृहस्थाश्रमांत पाऊल टाकणारांची असते. त्यांस तत्संबंधीं सावधान राखणें हें प्रत्येक अनुभवी देश-भक्ताचें व प्रजापालकाचें उदात्त कर्तव्य होय.

अशा कल्पनेंतच प्रस्तुत अल्प प्रयत्नाचें बीज आहे. त्यांतील कोणतेंही प्रकरण वरवर चाळणारासहि कर्त्याचा हेतु दिसून आल्या-शिवाय राहणार नाहीं. ' मागच्यास ठेंच, पुढचा शाहणा ' व ' बत्तीस ठेंचा खाशील, तर बत्तीस लक्षणी होशील ' हें शहाण-पणाचें जुनें धोरण ठसठशीत दिसण्याकरितां, जेवढें वर्णन करणें अवश्य वाटलें, तेवढें करण्यांत कसूर केलेली नाहीं. उदाहरणार्थ, ' भयंकर उत्पात ' ( १८५७—५८ ), ' गायकवाडांवरील संकट ' ( १८७५ ), ' शेतकऱ्यांचे दंगे ' ( १८७६ ): या प्रकरणांत पूर्वपक्ष व उत्तरपक्ष या दोहोंतून सत्यनिर्णय करून, कालमहिमा दाखविण्याची इतिहासनीति अनुसरलेली आहे. भूगोलात्मक ज्ञाना-करितां आरंभीं नकाशे, व ऐतिहासिक नटांची ओळख पटविण्याक-रितां योग्य स्थळीं शक्य तितके उपलब्ध चित्रपट घातलेले आहेत. विशेष माहितीकरितां, जागोंजाग टिपा दिलेल्या आहेत. प्रस्तुत विषयाचा व्यासंग करूं पाहणारास उपयुक्त असें सूचीपत्र, पुस्तकरचनेनंतर उपलब्ध झालेलीं व त्याची सांगता सिद्ध करूं पाहणारीं परिशिष्टें व प्रश्नावलि हीं शेवटीं जोडिलेलीं आहेत.

अशा नवीन सृष्टींत दोषस्थलें असतील. त्यांचा विचार, दुसऱ्या आवृत्तीचा सुयोग आल्यास, होईल हें निराळें सांगणें नलगे. पण, ह्या कृतींतील गुणलेश गुणज्ञांच्या ध्यानांत यावा एवढीच त्या

विघ्नहर्त्या दयाघनास अनन्यभावानें प्रार्थना आहे. ती त्यानें ऐकिली, म्हणजे मित्रवर्य व्यवसायबंधु व सुप्रसिद्ध कवि, रा० बाळकृष्ण अनंत भिडे, बी. ए. ( हेडमास्तर, सर सिद्दी अहमदखान हायस्कूल, मुरूड–जंजिरा, व माजी संपादक ‘ काव्यसंग्रह, ’ मुंबई ), यांची पुढील उक्ति[1] सार्थ होईल—

‘ तत्व तव सखा, सुकविता सखी:
दोन हीं तुला स्वासुसारखीं ।
सदितिहास हा बंधु तुज भला
निश्चयामुळें आज लाभला. ’ ॥

---

१ मुरूड–जंजिरा येथून, ता० १६–१–१९१० ला पुस्तककर्त्यास पाठविलेल्या कविताबद्ध पत्रांतील शेवटला श्लोक.

या अगोदरचा आशीर्वाद श्रीमती रमाबाई रानडे यांचा होय. तो येणेंप्रमाणें:— ‘ आपण अर्वाचीन इतिहास लिहिण्याचा विचार मनांत आणिला आहे हें वाचून संतोष वाटला. हें काम आपल्या हातून चांगलें पार पडेल यांत संशय नाहीं. पुस्तक बाहेर पडल्यावर वाचण्याची इच्छा आहे. ’ ( पुणे, जास्टिस रानडे यांचा वाडा, १८–१०–१९०९. )

# मुख्य आधारभूत पुस्तकें
## व
## ग्रंथ.

### ( मराठी. )

१. पेशव्यांची बखर.
२. दुसरे बाजीराव पेशवे यांची रोजनिशी.
३. अनाचारदुष्परिणाम.
४. ऐतिहासिक गोष्टी.
५. ग्रंथमाला ( १९००–१९०१ ).
६. इतिहाससंग्रह (१९०८-१९०९).
७. बाळशास्त्री जांभेकर यांचे चरित्र.
८. अक्कलकोटचे स्वामी ,,
९. माणिकप्रभू ,,
१०. यशवंतमहाराज ,,
११. झांशीसंस्थानच्या महाराणी ,,
१२ रावराजे दिनकरराव ,,
१३. उमाजीनायकाचा पोवाडा.
१४. विष्णुभट्ट गोडसे यांचा प्रवास.
१५. वासुदेव बळवंत फडके यांच्या बंडाची धामधूम.
१६. तंट्या भिल्लाचें चरित्र.
१७. श्रीमंत सयाजीराव महाराज गायकवाड यांचें चरित्र.
१८. विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचें चरित्र
१९. डॉ० आनंदीबाई जोशी यांचें चरित्र.
२०. आमच्या आयुष्यांतील कांहीं आठवणी.

### ( गुजराथी. )

२१. नामदार न्यायमूर्ति रानडे एमनुं संक्षिप्त जीवनचरित्र.

### ( हिंदी. )

२२. सरस्वती ( १९०१–१९०४ ).

### ( उर्दू. )

२३. श्रीमान् महादेव गोविंद रानडे और उनका काम.

### ( बंगाली. )

२४. बोम्बाई–चित्र.

## ( इंग्रजी. )

25. Last of the Peshwa.
26. Letters from a Mahratta Camp.
27. History of the Political and Military Transactions of the Marquis of Hastings ( 1813-23. )
28. Memoir of the Mahratta War ( 1817--19 )
29. History of the Mahrattas.
30. Introduction to the Diaries of the Peshwas.
31. Life of Elphinstone. ( Cotton ).
32. Life of Elphins tone ( Cole brooke )
33. Selections from the Official Writings of Mt. S. Elphinstone.
34. Life of Sir John Malcolm.
35. Travels in Western India ( 1835 )
36. The Three Presidencies of India ( 1853 )
37. History of the Indian Mutiny. ( Mallison )
38. History of the Sepoy War ( Kaye )
39. Story of Cownpore.
40. Selection from Letters, Despatches and State Papers ( 1857-58 )
40. An Unrecorded Chapter of Indian Mutiny.
42. Collections of Treaties &c. ( 1863 )
43. Chapters on Modern History of British India.
44. Short History of the Bombay Presidency.
45. Prince of Wales's Tour.
46. India in 1880.
47. Oriental Experience.
48. Princes & Chiefs of India.
49. Marathas and Dekkani Mussalmans.
50-62 Bombay Administration Reports ( 1886-96, 1898--1900 )
63. Writings & Speeches of the Hon'ble Rao Saheb V. N. Mandlik C. I. E.
64. Speeches of the Hon Sir. Phiroz Shah Mehta Kt M.A., Bar-at-Law. C.I.E.

# याच कर्त्याच्या इतर कृति.

## गद्य.

' **मातृपितृसंबंधः** ' ( पृ० १२२ )–' ग्रंथमालें ' तून प्रसिद्ध झालेला व ' डे० व्ह० ट्रॅ० सोसायटी ' ( पुणें ) नें बक्षिस दिलेला नीतिपर निबंध ( १९०६ ). रु० १

' **मराठीभाषेचा इतिहासः** ' ' ग्रंथसंपादक व प्रकाशक मंडळी ' ( मुंबई ) नें पसंत करून, छापावयास घेतलेला ग्रंथ ( १९१२ ).

## पद्य.

' **चार कळ्या** '–' डे० व्ह० ट्रॅ० सोसायटी ' ( पुणें ) नें बक्षिस दिलेलें, मेहरबान सी. एच्. कँडी ( वऱ्हाडप्रांताचे डायरेक्टर ) यांनीं व रावबहादुर प्रधान ( जंजिरासंस्थानचे कारभारी ) यांनीं बक्षिसाकरितां मंजूर केलेलें कवितेचें पुस्तक ( १९०१ ). ०॥=

' **स्वामी विवेकानंद** '–मेहरबान अलेक्झँडर मन्रो ( नागपूरप्रांताचे डायरेक्टर ) यांनीं बक्षिसाकरितां व पुस्तकालयाकरितां मंजूर केलेलें, व बडोदें, इंदूर, देवास ( छोटी व मोठी पाती ), धार, सांवतवाडी, जमखंडी, कुरुंदवाड ( मोठी पाती ), बावडा, जत,

रामदुर्गः या संस्थानांनीं आश्रय दिलेलें लघुकाव्य
( १९०२ ). { कापडी प्रत ०।= साधी- ⁄=

' **सुमनमाला** '–पुष्प १ लें ( ' अकबर, ' ' शिवाजी, ' ' रणजितसिंह, ' ' व्हिक्टोरिया, ' व ' तडित्तेज '
( १९०६ ). { का० प्र० ·।।· साधी- ·।·

' **सुमनमाला** '–पुष्प २ रें ( धर्म ). यास ' दक्षिणाप्राइझ कमेटी ' नें बक्षिस दिलेलें आहे ( १९०६ ). ⁄=

' **सुमनमाला** '–पुष्प ३ रें ( दीपग्राम ). देऱ्याच्या राणीसाहेबांच्या उदार आश्रयाखालीं प्रसिद्ध झालेलें लघुकाव्य ( १९०८ ). ⁄=

वरील बहुतेक पुस्तकें मिळण्याचें ठिकाणः रा० शंकर गोविंद दुल्लु यांकडे ( घर नं० ११, धसवाडी, ठाकुरद्वार, काळबादेवी पोस्ट, मुंबई ).



# कांहीं ठळक अभिप्राय.



( १ ) ‘ **मातृपितृसंबंध** ’ या पुस्तकाच्या पहिल्या दोन पृष्ठांवर दिलेल्या ३२ ग्रंथांतून घेतलेलीं भाषांतरात्मक व मूळ अवतरणें असून, त्यांत पुस्तककाराचे स्वताचे विचारहि मधून मधून आलेले आहेत. तरी, त्यांत नीतिपर सिद्धान्त अनेक प्रतिपादिलेले आहेत. म्हणून, महाराष्ट्रांतील तरुण वाचकांस तें पुष्कळ उपयोगी होईल. ’ ( भाषांतर )–डे० व्ह० ट्रॅ० सोसायटी ( पुणें ), १९०७–०८ चा वृत्तान्त.

‘ मृदुल अनाघ्रात परी साध्या ज्या अर्पिल्यास, ‘ **चार कळ्या** ’।
त्या मुग्धकन्यकांसम हर्षाच्या उठविती मनीं उकळ्या ! ’ ॥

–रा० बाळकृष्ण अनंत भिडे बी. ए. , माजी संपादक,
‘ काव्यसंग्रह ’ ( मुरूड–जंजिरा, २–१–०१ ).

( ३ ) ‘ **विवेकानंद** ’ स्वामींच्या चरित्रांतील बहुतेक महत्त्वाच्या प्रसंगांचें वर्णन निरनिराळ्या वृत्तांत केलेलें आहे, व तें विद्यार्थ्यांनीं वाचण्याजोगें आहे.–केसरी ( पुणें, १३–४–०६ ).

( ४ ) ‘ **सुमनमाला** ’–पुष्प १ लें. ‘ कविता सरळ व गोड अशा झाल्या आहेत. ’–काळ ( पुणें, १३–४–०६ ).

( ५ ) ‘ **सुमनमाला** ’–पुष्प २ रें. ( धर्म )–‘ भाषा सरळ व विचार गंभीर आहेत. ’–केसरी ( पुणें, ३–७–०६ ).

( 6 ) ' Your short but sweet poems have made a valuable & solid addition to Marathi poetry. You have assuredly given a promise of ' being a great Marathi poet ' to your countrymen. May God give you long life to fulfil it ! If the book, *Kavya dohan*, fortunately goes through its 2 *nd* edition, I shall fully avail myself of your poetic field ' ( Letter from the Compiler of *Kavyadohan*, Mr. K. P. Limaye B. A, Poona, 23 *rd* Dec. '07 ).

( 7 ) In his short poems, Mr Tullu has given almost all important events. The vocabular very large. Also, Mr. Tullu has Marathified many Urdu & other foreign words. On the whole, the poems are sweet and smooth. This attempt of Mr. Tullu in the service of Marathi Literature should not pass without a word of commendation; as, it shows something more than the common capacity for mere translation '

—The Indian Spectator ( Bombay, 28th July '06 )

# पुरवणी–याच कर्त्याच्या पूर्वकृती.



‘ **मातृविरह** ’ ( एक शोकरसप्रधान खंडकाव्य. ) ( भाषांतर ) ‘ एक हृदयद्रावक व उदात्तविचारपूर्ण शोकगीत. ’–रा० बाळकृष्ण अनंत भिडे, बी. ए., माजी संपादक, ‘ काव्यसंग्रह ’ ( मुरूड-जंजिरा, ता० ६–६–१९१४ ). किं० ८१८६

‘ **विकारविलास** ’–रावबाजींच्या कारकिर्दीचें हुबेहुब चित्र उठविणाऱ्या रा. द्रविडकृत ‘ अनाचारदुष्परिणाम ’ या सुंदर नाटकाप्रमाणें, सध्यांच्या इंग्रजी आमदानींतील अनाचारदुष्परिणामांचें प्रतिबिंब डोळ्यापुढें आणून, व्यक्तिमात्रांत जागरूकता, अंतर्मुखता व कर्तव्यतत्परता उत्पन्न करणारी सामाजिक नाटिका. ( भाषांतर ) ‘ तुमच्या नाटिकेचा हेतु आपल्या समाजांत सावधगिरीनें व दूरदृष्टीनें सुधारणा करण्यास लोकांना उद्युक्त करणें हा आहे. त्यास माझी संमति आहे.– ’ रा० बाळकृष्ण अनंत भिडे, बी. ए., माजी संपादक, ‘ काव्यसंग्रह ’ ( मुरूड–जंजिरा, ता० १३।८।१४ ). किं० ८५

---

# By the Same Author.



( 1 ) ' ON POETICAL TIPTOE ' & ' GEMS INDIAN':- ( 1 ) ' Impressive & Original.' - Rao Bahadur C. V. Vaidya M. A. LL. B., Ex - Chief Justice ( Gwalior ) & Author of EPIC INDIA. ( 2 ) ' Very Satisfactory. '- Prof. Wren M. A. ( Oxon. ), Editor, INDIAN EDUCATION ( Bombay ). Rs. 1-0-0

( In the Press )

( 2 ) ' INDIAN PSYCHOLOGY IN A NUTSHELL ' ( Based on the Writer's Benares Prize Essay & published in the INDIAN EDUCATION ( Bom. ) As. 0-4-0

( 3 ) ENGLISH COMPOSITION ( a Series of Nine Contributions to the Same )As. 12 ' Worth Collecting and Publishing. ' Prof. Wren M.A. ( Oxon. ), Editor, INDIAN EDUCATION, Bombay.

( 4 ) INDIAN LITERATURE-Ancient & Modern. Founded on the Author's Practical Experience, when he filled the Chairs of Sanskrit ( Isabella Thoburn Women's First Grade Coellge, Lucknow ) & English ( Hindu College, Delhi ). Rs. 3-0-0

N. B. ( 1 ) To be had of the Author, 1409 Shukrawar, Poona; ( 2 ) Wholesale and Advance Prices ( of the Books in the Press ), ¾ths of the above Quotations.

# अर्वाचीन महाराष्ट्र.

## भाग १ ला. कंपनीचा अंमल. ( १८१७–५८ )

## प्रकरण १ लें.

### बाजीरावसाहेबांची द्वाहीः कंपनीसरकारचा हुकूम.
### ( १८१७–१८१९ ).

'बाजीरावसाहेबांनीं कितीही अपराध केले असले व त्यांनीं कसलीही दगलबाजी केली असली, तरी जर ते राज्यकारभार सोडून देतील, तर त्यापासून मला दुःख होईल.' असे दुःखोद्गार ता० ७ मे १८१७ ला त्यांचे प्रतिस्पर्धी एल्फिन्स्टनसाहेब यांनीं काढून, आपल्या रोजनिशींत नमूद करून ठेविल्यास पुरते सहा महिने होतात न होतात, तोंच ता० ५ नोव्हेंबर १८१७ ला रेसिडेंट-साहेबांच्या बंगल्यावर आग व खडकी ( गणेशखिंड ) वर झोडं;

१ कोलब्रुककृत 'एल्फिन्स्टनचरित्र' ( १८८४ ची आवृत्ति, भाग १ ला, प्र० ११ वें, पृ० ३५९ वें ) पहा.

२ कोलब्रुककृत 'एल्फिन्स्टनचरित्र' ( ३७५–३७६ वीं ) पहा.

श्रीमंतांचा दिव्याच्या घाटाकडे पळ ( ता० १७ नोव्हेंबर १८१७ ); व कंपनी सरकारच्या हुकमासंबंधी द्वाही[१]; अशा गोष्टी घडून आल्या. ता० १ जून १८१८ ला, 'पेशवेसरकारशीं १६ वा व अखेरचा सोडचिठ्ठीचा तहनामा[२]' बोरी मुक्कामीं होऊन, सालीना रु० ८,००,००० पेन्शन, देव-धर्म व सरदारी नेमणुका कायम होऊन, श्रीमंतांनीं माल्कमसाहेबांच्या अंमलदाराबरोबर ब्रह्मवर्तास प्रयाण, तेथें गंगास्नान, ब्रह्मकर्म यांचा थाट, निर्बुद्ध व असभ्य स्तोत्रपाठकांचें पथक अशा नवीन सृष्टींत प्रवेश केला.

येणेंप्रमाणें, श्रीमंत महाराष्ट्रास अंतरले. त्यांची ओळख महाराष्ट्रांत कशी राहिली तेवढें पहावयाचें उरलें. तें असेंतसें काम नव्हे. एल्फिन्स्टनसाहेबांसारख्यांना देखील त्याचें महत्त्व कबूल करावें लागलें आहे[३]. बाजीरावसाहेबांच्या विचारांचा थांग लावण्यांत किंवा त्यांच्या धोरणाप्रमाणें चालण्यांत ज्यांचा मतलब आहे, ते तर बुचकळ्यांत पडावयाचेच. असें होण्याचें कारण कांहींसें असें आहे कीं, बाजीरावसाहेबांच्या मुख्य भीरुत्वलक्षणानुसार त्यांचे बहुतेक हेतू नसत; व कांहींसें असें आहे कीं, त्यांच्या ठायीं एवढें मोठें कपट-प्रचुरत्व होतें कीं, त्यांस संवृतमंत्र व गुढाकारेंगित असें राहून, आपल्या मनांत नसणाऱ्या गोष्टी जनांत आणितां येत असत. जर ते कमी धैर्यवान् असते, तर ते महत्त्वाकांक्षी, गर्विष्ठ,

---

१ ब्लॅकरकृत '१८१७–१८१९ च्या मराठ्यांच्या युद्धाचा इतिहास,' प्र० ५ वें, पृ० ७३ वें पहा.

२ एचिसनकृत 'तहनामे वगैरेंचा संग्रह' ( 'पी' अक्षराखालीं ) पहा.

३ कोलब्रुककृत 'एल्फिन्स्टनचरित्र' ( भा० १ ला, प्र० ९ वें, पृ० २८७–२८९ वीं ) पहा.

शिरजोर, व दीर्घोद्योगी असून, जी ऐषआरामाची आवड त्यांच्या भित्रेपणामुळें बळावलेली होती, ती त्यांच्या खटपटी स्वभावामुळें लयास गेली असती. तरी, सत्तासंपादनार्थ अवश्य असें साहस अंगीं नसूनही, तीविषयीं हौस व ती राजविण्यास लागणारी उद्योगशीलता अंगीं नसूनही, ती हातांत राखण्याचा अट्टाहास त्यांच्या ठायीं दिसून येत असे. त्यांच्या संशयी व चौकस वृत्तीमुळें त्यांचें आलस्यही नष्ट होत असे; त्यामुळें, त्यांच्या स्वभावांतील अमूक एक लक्षण शुद्ध व पूर्ण असें दिसत नसे. मोठेपणाच्या हौसेमुळें, त्यांस कनिष्ठ प्रतीच्या नोकरचाकरांची संगत आवडत असे; 'वासरांत लंगडी गाय शहाणी' असा प्रकार तेथें त्यांस करून दाखवितां येत असे. त्यांच्याशीं तर त्यांचें वर्तन ताठ्याचें व शिरजोरपणाचें असेच; परंतु, इतरांशीं देखील कधीं कधीं ते डौल व तोरा मिरवीत असत; व वेळ पडल्यास, ते हवा तो हलकटपणा करण्यास मागेंपुढें पहात नसत. जरी त्यांचा स्वभाव चंचल व लहरी असे, तरी ठरलेले बेत तडीस नेण्याइतकी चिकाटी त्यांच्या अंगीं असे. सूट मिळतांच, ते चिकाटी धरीत; आडवें येतांच ते हट्ट धरीत; परंतु धमकावितांच ते ताळ्यावर येत. ते इतके दीर्घद्वेषी असत कीं, ज्यानें म्हणून एकदां त्यांच्या शेंपटीवर पाय दिला असेल, त्यास दंश केल्याशिवाय ते कधीं सोडीत नसत. त्यांत त्यांस विशेष खर्च लागत नसे; ते दिलदार नसून कपटपटु असत. अशा गुणांचा वास ज्यांच्या ठायीं असे, त्यांचा कोणावर विश्वास नसल्यास, त्यांत कांहीं नवल नाहीं; त्यांच्या विश्वासास पात्र असे कायते एक त्रिंबकजी डोंगळेच. व यांतही कांहीं आश्चर्य नाहीं. जो इतका कमी दर्जाचा कीं, त्यापासून काडीचें भय नाहीं;

जो इतका निंद्य कीं, त्याचा हेवा वाटावयाचा नाहीं; व जो इतका मेषपात्र कीं, त्याचें म्हणणें खोडिलें तरी त्यास राग यावयाचा नाहीं; अशाच्या वरकांती भक्तीची फेड ते निःसीम-स्नेहसंबंधानें करून, जो विश्वास मनुष्यमात्रावर ठेवावयाचा नाहीं, तो त्यावर ठेवीत असत.

पेशव्यांच्या दुर्गुणांच्या तोलास तोल देण्याकरितां, इतकें कबूल केलें पाहिजे कीं, ते कोणत्याही दृष्टीनें कमी बुद्धिमान् होते असें नाहीं; पैशाच्या व्यवहारांत ते कवडीकवडीचा हिशोब ठेवणारे होते; ज्यापासून भय नसेल किंवा ज्यावर सूड उगवावयाचा नसेल, त्यावर ते कृपादृष्टि ठेवणारे होते; हंथरूण पाहून पाय कसे पसरावेत हें त्यांस समजत असे; त्यांची वागणूक सभ्य व प्रौढ असे.

चारचौघांशीं जरी पेशव्यांच्या इतर वर्तनाचें कर्तव्य नाहीं, तरी तें सांगण्यासारखें आहे. ते धर्मभोळे असत; त्यांचें अर्धें आयुष्य उपवास, भजनपूजन व तीर्थाटन यांत जात असे. त्यांच्या वसुलाचा बराच भाग मंत्रतंत्रांकडे खर्च होत असे; व भूतपिशाच व अपशकून यांचें बंड त्यांच्या अमदानींत माजलेलें असे. त्यांच्या धर्मभोळे स्वभावामुळें त्यांच्या सुखासीनत्वांत अंतर पडत नसे; व त्यांचा जो बराच वेळ धर्मकृत्यानंतर उरत असे, तो ऐषआरामांत जात असे. जरी आपण मोठे शुद्ध आहोंत असें त्यांस वाटत असे, तरी गोपींच्या गोकुळांतील कृष्णलीला केल्याशिवाय त्यांचा एक दिवस जात नसे. यावेळीं, बहुशः मोठ्यांच्या बायका हजर असत; व जे आपल्या बायका वाड्यांत पाठवीत नसत, त्यांवर सरकारची मर्जी खप्पा होत असे. ’

अशा व्यक्तीवर अवलंबून असणारी राज्यसंस्था किती लोकप्रिय असणार हें उघड आहे. सर्वत्र सामाजिक असंतोष किती प्रसार पावणार हें स्पष्ट आहे. अर्थोत्पादक तत्त्वांची ओळख लोकांस नाहींशी होऊन, आपसांत दुही कशी माजणार हें व्यक्त आहे. पेशवाईचें आंतलें बाहेरलें धोरण पहिल्यापासून सातारकरांच्या मांड-लिकांना अलग करून, त्यांच्या धनाचा अपहार करून, नवीन जहागिरदार तयार करण्याकडे असे, तें पूर्वपरिपाठ व परिस्थिति यांस धरून होतें. नारायणरावांच्या खुनापर्यंत, सर्व सुरळीत चाललें होतें. पुढें, नाना फडणविशी गाजून, बाजीरावांनीं आपल्या कलह-प्रियतेनें ‘ सर्वच मुसळ केरांत गेल्या ’ सारखा प्रकार केला. त्यांनीं टोपीवाल्यांची कास धरिली, व त्यांच्याशींच वैर आरंभिलें. त्याचा परिमाण कसा अनिष्ट झाला हें वर आलेंच आहे.

‘ दोघांचें भांडण, तिसऱ्यास फायदा ’ या न्यायानें, इंग्रजांस [1]दीडकोटीचा मुलूख मिळाला. तेथील बंडें मोडून राज्यकारभाराची रीत पाहण्यांत एक वर्ष घालवून, देशांतील मूळच्या संस्था चालू ठेवून, कालान्तरानें त्यांत सुधारणा करण्याचा कित्ता एल्फिन्स्टन-साहेब यांनीं आतां कमिशनर या नात्यानें, घालून दिला. पॉटिंजर

१ कोलब्रुककृत ‘ एल्फिन्स्टनचारित्र ’ ( भा० १ ला, प्र० ९ वें, पृ० ३०३ रें ) पहा. लेफ्टेनंट-कर्नल व्हॅलेंटाइन ब्लॅकर हे मात्र रु० २,१०,००० सालीना उत्पन्नाचा उल्लेख करितात. ( १८१७–१९च्या मराठ्यांच्या युद्धाचा इतिहास, भा० १ ला, पृ० २, २७, ६५, ६६ व भा० २ रा, पृ० १ व १६७ वीं पहा.)

व ब्रिग्स् या आपल्या तालिमींतील मंडळीस कलेक्टरें नेमून, मद्रास-कडील मन्रोच्या शिफारसीचे, चॉप्लिनसाहेब, या हुशार सिव्हिलियनास महाराष्ट्रांतील जहागिरदारांची समजूत घालण्याच्या नाजूक कामावर त्यांनीं नेमिलें. कॅप्टन ग्रँट डफ ( मराठ्यांचा भावी इतिहासकार ) यांस एजंट नेमिलें. चिंतामणराव पटवर्धन यांनींच कायतो पीळ धरिला होता. त्यांनीं असें उत्तर केलें होतें कीं, पंढरपूरच्या तहनाम्यांत, पेशवेसरकार व इंग्रजसरकार यांचा बेबनाव झाल्यास, आपणांस इंग्रजसरकारची सेवा पत्करावी लागेल असा उल्लेख नाहीं; सबब, पेशवेसरकारची नोकरी करून, आपल्या जहागिरीचा उपभोग घेत जाण्याविषयींचें इंग्रजसरकारचें आश्वासन कायम आहे असें होतें. परंतु, पत्रव्यवहार व समक्ष भेटी या साधनद्वयानें, एल्फिन्स्टनसाहेबांनीं त्यांच्या त्या युक्तिवादास हरताळ लावून, आपला कार्यभाग सिद्धीस नेला ( १८१९ ).

अशा रीतीनें, एक वर्ष केलेल्या कामाचा वृत्तान्त ३ महिन्यांत लिहून, एल्फिन्स्टनसाहेबांनीं आपल्या वरिष्ठ अधिकाऱ्यांकडे सादर केला. त्यांत, पेशवेसरकारच्या अमलांतील प्रांतांची संक्षिप्त माहिती, मराठ्याच्या इतिहासाचें सिंहावलोकन, त्यांची राज्यपद्धति, वसूलपद्धति व न्यायपद्धति यांचें निरीक्षण एवढी अवश्य प्रस्तावना

---

1 कॅप्टन रॉबर्टसन ( पुणें जिल्ह्याचे कलेक्टर )

कॅप्टन पॉटिंजर ( मध्य जिल्ह्याचे कलेक्टर )

,, ब्रिग्स् ( खानदेश ,, ,, )

मिस्टर चॅप्लिन ( दाक्षिण ,, ,, )

कॉक्सकृत ‘ मुंबई इलाख्याचा संक्षिप्त इतिहास ’ ( पृ० २६६ वें ) पहा.

करून, राज्यशकट पुढें कोणत्या दिशेनें चालवावयाचा आहे याचें त्यांनीं निरूपण केलें. युरोपियन राजनीति एकदम प्राच्य देशांत सुरू करण्यांत ज्या अडचणी येतात, त्या लक्षांत आणून, नेमस्त-पणा व सावधगिरी हेंच या मोठ्या रिपोर्टाचें एकंदर धोरण आहे. नाशिक येथें पुढारी ब्राह्मणांची सभा भरवून, सनदा व वर्षासनें चालू ठेवण्याविषयीं साताऱ्यास दिलेल्या आश्वासनाची एल्फिन्स्टन-साहेबांनीं पुनरावृत्ति करून, भिक्षुकांस दक्षिणा वांटली. त्यांनीं पुणें येथेंही असाच प्रकार केला.

आपणांस सरकार दबतें किंवा आपलें प्रस्थ अद्यापि पूर्ववत् मोठें आहे, म्हणून तें आपली मनधरणी करतें. अशी वृथा कल्पना ज्यांच्या डोक्यांत खेळत होती, त्यांस तत्काळ शुद्धीवर आणण्यांत आलें. पुणें व सातारा येथील युरोपियन लोकांची कत्तल उडवावी, ठळक ठळक किल्ल्यांवर छापा घालावा, सातारकरांस हस्तगत करावें; हे हेतू तडीस नेण्याकरितां जो कट झाला होता, त्याचा तत्काळ समाचार घेण्यांत आला. एल्फिन्स्टनसाहेबांनीं त्यांतील म्होरक्यांस—त्यांत असलेल्या ब्राह्मणांस—मराठी शासनपद्धतीप्रमाणें तोफेच्या तोंडीं देऊन, क्षणांत यमसदनीं पाठवून प्रजाजनांस धाक दाख-विला. त्या तऱ्हेची शिक्षा आपण फिरून कोणास देणार नाहीं, अशा आशयाचा निर्भयलेख एल्फिन्स्टनसाहेबांपासून मुंबईचे तत्का-लीन गव्हर्नर, सर इव्हॅन् नेपियर, यांनीं मात्र मागितला. परंतु, एल्फिन्स्टनसाहेबांसारख्या राजकार्यधुरंधरानें त्यास दाद दिली-नाहीं[1]. एवढेंच नव्हे, तर पुढें यावयाच्या ‘ शिपायांच्या बंडा ’ तही तशी शिक्षा देण्याचे प्रसंग आलेले आहेत.

---

१ कोलब्रुककृत ‘ एल्फिन्स्टनचरित्र ’ (भा. २ रा, प्र. १३ वें, पृ. ७५ वें) पहा.

येणेप्रमाणें, महाराष्ट्र हें इंग्रजी अंमलाखालीं क्रमशः आलें. एल्फिन्स्टनसाहेबांनीं इंग्रजी अंमलाची शिस्त बसवून दिली; एतद्देशीयांस सर्व कामांवर नेमण्याची चाल पाडिली. साहेबमजकुरांची कल्पना अशी होती कीं, तार्तरलोकांचा चिनी लोकांशीं जसा संबंध आहे, तसा आपणां ब्रिटिश लोकांचा एतद्देशीयांशीं असावा; राज्यसूत्र व सेनाधिपत्य हीं काय तीं आपण हातांत वागवून, क्रमाक्रमानें ऐहिक व्यवहाराचा बहुतेक भार त्यांच्या अंगावर टाकावा; आपण फक्त मार्गदर्शकत्व पत्करावें. ही क्रिया इतकी क्रमबद्ध असावी कीं, कंपनीसरकारच्या व्यवस्थापक मंडळीची, तीमुळें, छाती दडपून जाऊं नये. एवढ्याकरितां, एतद्देशीयांना प्रथम सिव्हिलियन बनविण्याकरितां, त्यांस शिक्षण दिलें पाहिजे; त्यांस न्यायखात्यांत जागा दिल्या पाहिजेत, त्यांचे पगार साधारणमानानें वाढत गेले पाहिजेत; व त्यांच्यांतील अत्यंत योग्य व प्रामाणिक माणसांकरितां काहीं मोठाल्या जागा खुल्या ठेविल्या पाहिजेत; त्यांना कौन्सलांत सभासद म्हणून घेण्यास अद्यापि कालावधि असली, तरी राजकीय बाबतीखेरीज इतर सर्व बाबतींत त्यांची सल्लामसलत बिनधोक घेतली पाहिजे. येथें आपली वसाहत करणें हें धोक्याचें काम आहे. अज्ञून हिंदुस्थानसंबंधीं लेखक फक्त युरोपियन लोकांविषयींच लिहितात. म्हणून, एतद्देशीय वर्तमानपत्रें, हाफ-कास्ट, इत्यादींविषयीं गैरसमज होतात; आणि, आपण जर येथें वसति केली, तर असला गैरजमज अधिक सार्वत्रिक होण्याची मोठी धास्ती आहे; परंतु, एतद्देशीयांच्या जागा ज्यांना कायद्यानें मिळावयाच्या नाहींत, ज्यांनीं

---

१ कोलब्रुककृत ' एल्फिन्स्टनचरित्र ' ( भा० २, प्र० १४ वें, पृ० १८६–१८७ वीं ) पहा.

व्यापारास उत्तेजन दिलेंच पाहिजे, ज्यांनीं युरोपियन सुधारणा लोक-निदर्शनास आणून दिल्या पाहिजेत, अशा ब्रिटिश भांडवलवाल्यांचें लक्ष्य वेधण्याची आपण योजना केल्यास, या देशाचें विशेष हित होईल. तसा कायद्याचा निर्बंध नसल्यास, युरोपियन वसाहत-वाल्यांचें प्रस्थ माजेल, ते सर्व हुद्द्यांच्या जागा पटकावितील व नेटि-व्हांच्या तोंडांस पानें पुसतील. एतद्देशीय राजेरजवाड्यांची गति जी कांहीं व्हावयाची असेल, ती चुकावयाची नाहीं. प्रत्येक एत-द्देशीय राजकीय संस्था अल्पायुषी आहे. ज्या वेळीं या देशास युरोपियनांचे पाय लागले नव्हते, त्या वेळीं राजसत्ता गझनवी घराण्या-कडून घोरीघराण्याकडे, अफगाणांच्या हातांतून मोंगलांच्या हातांत, मोंगलांपासून मराठ्यांच्या मनगटांत आलेली आहे. युरो-पियनांसच स्थापितां येणाऱ्या चिरस्थायी राजसत्तेपुढें, आस-पासच्या सर्व तेरड्याच्या फुलाप्रमाणें चंचलवृत्ति राजसत्तांचा नाश होणार आहे, व आज जो प्रकार घडून आला आहे, व पुढें जो घडून येणार आहे, त्याचें मूळ यांत आहे[1], देशी रजवाड्यांच्या दरबारीं आपलीं पलटणें ठेवण्याच्या पद्धतींत नव्हे.

---

१ ' राजमंडळा ' चा नाश, सैन्यांतील मराठी तेज नष्ट करणारा उसना गार्दीपणा, बाजीरावसाहेबांची मामलती इजाऱ्यानें देण्याची पद्धति या ३ अनिष्ट गोष्टींनीं, सरकारी भरपूर तिजोरी, न्यायखात्यांत विद्वद्रत्नांचा भरणा, दिवाणींतील पंचायती पद्धति, मद्यनिषेध, कोतवाली बंदोबस्त, धान्याची स्वताई, समाजसुधार-णेची सरकारी खटपट, विद्येस व कलांस उत्तेजन; या सर्व इष्ट गोष्टींवर विरजण पडलें असा न्यायमूर्ति रानडे यांचा अभिप्राय आहे. ( त्यांनीं लिहिलेली ' पेश-व्यांच्या रोजनिशांची प्रस्तावना ' ) पहा.

# प्रकरण २ रें.



## एल्फिन्स्टनशाही (१८१९-१८२७).

पेशवाई मुलखांतील मध्यप्रांतांतील भाग, सतत २० वर्षें मोठ्या मानमान्यतेनें लष्करी व राजकीय खात्यांत काम केलेले, सर जॉन माल्कम, यांकडे सोंपवून, आपल्या कमिशनरच्या जागेचा चार्ज चॅप्लिनसाहेबांस देऊन त्यांच्या हक्काची खरोखर पायमल्ली होऊन, एल्फिन्स्टनसाहेब हे राजकीय खात्यांतील शिखर म्हणजे मुंबई-इलाख्याचें गव्हर्नरपद, त्याप्रत पावले ( तारीख १ नोव्हेंबर १८१९ ). त्यांचें बुद्धिवैभव व त्यांची चाणक्यनीति हीं जितकीं आतां प्रत्ययास येऊं लागलीं, तितकीं तीं पूर्वीं प्रत्ययास आलीं नाहींत. १८१८ त तर, त्यांचें नांव सर्वतोमुखीं झालें. अद्यापि, राज्यशकट कसा चालवावा याचा त्यांस जो अनुभव आलेला नव्हता, तो संपादन करण्याची संधि त्यांस आतां प्राप्त झाली. त्या सर्व अनुभवाचें श्रेय त्यांच्या शीलाकडे आहे.

त्यांची स्वताच्या कामाविषयींची कळकळ पाहून, त्यांच्या हाताखालच्यांसही आपापलें काम कळकळीनें करावें असें वाटे. अशा रीतीनें, त्यांनीं प्रत्येक खात्याचा नूर पालटविला. व मुंबई-इलाख्यांतील ज्या प्रजाजनांनीं त्यांची कामगिरी पाहिली, त्यांनीं त्यांच्या योग्यतेनुरूप अत्यंत मोठीं स्मारकें उभारलीं. ज्या महाराष्ट्र-सरदारांचा मानमरातब पूर्ववत् राखून, त्यांस दिवाणी कोर्टाच्या तावडींतून वांचवून, पोलिटिकल एजंटच्या ठरावावरून गव्हर्नर-

साहेबांकडे अपील करण्याची त्यांस संधी देऊन, एल्फिन्स्टनसाहे-बांनीं राजी ठेविलें, त्यांस इंग्रजी अंमलाची इभ्रत कळून आली. रु० ५०,००० पासून रु० ७०,००० वसुलाचे साधारणतः सारखे ५ जिल्हे करून, ५०,००० चौरस मैल क्षेत्रफळाच्या महाराष्ट्रांतील ४०,००,००० प्रजेस बाजीरावसाहेबांच्या पूर्वी-चीच रय्यतवारी अधिक हलकी, अधिक सारखी, अधिक पक्की करूनं[2], कलेक्टर युरोपियन, डेप्युटी कलेक्टरद्वयांपैकीं एक मद्रासी व एक महाराष्ट्रीय, मामलेदार, पाटीलकुलकर्णी; असें त्यांनीं अधि-कारिमंडळ नेमिलें. पोलीस अधिक दक्ष, अधिक दमदार परंतु कमी

---

१ एकदां, एल्फिन्स्टनसाहेबांनी बाळाजीपंत नातू ( इंग्रजाच्या वतीनें शनवार वाड्यावर निशाण लावणारे ) यांना मुद्दाम असा प्रश्न केला कीं, पेशवाई कां टिकली नाहीं ? " तेव्हां ते म्हणाले कीं, " हिंदुस्थानांतील स्वराज्यें कित्येक गेलीं व उरलेलीही जातील यांत संशय नाहीं. कारण, आमचीं राज्ये व्यष्टीचे स्वाधीन आहेत. ती व्यष्टि ( व्यक्ति ) कधीं चांगली, तर कधीं वाईट निघते. आणि ती वाईट निघाली म्हणजे ती आपल्या राज्याचे वाटोळें करिते. परंतु तुमचें राज्य समष्टि आहे. त्यांत, शूर व शहाणे पुरुषांची धार वाहत असल्यामुळें, त्यास अशक्तता येत नाहीं. इतकेंच कारण मी समजतों. " ( सरदार देशमुखकृत ' ऐति-हासिक गोष्टी ' पहा. )

२ ही जमाबंदी इतकी सरळ हाताची होती कीं, तीमुळें सरकारास प्रथम विशेष प्राप्ति झाली नाहीं. ( कॉक्स् कृत ' मुंबईइलाख्याचा संक्षिप्त इतिहास ' पृ० २६७ वें पहा. )

आवेशी व तेवढ्यापुरते कमी गुणकारी त्यांनीं मुकर केले. [१]न्याय-खात्यांत पद्धतशीर काम होऊन, शहरांत प्रजापालनाची जबाबदारी सरकारनें आपल्या शिरावर घेऊन, खेडेगांवांत गांवकी व पंचायत गोरगरिबांस अधिक सुलभ व सुखावह म्हणून कायम ठेवण्याविषयीं अमीन ( मुनसफ ) व मामलेदार यांस त्यांनीं हुकूम सोडिले. व लोकांस विद्येची अभिरुचि लागावी म्हणून ' हितोपदेश, ' ' पंच-तंत्र ' असे सुरस व नीतिपर ग्रंथ मराठींत प्रसिद्ध करून त्यांचा लोकांत फुकट प्रसार करून, धर्मशास्त्र, गणित इत्यादि शिकविण्या-करितां नामांकित गुरूंच्या नेमणुका करण्याच्या हेतूनें, पूर्वीं होत घातलेल्या नाशिक व वांई येथील दोन संस्कृत कॉलेजांचा खर्च आटोक्यांतला न वाटल्यावरून, तूर्त पुणें येथें रु० ५०,००० सालीना खर्चाची एकच संस्कृत पाठशाळा त्यांनीं उघडिली. राजा राममोहनराय या महात्म्याच्या दीर्घोद्योगानें ' सतीप्रतिबंधक कायदा ' होऊन, सती जाणें बंद झालें.

ज्या ८ वर्षांत एल्फिन्स्टनसाहेब हे मुंबईचे गव्हर्नर होते, त्यांत त्यांनीं आपल्या हाताखालील इलाख्यांतील प्रत्येक भागांत दोनदां प्रवास केला होता. शेवटच्या खेपेस पेशव्यांच्या प्रांतांतून ते फिरत

---

१ खानदेशांत लूटमार करणाऱ्या तिरंदाज रानटी भिल्लांना नांगरण्यास फुकट जमिनी, बीबियाणा व गुरेंढोरें यांकरितां तगाई देऊन, त्यांस शेतकरी व गांवपोलीस बनविलें. तसेंच, पश्चिम किनाऱ्यावरील आंग्र्यांचा चांचेपणा बंद केला. व पुणें जिल्ह्यांतील उमाजी नाईक या रामोश्याचें बंड ( १८२६–२७ ) मोडून टाकिलें. हे रामोशी इतके साहसी व यशस्वी झाले होते कीं, त्यांच्याशीं अडदांडपणा न करितां, गोडीगुलाबीनें वागून, भिल्लांप्रमाणे त्यांस ताळ्यावर आणिलें. ( कॉक्सकृत मुंबईइलाख्याचा संक्षिप्त इतिहास, ' पृ० ३७५ वें, पहा ).

असतां, त्यांबरोबर त्यांचे अंडर-सेक्रेटरी, जॉन वॉर्डन हे होते. त्यांनीं गव्हर्नरसाहेबांच्या चरित्रकारास त्यांविषयीं असें लिहून कळविलें आहे कीं,[१] इलाख्याच्या राजधानींत किंवा बाहेर गांवीं त्यांची राहणी सारखी असे. पहाटे उठून, आपल्या तैनातींतील एका मोठ्या घोडीवर ते मुख्यत्वेंकरून दीडतासाची दौड करीत असत. रोज सकाळीं, त्यांच्या येथें हम छोटी हजिरी होत असून, त्या वेळीं त्यांच्याशीं बोलूं पाहणारा एखादा इसम राहीपर्यंत तेथून कधींही निघून जात नसत; परंतु मग मात्र ते आपल्या नोकरां-खेरीज इतरांच्या दृष्टीस पडत नसत. मी याच नात्यानें सर जॉन माल्कम, लॉर्ड क्लेयर, सर रॉबर्ट ग्रँट व पुष्कळ कामधंद्याच्या मंड-ळींत वागलों आहें; परंतु एलिफन्स्टनसाहेब हे त्यांत उत्तम होत. त्यांचा उद्योग एवढा दांडगा असे कीं, ते एखाद्या तहनाम्याच्या खर्ड्यावर जितकी मान मोडून मेहनत घेत असत, तितकी एखाद्या पांच रुपड्यांच्या मामलत्यांत घेत असत. ते एक फर्डे कलमबहादर असून, अलपस्वल्प टिपणें झपाट्यासरशीं व खोडाखोडी न करतां खर्डून टाकीत असत. मध्यान्हींच्या फराळानंतर ते थोडीशी वामकुक्षि करून, दुपारीं ग्रीक किंवा लॅटिन भाषेचें वाचन चालू ठेवीत असत, व कधींकधीं संध्याकाळच्या सहाला देखील मला त्यांच्याकडून बोलावणें येत असे, व आठाच्या खान्यापूर्वीं पाय मोकळे करण्यास अर्धा तास उरेपर्यंत, मी तेथें बसत असें; दहाला खाना आटोपून, आपल्या खोलींत अर्धा तास वाचीत बसून, ते झोंपीं जात असत. जरी त्यांच्या भोंवतीं तरुणपुरुषांचा गराडा

---

१ कोलब्रुककृत ' एलिफन्स्टनचरित्र ' ( भा० २ रा, प्र० १४ वें, पृ० १७४ वें व १७५ वें ).

पडलेला असे, तरी त्यांस यत्किंचित् असभ्यपणा खपत नसे; व खान्यानंतर जर कोणी शब्दांवर कोट्या लढवूं लागेल, तर ते तोंडांतून चकारशब्द काढीत नसत; मात्र आपली खुर्ची मागें ढकलून, ते भोजनसमारंभ समाप्त करीत असत.

बिशप हीबर हा चाणाक्ष विद्याव्यासंगी प्रवासी एल्फि-न्स्टनसाहेबांकडे उत्तर व मध्य हिंदुस्थान फिरून आला होता. या पाहुण्यानें आपल्या यजमानाचा स्वभाव व संभाषण यांचें मजेदार संक्षिप्त वर्णन आपल्या रोजनिशींत नमूद केलें आहे;[1] 'मुंबई सोडणें आमच्या जिवावर आलें. येथें अशी कांहीं मंडळी होती कीं, त्यांचा निरोप घेणें मोठें जड गेलें. आपले जुने परिचित गृहस्थ सर एडमंड वेस्ट व सर चार्लस चेंबर्स, तसेच आपले जुने परममित्र आर्चडीकन बार्न्स हे मला भेटले. परंतु, सर्वांत उत्तम गोष्ट ही घडली कीं, एल्फिन्स्टनसाहेबांच्या अखंड दयालुत्वांत, विलक्षण पाहुणचारांत व मनमिळाऊ संभाषणांत मला असें अप्रतिम सुख प्राप्त झालें कीं, त्यासारखें हिंदुस्थानांत किंवा युरोपांत मला प्राप्त झालें नाहीं.

एल्फिन्स्टसाहेब हे प्रत्येक बाबतींत विलक्षण पुरुष होत. त्यांच्या ठायीं शारीरिक व मानसिक सामर्थ्य मोठें आहे; सरकारी काम समजण्याची अक्कल व तें पार पाडण्याची मेहनत जबरदस्त आहे; विद्येची गोडी व बहुतेक सर्व विषयांची माहिती मिळ-विण्याची आवडही तशा स्थितींतील दुसऱ्या कोणाही व्यक्तींत मला आढळून आली नाहीं. त्यांची वागणूक व संभाषण हीं अत्यंत बाल-बोध व सुंदर आहेत. सध्यांच्या कोणत्याही व्यक्तीहून त्यांनीं हिंदुस्थान व

---

१ कोलब्रुककृत 'एल्फिन्स्टनचरित्र' ( भा० रा, पृ० १६९-१७२ वीं ) पहा.

त्याच्या लगतचे देश अधिक सूक्ष्मदृष्टचा पाहिले आहेत व अठरा वर्षांच्या वयापासून त्यांनीं राज्यांच्या घडामोडींत व कधीं-कधीं तर लष्करी कामांतही आपलें तनमन वाहिलें आहे, तरी त्यांस केवळ हिंदुस्थान व इराण येथील भाषांच्याच अध्ययनास वेळ फावला आहे असें नाहीं, तर त्यांस ग्रीक व लॅटिन भाषेंतील साहित्य; फ्रेंच, इटॅलियन व इंग्रजी भाषांतील सर्व जुन्या व नांवाजलेल्या रचना यांचाही परिचय करण्यास वेळ फावला आहे; तसेंच, सांप्रतकालीन व लोकप्रिय इतिहास, काव्य, राजनीति व अर्थशास्त्र यांतही प्रवेश करण्यास फावला आहे. इतकें विद्यार्जन व इतका पेयनियमितपणा असूनही, त्यांना चारचौघांशीं मिळून-मिसळून वागण्याची आवड आहे, व त्यांच्या मित्र मंडळीस याच एका गोष्टीचें कौतुक वाटतें कीं, त्यांस ज्ञानसंपादनार्थ दिवसां किंवा रात्रीं वेळ तरी केव्हां सांपडतो ! '

हें मात्र खरें आहे कीं, बिशप हीबर यांनीं वर्णिल्याप्रमाणें ते धर्मभोळे नव्हते. परंतु, त्यांचा स्वाभाविक धार्मिकपणा व ख्रिस्ती धर्माकडे कल एवढा असे कीं, काकतालीय न्यायानें पहाणाऱ्याची त्याविषयीं गैर समजूत होणें हें संभवनीय आहे. त्यांनीं ख्रिस्ती-धर्माच्या ऐतिहासिक प्रमाणांचा विचार करून, लार्डनरच्या कृतीची कदर केली होती. ती त्यांच्या पुस्तकालयांत असून, तिचें पारायण करण्यास त्यांनीं आपले चरित्रकार कोलब्रुक यांस सांगितलें होतें. त्यांच्या रोजनिशीवरूनही याच गोष्टीचें दृढीकरण होतें. त्यांची राहणी व वागणूक ही कांहींशी जुन्या अल्पेच्छावादी [ स्टोइक ] पंथासारखी असे. खरोखर, सर्व आयुष्यांत त्यांच्या डोळ्यासमोर ज्युव्हिनेल या मूर्तिपूजक तत्त्ववेत्याचें महातत्त्व असे;

शील व निश्चय यांच्या जोरावर, मनुष्यास संसारांतील संकटें व आकस्मिक प्रसंग यांतून पार पडतां येतें. एल्फिन्स्टनसाहेबांनीं आपल्या आचरणांत अल्पेच्छावादींचें कठोरत्व व्यक्त केल्याशिवाय त्यांच्यांतील गुणांचें ग्रहण केलें होतें. ज्यास त्यांच्या प्रौढपणच्या विचारांचें परीक्षण करण्यास सांपडे, त्यास तर ते एक प्रेमळ एकेश्वरिमताचे आहेत असें वाटे.[1]

अशा महापुरुषानें हिंदुस्थानांत ३० वर्षें घालवून, वर्षाचें रु. २५००० उत्पन्न होईल एवढा धनसंचय करितांच, आपल्या जागेचा राजीनामा देऊन, सर्वांमुखीं मंगल बोलवून, स्वदेशीं प्रयाण केलें. ( १६ नोव्हेंबर १८२७. ) या समयीं त्यावर मानपत्रांची वृष्टि तर झालीच. परंतु, ' एतद्देशीय शिक्षण-संस्थे '( १८२१ )[2] नें आपल्या दिवाणखान्यांत त्याची तसबीर लाविली. प्रजाजनांनीं ' टौनहॉल ' मध्यें त्याचा एक पुतळा उभा केला. तसेंच, त्यांनीं त्याच्या नांवाचें एक हायस्कूल व एक कॉलेज उभारण्यास आरंभ केला.



---

१ कोलब्रुककृत ' एल्फिन्स्टनचरित्र ' ( भा० २ रा, पृ० १८४ वें ) पहा.

२ या संस्थेत, नाना शंकरशेट ( १८००–१८६४ ) हे प्रमुख होते. ( ' बालबोध, ) ' जुलै १८८३. यांनीं १८५७ सालीं ' नानाची इंग्रजी शाळा ' व १८६३ त कौंसिलर झाल्यावर ' सोनापूर ' ही भरवस्तींतील स्मशानभूमि (मुंबई), स्थापून एतद्देशीयांस ' जे. पी. ' व ' जूरर ' करण्याकरितां परिश्रम केले.

# प्रकरण ३ रें.

## पुढील तीस वर्षें ( १८७२–५७ ).

एल्फिन्स्टन साहेबांमागून, मेजर-जनरल सर जॉन् माल्कम्[1] जी. सी. बी. इराणकडील माजी दरबारी वकील ( १८१० ) व मध्य-हिंदुस्थानांतील माजी एजंट टु द गव्हर्नर जनरल ( १८१९-१८२१ ), हे मुंबईचे गव्हर्नर ( १८२७-१८३० ) झाले. [2]बाजीरावांशीं जर गांठ असेल, तर युद्धापेक्षां राजनीति ही अधिक कामीं येईल; [3]बाजीरावांचें सैन्य व खजिना समोर असतां, त्याचा सप्पा उडवूं नये; बाजीरावांनीं आपल्या वर्तनानें राज्याधिकार गमाविला असल्यामुळें, ' तेल नाहीं, तूप नाहीं, हातीं आलें धुपाटणें. ' अशी त्यांनीं आपली स्थिति करून घेतली आहे; तींत त्यांनीं समाधान मानून, एकांतवास अंगिकारण्यांतच त्यांचें कल्याण आहे; ब्रिटिश सरकारचा नांवलौकिक व हिंदुस्थानची शांतता आहे; असा पूर्ण विचार करून, बाजीरावांच्या छावणीभोंवतीं आपल्या सैन्याचा गराडा दुरून घालून, त्यांस भेटीअंतीं आपल्या

---

१ लॉर्ड हेस्टिंग्स् यांनीं मालकम साहेबांस खूष राखण्याकरितां या जागेचा अधिकार वाढवून, तिची प्राप्ति मुंबईच्या गव्हर्नरच्या जागेइतकी करून ठेविली होती. ( के-कृत ' मालकमचरित्र, भा० २ रा, पृ० ८ वे, पृ० ३३० वें पहा. )

२. केकृत ' ' मालकमचरित्र व पत्रव्यवहार ' ( १८५६ चा आवृत्ति, भा० २ रा, प्र० ६ वें, पृ० २३७ वें ) पहा.

३ के-कृत ' मालकमचरित्र व पत्रव्यवहार ' ( १८५६ ची आवृत्ति, भा० २ प्र० १२ वें पृ० ४९१ ) पहा.

कह्यांत आणणारे, '[1]मिरीं-लवंगा-दालचिनी गव्हर्नर' ते हेच होत. ह्यांच्या लहानशा कारकीर्दींत, कोंकण व देश यांस जोडणारा 'बोरघाट-रस्ता' बांधण्यांत आला; इनाम-जमिनीसंबंधी दस्तऐवजी पुरावा म्हणजे सनदा या देण्याची चाल साधारण नसून, केवळ भोगवट्यावर चाललेला व्यवहार बंद करण्यांत आला; मोरो रघुनाथ या अज्ञानास त्याचा चुलता व पेशवेसरकारचा जवळचा आप्त व स्नेही, पांडुरंग रामचंद्र, यांच्या पालकत्वांतून आपल्या पालकत्वांत घेण्याकरितां त्या अज्ञानाच्या सासऱ्यानें मुंबईच्या बादशाही सुप्रीम कोर्टांत लाविलेल्या फिर्यादींत, प्रस्तुतसारख्या सरदारी कंपनीच्या आश्रिताच्या बाबतींतील बादशाही कोर्टांचें स्तोम माजविणें फुकट जाऊन, गव्हर्नरसाहेबांचा मान राहिला[2]; मुंबईहून विलायतेस जाणाऱ्या आगबोटी चालू झाल्या.

माल्कमसाहेबांनीं जें नांव मिळविलें, त्याची मख्खी ही कीं, त्यांनीं धड नेटिव्हांचाही बेत उचलिला नाहीं किंवा धड युरोपियनांचाही बेत उचलिला नाहीं. त्यांना एतद्देशीयांचा स्वभाव माहीत

---

१ लॉर्ड हेस्टिंग्स् यांच्या मनांतून 'स्ट्रेटसेटल्मेंटस्‌चे गव्हर्नर म्हणून नेमून, माल्कम साहेबांची कदर करावयाची होती. या गोष्टीस अनुलक्षून साहेब मजकूर हे खुशाल वर दिल्याप्रमाणे विनोद करीत असत.( केकृत सदहू चरित्र, भा० २ रा. प्र० ९ वें पा० ३३१ वें ) पहा.

२ लॉर्ड अम्हर्स्ट यांच्या युद्धाचा खर्च भागविण्याकरितां, जशी युरोपियन अंमलदारांच्या पगारांत घस आली, तशी नेटिव्ह कामदारांच्या जमीन-उत्पन्नावर धाड आली. ( कॉक्सकृत 'मुंबई इलाख्याचा संक्षिप्त इतिहास,' १८८७ ची आवृत्ति, प्र० १९ वें, पृ० २८३-२८४ वीं, पहा ).

३ के-कृत 'माल्कमचरित्र व पत्रव्यवहार' ( भा० २ रा, प्र० १३ वें, पृ० ५०७ वें ) पहा.

असून, त्यांना एतद्देशीयांची कळकळ वाटत असे; तरी त्यांनीं एतद्देशीयांची राहणी उचलली नाहीं. इंग्लिश गृहस्थाचा उच्च व शुद्ध आयुष्यक्रम पाळून, आपलें काम करितांना युरोपियन लोकांच्या कलुषित मताचा त्याग करून, कोणत्याही प्रकारचें ठरीव युरोपियन धोरण एतद्देशीयांच्या सरसगट कारभारास न लावून, त्यांनीं जी लोकप्रियता संपादन केली, ती विलक्षण होय. त्यांनीं हिंदुस्थान सोडिल्यास इतकीं वर्षें झालीं, तरी त्यांचें शारीरिक सामर्थ्य, त्यांचें मानसिक औत्सुक्य, त्यांची सत्यनिष्ठा, त्यांचें दयालुत्व यांचा एतद्देशीयांच्या मनावरील ठसा जसा आहे तसाच आहे.[२]

१८३९ त, लॉर्ड हेस्टिंग्स् व मिस्टर एल्फिन्स्टन यांनीं निर्माण केलेल्या ( १८१९ ) सातारा संस्थानांत लॉर्ड ॲमहर्स्ट यांस मनगटाच्या जोरावर ढवळाढवळ करावी लागली. तेथील राजेसाहेब हे कांहीं दिवस सुखासमाधानानें व ताटाखालच्या माऊप्रमाणें कामकाज पाहत होते. परंतु, त्यांची दुधखुळी बुद्धि व स्वताच्या महत्त्वाची वेडगळ कल्पना यांस दरबारचे ब्राह्मण व बायका यांच्या खटपटीमुळें इतका ऊत आला कीं, आपण मराठी राज्यसत्ता पुन्हा स्थापून, इंग्रजांस देशांतून काढें करण्यास

१ के-कृत ' माल्कमचरित्र व पत्रव्यवहार ' ( भा० २ रा, प्र० ८ पृ ३३६ वें ) पहा.

२ के-कृत ' माल्कमचरित्र व पत्रव्यवहार ' ( भा० २ रा, प्र० १४ वें पृ० ६१६ वें ) पहा. उ० १८२८ त शुक्रवारवाड्याच्या लांकडांनीं महाराष्ट्र काबीज करणारे वेलेस्लीसाहेबांचें स्मारक म्हणून १८३० त संगमावर माल्कमसाहेबांनीं एक पूल उघडिला. त्या वेळीं, त्यांनी शेंकडों ब्राह्मणांस दक्षिणा वाटिली. ( गायकवाडकृत, ' पुणें-शहराचें वर्णन, ' भा० १ ला, पृ० ११५ वे पहा ).

लावण्याचा त्यांनीं खरोखर विडाच उचलिला. ब्रिटिश पलटणींतील शिपायांला कित्येक प्रसंगीं फितविण्याच्या प्रयत्नांत व इतर खटपटींत त्यांस पकडण्यांत येऊन, त्यांची त्याविषयीं खात्री पटविण्यांत आली. त्यांच्या अंगीं अक्कलशून्यता व अहंमन्यता हीं असल्यामुळें, 'उपड्या घड्यावर पाणी आणि मूर्खाला सांगावी कहाणी.' किंवा 'लोकां सांगे ब्रह्मज्ञान, आपण कोरडे पाषाण.' असा प्रकार घडून येऊन, ता० ५ सप्टेंबर १८३९ ला अखेर त्यांस पदच्युत करण्यांत येऊन, श्रीक्षेत्र काशी येथें पाठविण्यांत आलें. न्यायदृष्ट्या, सदहू संस्थान खालसा करण्यांत आलें असतें; परंतु, माजी-राजसाहेबांच्या पूर्वीच्या राजनिष्ठेच्या शर्तीवर, त्यांच्या बंधूंस गादीवर बसविण्यांत आलें. मुंबईचे गव्हर्नर, सर जेम्स कॉर्नकसाहेब यांच्या शिफारशी-वरून, त्या बंडखोर राजेसाहेबांच्या जिवावरचें संकट तसें शेंपटा-वरच गेलें.

दृढ व उदार इंग्रजी राजसत्तेंत, महाराष्ट्राची शिपाइगिरी जाऊन त्यास नांगरकी मिळाल्यासारखें वरकांति दिसत होतें. परंतु वास्त-विक प्रकार सर्वस्वीं तसाच नव्हता. सिंधच्या भयाण वाळवंटांतून, अंधेऱ्या रात्रीं, वाटाड्याची चूकभूल झाल्यावरही, आठ दिवसांच्या कुचानंतर विश्वासघातकी अमीरांच्या भव्य इमामगडावर सर चार्लस नेपीयर यांनीं, रसदेची तूट, पाण्याची टंचाई, वगैरे अडचणी पाहून, २२ व्या राणीच्या उंटावरील ३५० शिपायांच्या गोऱ्या पलटणी व ९ वी बंगालची घोडेस्वारपलटण खांद्याशीं खांदा लावून लढणाऱ्या २५० मराठा स्वारांपैकीं ५० च बरोबर घेऊन, त्यांनीं सुरुंग लावून, तो किल्ला सर केला. (जॅन्युअरी १८४३) व पुढील महिन्यांत, त्याच गोऱ्या पलटणीबरोबर असलेल्या २२ वी

व २५ वी मराठा पायदळ पलटणी सेनापतीनें कर्कश परंतु स्पष्ट आवाजानें दिलेल्या हुकुमाबरोबर, ब्रिटिश आरोळी होतांच, तोफांचे मार लागून, सरासर उंच कड्याच्या हैद्राबादच्या मोठ्या किल्लयावर चढूं लागले. आपल्या समोरील शत्रूची जबरदस्त तयारी पाहून, त्यांनीं क्षणभर कच खाल्ली. तर जिकडे पहावें तिकडे बलुची शिपायांच्या तिखट तलवारी झळकत असून, ते मोठाल्या किंकाळ्या व वेडेवांकडे हावभाव करीत त्या राजनिष्ठ टोळ्यांवर घसरले. परंतु, तत्काळ मागून उत्तेजनावर उत्तेजन मिळतांच, त्या मराठ्या गड्यांनीं गोऱ्या शिपायांच्या खांद्याशीं खांदा लावून, त्यांस तोंड दिलें व अगदीं पुढें सरसावलेल्या घोळक्यास कापून काढिलें. साडेतीन तास खडाजंगी उडून, शेवटीं ब्रिटिश शिस्तीच्या जोरावर, त्यांची सरशी झाली. तरी, त्यांच्या सैन्याची तूट भरून काढण्या-करितां, बंगाल व पुणें येथील घोडेस्वारांच्या पलटणींची कुमक येतांच, रोज वाढत जाणाऱ्या जबरदस्त उन्हांतून, मियानीच्या रण-भूमीपासून ४० मैलांवर असलेल्या मिरपूरच्या तटबंदी शहराची मजल पुण्याच्या घोडेस्वार पलटणीनें गांठून, बलुचींच्या तावडींतून सिंधी लोकांस सोडविलें. दहा दिवसांतच, अमरकोटही त्यांनीं सर केला. येणें-प्रमाणें, दोन कडाक्याच्या लढाया मारण्यांत, सर चार्लस नेपीयर यांस मराठा सैन्यानें एवढा हातभार लाविला होता कीं, सिंध-विजयाचें श्रेय इतिहासकार डोळे मिटून त्यांस देतात. बंगालच्या शिपायांनीं सिंधुनदीच्या कांठच्या प्रदेशाचें रक्षण आपणांस दोन्ही डोळ्यांनीं नको असें म्हटल्यावर, ती कामगिरी मुंबईकडील पलटणीं-वर सोंपविण्यांत आली.

परंतु, सिंध व अफगाणिस्थान येथील रणांगणांत महाराष्ट्रक्षत्रिय राजनिष्ठा व शांतता प्रदर्शित करीत असतां, ग्वाल्हेर संस्थानांत उलट प्रकार दृष्टीस पडूं लागला. जनकोजी शिंदे हे निपुत्रिक मरण पावल्यावर, नेहमींची चढाओढ व खटपट सुरू झाली. गव्हर्नर-जनरल साहेबांनीं ज्यास राज्यकारभार पाहणारा म्हणून मानिलें होतें, त्या दिवाणास राणीसाहेबांनीं सोडचिठ्ठी दिली. याप्रमाणें ब्रिटिश सत्तेचा अपमान होतांच, रेसिडेंटसाहेबांनीं त्या दरबारांतून आपला गाशा गुंडाळला. संस्थानांत अत्यंत अंधेर माजून, सैन्याचें पाठबळ असलेल्या राज्यकर्त्या व्यक्तीनें ब्रिटिशसरकाराकडे वांकडा डोळा केला. ग्वाल्हेरकरांचें पंजाबच्या शीख लोकांशीं सूत्र जुळत होतें; व शिंदेसरकारशीं असलेला ४० वर्षांचा घरोबा मोडूं नये अशी लॉर्ड एलेनबरो यांची कळकळीची रदबदली जेव्हां फुकट गेली, तेव्हां त्यांनीं ग्वाल्हेरकडे सैन्याचा मोर्चा वळविला. मराठी सैन्यानें इंग्रजांवर महाराजपूर येथें हल्ला केला, परंतु मोठ्या निकराच्या लढाईनंतर, सर ह्यूज गफ यांनीं त्यांचा पराभव केला. त्याच दिवशीं, १२ मैलांवरील पनियार येथें कर्नल ग्रे यांनीं दुसऱ्या एका मराठी फौजेस जिंकिलें. राणीसाहेबांस आपला राज्याधिकार सोडून द्यावा

---

एल्फिन्स्टनसाहेबांचा ' पेशव्यांपासून जिंकिलेल्या प्रदेशासंबंधीं रिपोर्ट ' ( प्रो० जी. डब्ल्यू. फॉरेस्टकृत ' एल्फिस्टनसाहेबांच्या सरकारी लेखांपैकीं निवडक लेख १८८४ ची आ० पृ० २६१ वें )

सर रिचर्ड टेंपलकृत ' प्राच्यदेशांतील अनुभव ' ( १८८३ ची आ० पृ. ३४० वें ).

१ कॉक्सकृत ' मुंबईइलाख्याचा संक्षिप्त इतिहास ' ( पृ० ३१३-३१७, ३१९ व ३३० वीं व मेजर बेथॅमकृत ' मराठे व दख्खनी मुसलमान ' १९०८ ची आ० पृ० ७६-७७ वीं ) पहा.

लागला. डी. बॉयनीच्या तालिमींतील उत्कृष्ट फौज ९००० वर आणून ठेवण्यांत आली. संस्थानाच्या रक्षणार्थ, ब्रिटिश अंमलदारांखालीं एक पलटण ठेवण्यांत येऊन, तिच्या खर्चाकरितां एक मुलूख लावून देण्यांत आला. लॉर्ड एलेनबरो यांच्या तडफेमुळें, ग्वाल्हेरसंस्थानचें रक्षण होऊन, इंग्रजांचें शत्रुत्व संपादन करणाऱ्या पंजाबी शिखांशीं मराठी फौजेचें मेतकूट जुळलें नाहीं ( १८४३ ).

सिंधशिवाय, आणखी लहानशी जोड ब्रिटिश महाराष्ट्रास झाली. १८३८ च्या डिसेंबरांत, कुलाब्याच्या चांचे घराण्यांतील राघोजी आंग्रे हे मरण पावले. लॉर्ड क्लाइव्ह यांनीं घेरियाचे तट पाडून टाकिल्या दिवसापासून, आंग्रे यांनीं कांहीं बोध घेतला नाहीं. राघोजींची निष्ठुरता व जुलूम हीं इतकीं वाढलीं कीं, त्यांची प्रजा त्यांच्या अधिकारास अंगारका ( मंगला ) ची उपमा देऊं लागली. त्यांच्या मागें जन्मास आलेला मुलगा हा १८४० त निवर्तल्यामुळें, आंग्रेकुल हें निर्वंश झालें. कुलाबा संस्थान खालसा होऊन, त्याची वहिवाट प्रथम एका एजंटाकडे राहून, नंतर त्याचा कुलाबाजिल्हा झाला. उंदेरीच्या समुद्रदुर्गातील किळसवाण्या अंधार कोठडींत जे २४ कैदी पायांत मोठाले जंजीर, अंगावर घाण व रोग, पिण्याच्या पाण्याशिवाय इतर पाण्याचे नांवानें ज्यांस आळंक्षा असे ३ पासून २० वर्षें बंदिवास सार्थक किंवा निरर्थक भोगीत असलेले सोडून देण्यांत आले.

कोल्हापूर संस्थानावरही स्वारी करण्याची गरज लागली. १८१७ त, तेथील अधिपतींनीं ब्रिटिश सरकारास मनापासून मदत केली होती. त्यांच्या मागून गादीवर आलेल्या बाबासाहेबांनीं सर्व प्रजाजनांस ‘ त्राहि त्राहि ’ करून सोडिलें. व,

अनेक वेळां, मुंबईसरकारास त्यांच्या राज्यकारभारांत दांडगाईनें हात घालावा लागला. हे राजे १८४२ त मरण पावले. त्यांस २ मुलगे होते. राज्यांतील अंधेर पाहून, ब्रिटिश अधिकाऱ्यांनीं संस्थानची व्यवस्था आपणांकडे घेतली; व बेळगांव येथील पोलिटिकल एजंटच्या तंत्रानें वागणारा एक एतद्देशीय दिवाण नेमिला. संस्थानांतील मजबूत किल्ल्यावरील वंशपरंपरागत रखवालदार मंडळीस बडतर्फ करण्यासारख्या अनेक सुधारणा करण्यांत आल्या. त्यामुळें, असंतोष उत्पन्न होऊन, १८४४ त सावंतवाडीकरांच्या साह्यानें एक बंड उभारण्यांत आलें. त्याचें स्वरूप एवढें भयंकर होतें कीं, घाटावरील व घाटाखालील धामधूम बंद करण्यास औटरॅमसाहेबांच्या हाताखालील दहा हजार शिपायांच्या नाकांत दम आला. पन्हाळा किल्ल्यावर तोफांचा भडिमार करून, त्याचे कांहीं तट जमीनदोस्त करून, तो सर करण्यांत आला. कोल्हापुराकरितां, एका स्वतंत्र पोलिटिकल सुपरिंटेंडेंटची नेमणूक करण्यांत आली.

येणेप्रमाणें, अर्वाचीन महाराष्ट्रास शांततेचे दिवस लाभत असून, त्याबरोबर त्यास सुधारणेचा लाभ होऊं लागला होता. तों, १८४५ त, घाटांतले लढवय्ये कोळी लोक व नाशिकचा दरोडेखोर राघोजी आंग्रया यांशीं प्रसंग पडला. नाशिक व अहमदनगर जिल्ह्यांतील मारवाड्यांस छिन्नविछिन्न करून, त्यांस लुबाडण्याचा त्यानें सपाटा लाविला होता. जिकडे तिकडे त्याचें नांव ऐकून लोकांच्या अंगाचा थरकांप होऊं लागला, परंतु पोलिसानें इतक्या हिम्मतीनें त्याचा पाठलाग केला कीं, त्यानें आपली टोळी सोडून देऊन, काळें केलें. १८४७ त लेफ्टेनंट ( नंतर जनरल झालेले )

जेल यांनीं त्यास पंढरपूर येथें चतुर्भुज केलें. अनेक खुनांबद्दल, त्यास फांशी झाली.

१८४८ त, आपल्या दूरच्या भाउबंदाचा एक मुलगा मांडीवर घेऊन, सातारचे राजे मरण पावले. हिंदुधर्मशास्त्राच्या दृष्टीनें, हा दत्तक आपल्या दत्तकपित्याच्या खासगी मालमत्तेचा वारस होऊन, त्याच्या श्राद्धादि क्रियेचा अधिकारी होतो. परंतु, प्रस्तुत संस्थान हें इंग्रजांची सृष्टि असल्यामुळें, असा पक्ष निघाला कीं, सार्वभौम सत्तेच्या संमतीशिवाय राज्याचा अधिकारी होणारा दत्तक राजांस घेतां येत नाहीं. सातारकरांनीं तशी संमति घेतली नसल्यामुळें, त्यांच्या मागें, त्यांचें संस्थान लॉर्ड डलहौसी यांनीं खालसा केलें ( १८४९. ) अशी खालसाची वहिवाट मोंगलांच्या अमदानींतही होती. जे सुभेदार बहुतेक स्वतंत्र होऊन बसले, त्यांस दत्तविधान व वारसा या बाबतींत वरिष्ठसरकारची मंजूरी घ्यावी लागत असे. खालसाच्या तत्त्वाचा जरी विचार घटकाभर बाजूस ठेविला, तरी एखादें संस्थान खालसा करणें हें अधिक सोयस्कर होतें. सदर्हू राजे यांनीं महाराष्ट्रांत आपल्याविषयीं उत्साह उत्पन्न केलेला नसल्यामुळें त्यांच्या नामधारी दत्तकाविषयीं कोणास कांहीं वाटलें नाहीं. ज्या सत्तेनें इतर महाराष्ट्रभागासाठीं एवढी कामगिरी केली होती, तीखालीं येणें हें सातारकरांसही अत्यंत श्रेयस्कर होतें.

येणेप्रमाणें, शिवाजीवंशाची वाट लागली. तीच पेशवेवंशाची स्थिति झाली. बाजीराव हे धोंडोपंत ऊर्फ नानासाहेब यांस दत्तक घेऊन, वृद्ध, अशक्त, अर्धांगवातपीडित, बहुतेक अंध असे ७७ वे वर्षीं १८५३ त मरण पावले. अफगाणयुद्धावेळीं, त्यांनीं इंग्रजसरकारास रु. ५,००,००० उसने दिले होते, व शीखयुद्धांत

१००० घोडेस्वार व १००० पायदळ पुरविलें होतें. अशी ठळक राजनिष्ठा त्यांनीं व्यक्त केली होती. त्यांच्या मागें,वर आलेले नानासाहेब त्यांच्या[1] रु० ३०,००,००० च्या खासगी मालमत्तेचे मालक झाले. शिवाय, त्यांस बिठूर ( ब्रह्मावर्त ) हें गांव व हा तालुका तहाहयात मिळाला. परंतु, त्यांस आपल्या बापाचें पेंशन मिळालें नाहीं म्हणून वाईट वाटलें.

हें खालसारूपी उंटाचें पिलूं नागपूर व झाशी येथेंही दृष्टीस पडलें. तेव्हां लोकांच्या[3] तोंडून ' अन्याय ! अन्याय ! अब्रह्मण्यम् ! अब्रह्मण्यम् ! ' असें तारस्वर निघूं लागले. धर्मस्वातंत्र्याच्या[4] नांवाखालीं, धर्मभ्रष्टांस वारसा सांगण्याचा हक्क मिळाला. स्त्री-पुरुषांवर पगडा बसावा, म्हणून ' विधवाविवाहाचा कायदा, ' पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर यांच्या चळवळीमुळें, पसार झाला. इंग्रजी विद्येच्या प्रसारार्थ, हायस्कुलें, कॉलेजें व युनिव्हर्सिटी यांची स्थापना झाली; जनमनोरंजनार्थ, उद्यानभूमिका, पुस्तकालयें व पदार्थसंग्रहा-

---

१ पुढील पृ० ३१ वे, टीप २९ वी पहा.

२ केकृत ' शिपायांच्या युद्धाचा इतिहास ' ( भा० १ ला. पृ० १०० वें ) पहा.

३ एल्फिन्स्टनसाहेबांसारखे धोरणी पुरुषही या लोकपक्षाचे असून, डल्हौसीसाहेबांच्या अयोग्य राजनीतीचे योग्य फळ , ५७ सालचें बंड होय असें त्यांचे मत होतें. ( प्रो० जी० डब्ल्यू. फॉरेस्ट बी. ए. कृत ' मौंट स्टयुअर्ट एल्फिन्स्टनसाहेबांच्या सरकारी लेखांतील निवडक लेखांची, प्रस्तावना १८८४ ची आवृत्ति, पृ० ७३ वें पहा ). ही सरकारची कृति म्हणजे रोग्यानें गोळ्या खाऊन, गोळ्यांच्या पेटीचेंही भक्षण करण्यासारखे आहे असें जॉन कॅपर यांचेही मत होतें ( हिंदुस्थनाचे ३ इलाखे ' हा त्यांचा ग्रंथ पहा.

४. उ० रेव्हरंड जार्ज बोवेन व विष्णु भिकाजी गोखले ( ऊर्फ विष्णुबोवा ब्रह्मचारी, यांचे वादविवाद. )

लयें; दीनदुबळ्यांच्या औषधपाण्याकरितां, धर्मार्थ दवाखाने व इस्पितळें; वाटसरूंच्या सोयीकरितां, धर्मशाळा व पाणपोया; स्वस्त पोस्ट, तारायंत्र, आगगाडी हीं सर्व प्रतिपौराणिक अस्त्रें शोधून, तद्वारें लोकांस आचाररहित करून, त्यांस एकसूत्रांत ग्रथित करण्याची युक्ति सरकार योजीत आहे अशी आफवा, वणव्याप्रमाणें, जिकडे तिकडे सपाट्यानें फैलावली. तिचा केवढा भयंकर परिणाम झाला तें पुढील प्रकरणांत येईल.

# प्रकरण ४ थें.



## भयंकर उत्पात. ( १८५७–५८ ).

उन्हाळ्यांत एके दिवशीं संध्याकाळीं, गंगेच्या कांठीं, बाजीरावांचे दत्तक, नानासाहेब, हे काळसर, स्थूल, सरळ, निर्व्यसनी, शांत, मनमिळाऊ, धर्मभोळे आपल्या पातकामुळें गंगा दूर गेली असें समजून, तिला ठिकाणावर आणण्याकरितां तिच्या पात्रावर एक शीड पसरून रु. १,००,००० चा धर्म करणारे गृहस्थ आपल्या परिवारासह बिठूर [ ब्रह्मावर्त ] घाटावर बसले असतां, तेथून ६ कोसांवरील कानपूर छावणींतून तोंडास फेंस आलेला घोडा उधळीत एक स्वार त्यांच्या जवळ येऊन, त्यांस लष्करी थाटानें मुजरा करून, म्हणाला, " हुजूर, देहलीके तख्तपर मोगलबादषाह फेर गद्दीनशीन हुए है । हुजूरको हिंदुओंकी परवरिष

---

१ केकृत ' शिपायांच्या युद्धाचा इतिहास ' ( भा. १ ला, पृ० १०१ वें ) पहा.

करना इख्तियार हो, तो हुजूरने इसी वख्त कानपुरपर हम्ला करना चाहिये।"

यावर, नानासाहेबांसारख्या तिशीच्या आंत बाहेर असणाऱ्या तरुणानें असा दूरवर विचार केला कीं, इंग्रजी अंमल दूरच्या पंजाबांतच नव्हे, तर जवळच्या अयोध्याप्रांतांतही गाजूं लागला आहे. इंग्रजांचें धोरण, इंग्रजांची शक्ति, इंग्रजांचा अधिकार हीं, मारुतीच्या पुच्छाप्रमाणें, कोठवर पसरतील याचा नेम नाहीं. आपले शिक्षक, टॉडसाहेब, यांच्या तोंडून इंग्रजांच्या सार्वभौमत्वाचा डंका आपल्या कानावर हरहमेष येत आहे. आपण स्वतः कानपूरच्या लष्करी अंमलदारांना मेजवान्या देत आहों. आपण स्वतः त्यांचे दोस्त म्हणवूं पाहत आहों. खुद्द कानपूरचे कमिशनर हे आपल्या तर्फेचे आहेत. तेव्हां, आपले काय ते १०० हत्यारबंद किंवा बाहेरचे हजारों बंडखोर शिपाई घेऊन, आपण इंग्रजांवर तुटून पडणें म्हणजे 'खाल्लयाघरचे वांसे मोजण्यासारखे आहे!'

नानासाहेबांचें एक मन असें करीत आहे, तों दुसरें असें करूं लागलें कीं, अझिम-उल्ला हा पूर्वी कानपुरांतील साहेबलोकांचा खिसमतगार व नंतर शाळामास्तर होता खरा. तरी, त्याचें शारीरिक सौंदर्य, त्याचें आंग्ल भाषेंतील नैपुण्य, त्याच्या बुद्धींतील तारतम्य, त्याच्या वाणींतील माधुर्य, त्याचें विलायतीच नव्हे तर इस्तंबुली शक्तिरहस्य हीं सर्व डोळ्यांपुढें येऊन, तो म्हणतो त्याप्रमाणें कदाचित् रूसबरोबर लढलढून भागलेल्या इंग्रजांत त्राण राहिला नसेल, त्यांनीं आपल्यासारख्यांचीं पेंशनेंच काय, राज्येंचीं राज्यें घशांत घातलीं आहेत! त्यांजवळ गोडीगुलाबीनें आपली दाद

लागत नाहीं ! तर, अशा प्रसंगीं दंडनीतीचा अंगिकार करणें हें सयुक्तिक आहे.

असा निश्चय करून, कानपूरच्या स्वारास रुकार देऊन, नानासाहेबांनीं त्यास रवाना केलें.

इकडे, कानपूरछावणीचे बचावासाठीं, जनरल व्हीलर यांनीं तीभोंवतीं एक खंदक खणवून, तेथें येऊन राहिलेल्या आसपासच्या गोरे लोकांस व आपल्या पलटणीस महिनापंधरादिवस पुरेसा अन्नपाण्याचा पुरवठा करून ठेविला होता. कानपूर तिजोरींत, नानासाहेबांच्या वडिलांनीं पुष्कळ ठेवें ठेविली होती; तसाच, तेथें रु० ८,००,००० सरकारचा वसूल जमा होता. त्याच्या रक्षणार्थ, मॅजिस्ट्रेटसाहेबांनीं नानासाहेबांस आपल्या भेटीस बोलावून, प्रस्तुत भयंकर प्रसंगीं वाढविलेल्या आपल्या फौजेपैकीं कांहीं हत्यारबंद लोक इकडे मदतीस पाठवून, इकडील कांहीं गोरे लोकांचीं कुटुंबें ब्रह्मवर्तास घेऊन जाण्यास सांगितलें.

परंतु, वर आल्याप्रमाणें, जेव्हां नानासाहेबांच्या पाठीशीं बंडवाल्यांचा नेट लागला, तेव्हां नानासाहेबांस त्यांचें धुरीणत्व पत्करावें लागून, त्यांनीं कानपुरास वेढा दिला. शेवटीं, अझिम-उल्लाकडून इंग्रजांस इंग्रजींत असा खलिता आला कीं, लॉर्ड डलहौसी

---

१ रु. ३०,००,००० ची ( केकृत ‘ शिपायांच्या युद्धाचा इतिहास, ’ भा० १ ला, पृ० १०२ पहा ) परंतु, कानपूर कमिशनरप्रमाणेः—

रु० १६,००,००० ( सरकारी प्रॉमिसरी नोटी )
,, १०,००,००० ( रत्नें )
,, ८०,००० ( डागडागिणे )
,, २०,००० ( रुप्याचीं ताटें )

यांच्या कृतीशीं ज्यांचा संबंध अर्थाअर्थी नसेल व जे आपलीं शस्त्रें खालीं ठेवण्यास तयार असतील, त्यांस अल्हाबादेस सुरक्षित पोंचविण्यांत येईल. त्यावर कोणाची सही नसून, कानपूरच्या ग्रीनवे या श्रीमंत व्यापारी घराण्यांतील नानासाहेबांस रु० ३,००,००० देऊन, त्यांच्या आश्रयास येऊन राहिलेल्या एका युरोपियन स्त्रीनें तें पत्र जनरल व्हीलर यांस आणून दिलें.

तेव्हां, तें वाचून, जनरलसाहेबांनीं त्या मडमेस खोदखोदून त्या संबंधीं सवाल केले. तशी, तिनें आपली सर्व हकीकत त्यांस सांगितली. ती म्हणाली कीं, "मला आपल्या गतवैभवाचें स्मरण होऊन, प्रस्तुत कारागृहवास फार जाणवतो. माझे खाण्यापिण्याचे, बसण्याउठण्याचे, हिंडण्याफिरण्याचे फार हाल होतात. मला चहाच्या जागीं पेज, पावबिस्कुटांच्या जागीं डाळरोटी, टेबल-खुर्चीपलंग यांच्या जागीं जमीन, गाडीघोड्यांतून मोकळ्या हवेंत ख्यालीखुशालींत फिरणाच्या जागीं टीचभर अंगणांत फेरफटका, कधीं नावेणी ना फणी, कधीं ना वाचन ना लेखन, कधीं ना गायन ना वादन. असें जरी सारखें १२ महिने १३ काळ चाललें आहे, तरी दुःखांत सुखाची गोष्ट ही कीं, नानासाहेबांनीं किंवा त्यांच्या बैठकींतील कोणत्याही गृहस्थानें माझ्याकडे वर डोळा करून पाहिलें नाहीं. इंग्रजांनीं नानासाहेबांचें पेन्शन चालू न ठेविल्यामुळें, त्यांस इंग्रजांची चीड आलेली आहे, तरी, त्यांनीं मजवर हात टाकिला नाहीं.[1] "

बाजीरावांनंतर, नानासाहेबांनीं हरदासांच्या तोंडून ही पंतांची अमोल उक्ति 'धर्मन्यायविरोधें कोणाचेंही न इष्ट साधेल' ऐकिली

---

१. कॅप्टन मोब्रे टॉम्सनकृत 'कानपूरकथा' ( पृ० १५१ वें ) पहा.

असेल, एवढेंच नव्हे, तर शिवाजीमहाराजांनीं कल्याण येथें व चिमाजी आप्पांनीं वसई येथें इंद्रियनिग्रहाचा जो उत्कृष्ट धडा घालून दिला होता, तो नानासाहेब विसरले नसतील असें ग्रीनवेच्या साक्षीवरून स्पष्ट दिसतें. असो.

नानासाहेब हे आपलें वचन खरें करतील या गोष्टीची खात्री पटविण्याकरितां जनरल व्हीलर यांनीं त्यांचे ३ इसम ओलीस ठेवून, १।२ दिवस तयारींत गेल्यावर, ता० २७ जून १८५७ रोजीं, सकाळचे ९ वाजतां, सर्वजण नावांत बसून, गंगा ओलांडून जावयास निघाले. नावा अगोदरच रेतींत रुततील इतक्या कांठाजवळ आणून, त्यांवरील छपरांत हळूच निखाऱ्यांनीं आग लावून, इशारा होतांच, नावाड्यांनीं जमिनीवर उड्या टाकिल्या. तसें, त्या गोरे लोकांची पाठराखण करणाऱ्या बंडखोरांनीं त्यावर आपल्या बंदुका झाडिल्या !

त्या वेळीं, त्या पेटलेल्या नावांतील निःशस्त्र पुरुष व केविलवाणीं बायकामुलें यांवर जो दुर्धर प्रसंग गुदरला, त्याचें वर्णन करितां येत नाहीं.

या घोर पापाचें प्रायश्चित्त देण्याकरितां, जनरल हॅव्हलॉक् हे इकडे येत आहेत असा सुगावा लागतांच, तात्या टोपी, लालपुरी-

---

१. या घोर पापाची कल्पना कोणीं काढिली हा प्रश्न वादग्रस्त आहे; ( १ ) 'शिपायांच्या युद्धाचा इतिहास' लिहिणारे के साहेब यांस नानासाहेबांचेंच हें कृत्य आहे असें खात्रीने सांगतां येत नाहीं ( पु० २ रें, पृ० ३७२ वें पहा ); ( २ ) कानपूरचे एक रक्षक, 'कानपूरकथा' कार, कॅप्टन मोब्रे टॉम्सन हे त्या कृत्याचें खापर 'नाना-अझिमउल्ला अँड कंपनी' हिच्या शिरावर फोडितात ( पृ० १९५

पुढे चालू

बोवा गोसावी व जळका रामभाऊ यांसह नानासाहेब, बाळासाहेब हे सुमुहूर्तावर ब्रह्मावर्ताहून निघून, कानपुरास आले. त्या वेळीं

मागील पृष्ठावरून पुढें चालू

वे पहा ); ( ३ ) कानपूरची कत्तल होण्यापूर्वी, नानाने जनरल व्हीलर यांस दिलेलें वचन हें दिल्लीच्या मोगल बादशहाने कलकत्त्यास युरोपियन लोकांस सुरक्षित पोंचविण्याविषयीं दिलेल्या वचनासारखें होतें असें ' हिंदुस्थानच्या इतिहासांतील एका अप्रसिद्ध प्रकरणा ' चे कर्ते विल्बर्फोर्ससाहेब म्हणतात ( आ० २ री, पृ० ७७ वे पहा ) ( ४ ) हिंदुस्थनासरकारचे दफ्तरदार, फॉरेस्टसाहेब, यांनीं नानासाहेबांच्या कैदेंत राहिलेले इंग्रजांकडील जासूद, शेपर्डसाहेब, यांचा वृत्तान्त दिला आहे. त्यांनीं या पातकाचे जबाबदार चिटणीस अझिमउल्ला व सेनापति तुकासिंग यांस धरिले आहे ( ' लष्करी खात्याचीं कागदपत्रे ' पुस्तक २ रें, पृ० १३९ वें पहा ); एकंदर मराठी राष्ट्र हे मुसलमान लोकांपेक्षां ज्ञान, शौर्य, औदार्य व सुधारणा यांत मागासलेलें आहे, तरी तें मुसलमान लोकांहून अधिक निर्व्यसनी, दयाळू, शांत व वेदान्ती आहे असा एल्फिन्स्टनसाहेबांचा अभिप्राय आहे ( प्रो० फॉरेस्टसंपादित ' एल्फिस्टनसाहेबांचे निवडक सरकारी लेख ' पृ० २६१ वें पहा ). ( ६ ) वेदमूर्ति विष्णुभट गोडसे यांनी आपल्या ' उत्तरहिंदुस्थानांतील प्रवासांत, ' नानासाहेब हे निर्दोषी असून बंडवाले हे त्यांचा पगार खात नसल्यामुळें, त्यांस जुमानीत नसत असे म्हटले आहे ( पृ० ३७-४७ वी पहा ); ( ७ ) बाजीरावसाहेब, नानासाहेब व रावराजे दिनकरराव यांच्या तैनातीत राहून होळकर सरकारकडून दरमहा रु. १० पेंशन खात बसलेले, ८२ वर्षांचे वेदमूर्ति विनायकभट्ट वाकणकर यांची साक्ष, १९०३ सालीं प्रसंगवशांत् घडलेल्या भेटींत, अशीच पडली होती; व ( ८ ) तिचे पुष्टीकरण, १९१० सालीं काकतालीय न्यायानें आगगाडींत भेटलेले, लष्कर-ग्वाल्हेर येथले ७५ वर्षांचे वेदमूर्ति रामभट्ट अहोरात्रे यांनीं केले;

' ना विष्णुः पृथिवीपतिः ' ( राजा हा विष्णु होय ) किंवा, The King can do no wrong ' ( राजाच्या हातून पाप घडूं शकत नाहीं ) या

ब्रह्मावर्तीतील शास्त्री मंडळींनीं अशी अटकळ बांधिली होती कीं, ज्या अर्थीं या फौजेनें स्त्रियांचा व बालकांचा वध केला आहे, त्या अर्थीं ती विजयी होऊन परत येणार नाहीं. तिला वाटेंत अनेक अपशकुनही झाले. प्रथम, तिला एक मांजर आडवें आलें; नंतर, एक तेलंग ब्राह्मण टोपलीभर भस्म घेऊन पुढें आला; नंतर, एक मोळीविक्या भेटला; नंतर नानासाहेबांचा घोडा घटकाभर अडला व रावसाहेबांच्या घोड्याच्या डोळ्यास पाण्याची धार लागली.

तरी कानपूरची लढाई जशी व्हावयास पाहिजे, तशी ती निकराची झाली. इंग्रजांकडील पलटणी चवताळलेल्या होत्या. त्यांच्या तोफा चांगल्या होत्या. पेशव्यांच्या फौजेचा नाश भराभर होत होता. तरी, नानासाहेब व बाळासाहेब हे त्यांचें उट्टें काढण्यांत कसूर करीत नव्हते. शेंपन्नास स्वार बरोबर घेऊन, गोलंदाजांस कापून काढून, तोफेच्या कानीवर खिळा ठोकण्याचीं कामें चालू

---

पुढें चालू.

जनसंकेताप्रमाणें, राजाज्ञेनें केलेल्या कृत्याबद्दल मंत्र्यावर जबाबदारी ( Ministerial Responsibility ) असते; अशी सुधारणेच्या शिखरावर पोंहचूं पाहणाऱ्या देशांतही कल्पना आढळते. हॉलंडांतील प्रॉटेस्टेंटां ( धर्मसुधारकां ) विरुद्ध फ्रान्सांतील कॅथलिक्स ( जुन्या धर्मपंथाचे लोक ) यांना मदत करूं नये असें लॉर्ड डॅबी यांचें स्वताचें मत असूनही, दुसऱ्या चार्ल्स राजाच्या हुकमावरून तसें केल्याबद्दल ‘ गुरोरपराधे शिष्यो दंड्यः ’ ( गुरूचा अपराध झाला असतां, त्याबद्दल शिष्यास शिक्षा करावी ) असा विपरीत प्रकार इंग्लंडच्या इतिहासांत घडलेला आहे. परंतु, प्रस्तुत नानासाहेबांच्या बाबतींत, ‘ शिष्यापराधे गुरुर्दंड्यः ’ ( शिष्याचा अपराध झाला असतां, त्याबद्दल गुरूला शिक्षा करावी ) असा प्रकार घडलेला आहे. त्याच्या न्याय्यान्याय्यतेचा निर्णय वरील ८ महत्त्वाच्या साक्षींवरून होण्यासारखा आहे.

होतीं. तों, सूर्यास्त झाला. अंधार पडला. चंद्रज्योती झळकल्या. मशाली पेटल्या.

असे, सारखे १० दिवस बंडवाले लढले. शेवटीं, तोफांच्या व बंदुकांच्या धुरानें दिसेनासें झालें. धुळीनें डोळे भरून गेले. वारा अंगावर आला. तसे, आळीपाळीनें, चिनीपुरी खाऊन, भिस्त्यांपासून ओंजळीनें पाणी पिऊन, लढत राहणारे शिपाई पळूं लागून, रण फुटलें. गोरे लोकांनीं मोर्च्यांतून तोफा बाहेर काढून, त्यांचा पाठलाग केला. बाळासाहेब मात्र, शेवटपर्यंत, गोलंदाजांना धीर देत लढत राहिले. तेव्हां, नानासाहेब व रावसाहेब यांनीं त्यांस सांगितलें कीं, " आतां, येथें राहून रांडमरणानें मरण्यापेक्षां, येथून निसटून जाऊन, पुन्हा लढाईची तयारी करणें हें बरें. "

असा एक विचार करून, ते तिघे बंधू ब्रह्मावर्ताकडे परत गेले. तेथून, आपल्या स्त्रियां ( म्हणजे तिघांच्या तीन बायका, बाजीरावसाहेबांचें कुटुंब व त्यांची औरसकन्या अशा पांचजणीं ) सह, रामदासस्वामींनीं महाराजांस प्रसादार्थ दिलेल्या छाट्या, थोरले माधवरावसाहेबांचें अमोलिक रत्नासारखें वडाचें पुष्प, दक्षिणावर्त शंख, गौरीशंकर हा अत्युत्तम कांतीचा बाण, आणखी कांहीं राजरत्नें शेल्यांत घेऊन, देवास नमस्कार करून, संपत्तीनें भरलेल्या आपल्या वाड्यांतून बाहेर पडले. त्यांबरोबर लहानपणापासून वाढविलेला राघोबा हा शिष्य निघाला. गंगेची पूजा करून, पोंचवावयास आलेल्या ब्राह्मणमंडळींस नमस्कार करून आपल्या प्रजाजनांची क्षमा मागून, रात्रीं मेणबत्त्या लावून, स्वतः नाव वल्हवीत, ते गंगा उतरून, लखनौच्या मुलखांत शिरून, तेथल्या

बेगमेस जाऊन मिळाले. पुढें, नानासाहेबांचें काय झालें तें अवगत नाहीं.

परंतु, त्यांचे सेनापति तात्या टोपी हे कानपुराहून पळून, अंतर्वेदी ओलांडून, तेथील बंडवाल्या पलटणीच्या साहाय्यानें, थोड्या गोऱ्या लोकांपासून किल्ला घेऊन, त्यांनीं काल्पींत श्रीमंतांच्या नांवानें बंदोबस्त केला. नंतर, पलटणींच्या सांगण्याप्रमाणें २५ स्वार लखनौकडे रवाना करून, तिकडून रावसाहेब यांस यजमान म्हणून इकडे आणिलें. उत्तरेस, लालपुरी बोवा थोड्या फौजेसह यमुनेच्या घाटावर घाटनाकें धरून राहिले; दक्षिणेस, जळके रामभाऊ हे राहिले; पश्चिमेस, सरदार लक्ष्मणराव शिंदे हे राहिले; व सर्वांवर देखरेख ठेवण्याकरितां, तात्या टोपी, हे जिकडे तिकडे फिरत राहिले. नवीं पलटणें ठेवून, त्यांस शिकवावयाचें काम सुरू झालें. याप्रमाणें, काल्पी प्रांतात पेशवाईचे भगवे झेंडे फडकूं लागले.

आतां, झांशीकडे वळलें, तरी तीच शोचनीय स्थिति झालेली पहावी लागते. झांशीचे सुभेदार, गंगाधरराव, हे निपुत्रिक होऊन मरण पावतांच, त्यांच्या एकंदर राजनिष्ठ वर्तनाकडे दुर्लक्ष्य करून, त्यांच्या अंतकाळच्या दत्तविधानाच्या इच्छेस न जुमानून, त्यांची पत्नी लक्ष्मीबाई यांनीं घेतलेल्या दत्तकास केवळ खासगी मिळकतीचा मालक ठरवून, बाबू उमेशचंद्र बॅानर्जी या विद्वान् बॅरिस्टराची शिष्टाईही विलायतेंत फुकट जाऊन, खुद्द पोलिटिकल एजंटच्या शब्दासही वाटाण्याच्या अक्षता मिळून, संस्थान खालसा झालें. सरकारनें लक्ष्मीबाईस रु० ५०००|६००० दरमहा पेन्शन व रु० १००,००० ची काय ती खासगी मिळकत ( वाडा वगैरे ) दिली. परंतु, धर्माप्रमाणें, त्यांना केशवपनार्थ श्रीक्षेत्र काशी येथें

जाऊं दिलें नाहीं; एवढेंच नव्हे, तर त्यांच्या ऐनराजधानींत गोहत्त्या आरंभून, त्यांचें कुलदैवत महालक्ष्मी हिच्या मंदिराकडील गांवही घेतले ( जुलै १८५७ ).

प्रस्तुत प्रसंगीं, लक्ष्मीबाई या पंचविशीच्या आंतबाहेर असून, त्यांचें सौंदर्य, त्यांचें बुद्धिवैभव, त्यांचें शौर्य हे गुण अलौकिक होते.[1] त्यांचा उत्साह हा पुरुषाप्रमाणें असून त्यांची सूड उगविण्याची बुद्धि ही स्त्रियांप्रमाणें होती. त्या उत्सुकतेनें बंडाची वाट पाहत होत्या. पोलिटिकल अधिकाऱ्याशीं बोलतांना, आपला स्वभाव किती काबूंत ठेवावा हें त्यांना माहीत होतें. मराठी राष्ट्राची जी खरी उपजत बुद्धि, तिचे जोरावर स्वसंरक्षणार्थ फौजफांटा ठेवण्याची त्यांनीं परवानगी मिळविली होती.

' समानशील-व्यसनेषु सख्यं '[3] या कविवचनानुसार, त्यांचे बाळपणचे खेळगडी, व सध्यांचे समदु:खी जे नानासाहेब, त्यांशीं त्यांनीं गुप्त पत्रव्यवहार सुरू केला होता. त्यांना पतिसुखाचें वारें लागलें नव्हतें, त्यांना राज्यसुखाचे दिवस लाभले नव्हते; तरी, ' शिशिरमथित पद्मिनी ' प्रमाणें त्यांची अवस्था नव्हती. त्यांनीं महालक्ष्मीस रोज नवचंडी चालविली होती; गणपतीस अथर्वशीर्षाचीं आवर्तनें चालविलीं होतीं; ग्रहांबद्दल जप व दानें चालविलीं होतीं; काम्य ग्रहयज्ञ गृह्यपरिशिष्टोक्त सहस्रपक्ष कुंडमंडपासहित चालविला होता. व वाड्यांत, केशवपन न झाल्या-

---

१. वेदमूर्ति विष्णुभट्ट गोडसे यांचा ' उत्तर हिंदुस्थानांतील प्रवास ' ( ११८९ ) पहा.

२. केकृत ' शिपायांच्या युद्धाचा इतिहास ' ( भा० ३ पृ० ३६० ) पहा.

३. ज्यांचें शील व व्यसन सारखें असतें, त्यांत सख्य होतें.

बद्दल, रोज स्वतः ३ कृच्छ्रें प्रायश्चित्त, तुलसीपूजा, श्रीपार्थिवलिंग-पूजा इतकीं अनुष्ठानें उरकवून, त्या पुराणश्रवण करीत असत.

त्यांनीं अलंकार-त्याग केला होता. म्हणजे नथ वगैरे दागिने त्यांनीं अंगावर घातले नाहींत; परंतु, आपल्या इभ्रतीस्तव, बोटांत एक हिऱ्याची अंगठी, हातांत सोन्याचे गोट व बांगड्या, व गळ्यांत एक मोत्यांचें पेंडें इतके जुजबी दागिने त्या अंगावर घालीत असत. त्या केंसांचा बुचडा बांधीत असत; पांढरा शालू व पांढरी चोळी वापरीत असत. शरीराचा षोक मात्र लहानपणापासून होता तसाच कायम ठेवून; पहाटे जोर, जोडी, मलखांब, घोडादौड यांत वेळ घालवून; अभ्यंगस्नान, पूजन, भोजन, वामकुक्षि आटपून; पायांत पायजमा, अंगांत जांभळे आंबव्याची बंडी, डोक्यावर टोपी घालून तीवरून पागोट्यासारखी बांधिलेली चंदेरी बत्ती, कमरेस काच्या किंवा जरीचा दुपेटा व त्यास लटकाविलेली तरवार अशा मर्दानी थाटानें कधीं, तर कधीं नेहमीच्या स्त्री-वेषानें, ती गौरवर्ण, उंच, गौरीसारखी मूर्ति दरबारांत विराजमान होऊन, लोकांस तात्काळ हंसक्षीरन्याय देत असे. त्यामुळें, प्रजा तीवर प्रेम करीत असे. याप्रमाणें, अहल्याबाई होळकरिणीप्रमाणें झांशीच्या लक्ष्मी-बाईची ख्याति असे.

सूर्यकांतमणि स्पर्शानुकूल झाला, तरी तो अन्य तेजाकडून आपला पराभव होऊं देत नाहीं. राघोबादादांस अहल्याबाईनीं आपला पाडाव करूं दिला नाहीं; तसा इंग्रजांस लक्ष्मीबाईनीं आपला काबू चालूं दिला नाहीं. ‘ शरण आलेल्यास मरण देऊं नये. ’ या आपल्या जुन्या समजुतीप्रमाणें त्यांनीं शिपायांच्या बंडाच्या भीती-स्तव किल्ल्यांत आलेल्या गोऱ्या मंडळीस दोन दिवस रसद देऊन,

करेऱ्याहून १०० हत्यारबंद लोक मागवून, त्यांस त्यांच्या रक्षणार्थ एक दिवस ठेविलें होतें. याप्रमाणें, त्या दिवशीं, लक्ष्मीबाईनीं हें पुराणवचन सार्थ केलें:—

* उपकारिषु यः साधुः साधुत्वे तस्य को गुणः ?।
अपकारिषु यः साधुः स साधुः सद्भिरुच्यते ॥

राणीसाहेबांनीं मेजर स्कीन व कॅप्टन गॉर्डन ( माजी पोलिटिकल एजंट ) यांस दुसरे दिवशीं, दतियास जाऊन, तेथील राजाचा आश्रय करण्यास सांगितलें. परंतु, त्यांच्यानें तेवढें देखील झालें नाहीं.

अखेर, ता० ७ जून १८५८ रोजीं, रात्रीं दहांचे सुमारास, छावणींतून बंदुकींचे तडातड आवाज कानीं येऊन, तेथील आग दिसूं लागली. तेथील गोऱ्यांची कत्तल उडाली. तेथला दारूगोळा हिसकण्यांत आला. तेथला तुरुंग फोडण्यांत आला. तुरुंगाधिपतीच्या पुढारीपणाखालीं, इरेग्युलर कॅव्हलरी ( घोडेस्वारांच्या काळ्या पलटणी ) नें किल्ल्यांतील गोऱ्यांची हत्त्या केली. दुःखांत सुखाची गोष्ट ही कीं, त्या वेळीं, राणीसाहेबांकडील चिटपांखरूंही तेथें नव्हतें.[१] )

---

*. 'उपकारकर्त्यांशीं जो चांगुलपणानें वागेल, त्याचा चांगुलपणा तो कसला ? अपकार करणाराशीं जो चांगुलपणानें वागेल, त्यालाच मान्य लोक चांगला असें म्हणतात.'

१. 'शिपायांच्या युद्धाचा इतिहास' लिहिणारे, केसाहेब, यांचा असाच अभिप्राय आहे ( पु० ३ रें, पृ० ३६९ वें पहा. ) राणीसाहेबांचे दत्तकपुत्र, कै. वा. श्रीमंत दामोदरराव यांस अशाच आशयाचें सत्यनिर्णायक व कृतज्ञतादर्शक

पुढें चालू

आतां बरीक, ' वड्याचें तेल वांग्यावर ' निघणार अशी पक्की गांठ मनांत बांधून, राणीसाहेबांनीं, यत्किंचित् न डगमगतां, मोठ्या संथपणानें व हुशारीनें, लढाईची सर्व तर्तूद करून ठेविली; त्यांनीं किल्ल्याची तटबंदी दुरुस्त केली; वाढविलेल्या फौजेची दाट रांग तटावर ठेविली; बुरुजावर मोठ्या तोफा आणून ठेविल्या; दारूगोळा तयार करण्याकरितां लालू बक्षी यांस नेमिलें; गरीबगुरिबांकरितां चणेफुटाणे आणवून ठेविले; काल्पीस रावसाहेब व तात्या टोपी यांस पत्रें लिहविलीं; रुप्याचीं मोठमोठीं भांडीं मोडवून, त्यांचीं नाणीं पाडलीं; व देवळांत अनुष्ठानें बसविलीं. असो.

राणीसाहेबांच्या भाकिताप्रमाणें, झांशींतील बंडवाल्यांचा सूड उगविण्याकरितां, सर ह्यूज रोज हे मुंबईहून ताज्या दमाचीं पलटणें घेऊन, काल्पीच्या नाकेबंदीकरितां कांहीं पलटणें तेथें ठेवून, त्यांनीं बाकीच्यांकडून झांशीच्या किल्ल्यावर मारा सुरू करविला. पहिले दोन दिवस, त्यांचा मोर्चा लागू होईना. तिसरे दिवशीं, मात्र, रात्र पडल्यावर, माऱ्याच्या ठिकाणीं मोर्चा साधून, किल्ल्याचे पश्चिम बाजूवर दक्षिणेकडील अंगानें गरनाळी तोफ चालू झाली. वायव्य बाजूनें, ही तोफ गोळा टाकूं लागली. शहरावर चार तोफा लागू झाल्या. रात्रंदिवस भयंकर युद्ध होऊन जयश्री घटकेंत राणीसाहेबांस, तर घटकेंत इंग्रजांस मिळेल असा भास होत होता. इंग्रजां-

---

पत्र, ' चक्षुर्वै सत्यं ' या सर्वमान्य तत्त्वावर, मिस्टर टी. ए. मार्टिन्, या वयोवृद्ध इंग्रज गृहस्थानें आग्रा छावणीहून लिहिलें आहे ( पारसनीसकृत ' महाराणी लक्ष्मीबाईचें चरित्र ' पृ० १२५ वें पहा ). राणीसाहेबांचे तत्कालीन आश्रित, वेदमूर्ति विष्णुभट्ट गोडसेकृत ' उत्तर हिंदुस्थानांतील प्रवास ' ( पृ० ९१–९२वीं) पहा.

जवळ मौल्यवान् दुर्बिणी असल्यामुळें, त्यांनीं आठवे दिवशीं किल्ल्यांतील पाण्याची जागा व दारूचा कारखाना रोंखून, त्यांवर मारा करितांच, मोठा कहर उडाला. युद्ध मातबर झालें. वीर मोठमोठ्या आरोळ्या मारीत होते. बंदुका, कडाबिनी, तोफा यांचे असंख्य आवाज होत होते. शिंगें, कर्णे, रणवाद्यें, बगुलें जिकडेतिकडे वाजत होतीं. धूळ व धूर यांनीं दशदिशा व्यापून जात होत्या.

अद्यापि, पेशव्यांकडून मदत कां येत नाहीं म्हणून चिंताक्रांत असतां, वेदमूर्ति लालभाऊ ढेंकरे व भय्याभट्ट उपासने यांच्या विचारानें, राणीसाहेबांनीं १०० ब्राह्मण गणपतिमंदिरांत उपासनेस बसवून, सर्व दिवसाचा थकवा जाण्याकरितां, दिवाणखान्यांत जरा अंग टाकिलें. तों, तांबड्या कांठाचें मोठें लुगडें नेसलेली, रेशिमकांठी चोळी घातलेली, पदर बांधलेली, ओच्यांची कास मारलेली सुंदर व सालंकार सुवासिनी किल्ल्याच्या बुरुजावर फाफू करीत, तोफेचे लाल गोळे झेलीत, ' मीच म्हणून असें जोखिमीचें काम करीत आहें ' असें तोंडानें म्हणत आहे, असें ' मनीं असे, तें स्वप्नीं दिसे. ' या म्हणीप्रमाणें त्यांस स्वप्नांत दिसलें. त्यामुळें, सर्वांस अत्यंत आश्चर्य वाटलें.

दुसरे दिवशीं, तात्या टोपी यांनीं, झांशीच्या मदतीकरितां, इंग्रजांस लढाई दिली. परंतु दुर्दैवानें, तींत त्यांस यश आलें नाहीं. तेव्हां, ते २४ पन्ही ३६ पन्ही तोफा टाकून, रणांतून पळून गेले. आतां झांशी इंग्रजांच्या हातास लागण्याच्या बेतास आली. कारण, आपणांत अशी एक जुनी म्हण आहे कीं, ' अडकली गाय फटके खाय ! ' तरी, राणीसाहेबांनीं आपल्या सरदारांस उद्देशून असें

भाषण केलें कीं, " आजवर आपण जे लढत आलों, तें कांहीं पेशव्यांच्या दमावरच नव्हे. आपण आपल्या पायांवर उभे आहोंत, त्यांच्या पायांवर नव्हे. तेव्हां, यापुढेंही, आपण आपल्या मनगटाच्या जोरावरच आपला बचाव केला पाहिजे. यांतच आपली ताकद आहे. यांतच आपली इभ्रत आहे. म्हणतातना— ' हिम्मते मर्दां मददे खुदा ! ' "

अशी नुसती पोपटपंचीच करून, राणीसाहेब राहिल्या नाहींत; तर, त्यांनीं ती रात्र तटावरील बंदोबस्त व तोफा लागू करण्यांत घालविली. उजाडत्या अकराव्या व अखेरच्या दिवशीं, त्यांनीं आपल्या नेहमींच्या हिम्मतींत व मेहनतींत काडीइतका फरक पडूं दिला नाहीं. सर्व दिवसभर, मारहाण चालली होती. दुसरे दिवशीं हजारों मजूर गवताचे भारे डोक्यावर घेऊन, शहराच्या तटाकडे येत आहेत, त्यांवरून गोरे दक्षिणतटावर चढून येत आहेत असें दिसलें, तेव्हां, सर्वांच्या तोंडचें पाणी पळालें. ज्याला जिकडे रस्ता फुटेल, तिकडे तो गेला. परंतु, राणीसाहेबांची घाबरगुंडी उडून न जातां त्यांचें अंग वीरश्रीनें स्फुरण पावलें. त्या, १००० अरबांस बरोबर घेऊन, दक्षिण दरवाज्यावर गेल्या. त्यांच्या तलवारीच्या माऱ्यापुढें, गोऱ्यांचा निभाव लागेना. म्हणून ते शहराकडे जाऊन, आडून बंदुका झाडूं लागले. तेव्हां शहरांत न जातां तो दरवाजा बंद करून, राणीसाहेबांनीं किल्ल्यांतच राहण्याचा विचार केला. त्यांनीं, तेथील गच्चीवरून, शहराचें नाक जो हलवाईपुरा, तो पेटलेला मोठ्या खेदानें पाहिला. जिकडे तिकडे कापाकापी, रडारड, पळापळ चालली आहे. बंदुकीचे आवाज फडाफड होत आहेत. पाळींव जनावरें तडातड दावीं तोडीत आहेत. तीं टणाटण उड्या

मारीत आहेत. सर्वांवर मृत्यूची छाया पडत आहे. अशा वेळीं, वाड्यांत दारूगोळा पेटवून, त्यांत आपणही मरून जावें असें राणी-साहेबांसारख्या कोमल हृदयाच्या स्त्रीस सहज वाटलें. परंतु, अशा आत्महत्त्येपेक्षां धारातीर्थीचें स्नान हें अधिक श्रेयस्कर आहे असें एका वृद्ध सरदारानें त्यांस सांगितलें. तसें, त्याच्या बोलण्यास मान देऊन, तमाम लोकांस योग्य बक्षिसें देऊन, दिवे लागतांच, त्यांस शहरांत जाण्याची परवानगी देऊन, अंवशीच्या बारा घटकांच्या सुमारास, आपले वडील मोरोपंत तांबे, वगैरे आप्तमंडळी हत्यार-बंद बरोबर घेऊन, कमरेशीं मोहरापुतळ्या बांधून, खजिन्याचा हत्ती मधोमध चालवून, निवडक सैन्यासह, पाठीशीं १२ वर्षांचा दत्तक मुलगा बांधून, एक रुप्याचा जांब पदरांत घेऊन, काल्पी-कडे जाण्याकरितां, राणीसाहेब पुरुषवेषानें किल्ल्याबाहेर पडल्या.

वाटेंत, त्यांची व त्यांच्या सरदारांची फाटाफूट झाली. परंतु, रात्रीच्या अंधेरांत, त्यांस इंग्रजांच्या हातावर तुरी देतां आली. उजाडतां उजाडतां, हद्दीवरील गांवाच्या महालकऱ्याकडे मुलास फराळास बसवून, बारा घटकांच्या सुमारास, त्या काल्पीस पोहों-चल्या. असे २४ तास, त्यांनीं अन्नपाण्यावांचून भरधांव चाल-णाऱ्या घोड्यावर काढिले. व शौचमुखमार्जन करून, पेशव्यांस भेटावयास जाणार, तों स्त्रीधर्माप्रमाणें त्यांस अस्पर्श्यदशा प्राप्त झाली. तरी, तेथें त्यांचा यथायोग्य सत्कार झाला.

पुढें, तीन दिवस, पेशवे यांची इंग्रजांबरोबर लढाई झाली. परंतु, ठिकठिकाणीं इंग्रजांचा जय झाल्याचें ऐकून, बंडवाले शिपाई निराश, दमदार शिपाई भरती होण्यास नाखूष, व नवशिके अड-मुठे असल्यामुळें, पेशवे यांचा पराभव झाला.

तेव्हां, ही अपयश पावलेली मंडळी, शिंदे-होळकरांकडून सहानुभूति प्राप्त होण्याच्या आशेनें, ग्वाल्हेर-इंदूरकडे वळली. पेशव्यांचे सेनापति तात्या टोपी यांस वश होऊन, ग्वाल्हेरच्या फौजेनें मराठी राजसत्तेचे प्रभु पेशवे यांवर शस्त्र धरण्याचें नाकारिलें. तसें, जयाजीराव शिंदे व त्यांचे दिवाण दिनकरराव हे घोड्यावर बसून इंग्रजांच्या आश्रयार्थ, आग्र्यास निघून गेले. इकडे, इंदुरास रेसिडेंट कर्नल ड्यूरँड हेही बंडाच्या भीतीनें महूस पळून गेले. परंतु, तुकोजीराव होळकर यांनीं, आपली निमकहलाली दाखविण्याकरितां, रेसिडेंसींत राहिलेल्या थोड्या गोऱ्या लोकांस आपल्या वाड्यांत आणून, स्वताच्या जिवावर उदार होऊन, त्यांचे जीव वांचविले; कुमकेविषयीं रेसिडेंट कर्नल ड्यूरँड व मुंबईचे गव्हर्नर ( माजी लोकप्रिय एल्फिन्स्टन साहेबांचे पुतणे लार्ड एल्फिन्स्टन ) यांस पत्रें लिहिलीं; व इंग्रजी पाहुणे व इंग्रजी खजिना आपल्या जाबत्यानिशीं महूच्या छावणीस पोंचता केला[1].

पुढें, इंग्रजी फौजेनें लवकरच ग्वाल्हेर-इंदूरकडील व्यवस्था पूर्ववत् सुरळीत केली. दर्म्यान्, पेशव्यांनीं १७ दिवसपर्यंत लष्कर-ग्वाल्हेर येथें विजयानंदांत ब्राह्मणभोजनें घालून, पेशवाई गाजविली. परंतु, लक्ष्मीबाईसारख्या दूरदृष्टि स्त्रीस हें रुचेना. त्यांनीं सावध राहण्याविषयीं पेशव्यांस वेळोवेळीं सुचविलें. शेवटीं, १८ वे दिवशीं दुपारचे बारा वाजतां, पेशव्यांच्या पंक्तींत संकल्प सुटत आहे, तोंच शिंदे यांस पूर्वींप्रमाणें गादीवर बसविण्याकरितां इंग्रजी पलटणें दाराशीं येऊन पोंचल्याची बातमी थडकली. तसे, पितांबर

---

१. केकृत ‘ शिपायांच्या युद्धाचा इतिहास ’ ( भा० ३ रा, पृ० ३४०–३४१ वीं ) पहा.

सोडून, केशरांबर धारण करून, पेशवे युद्धास निघाले. त्यांबरोबर तात्या टोपी, झांशीची राणी वगैरे मंडळीही निघाली. लढाई थोडा वेळ पण निकराची होऊन, पेशव्यांच्या फोजेनें कच खाल्ली. तसे, रावसाहेब पेशवे हे तात्या टोपी यांसह दक्षिणेकडे वळले;[1] परंतु, झांशीची राणी मारली गेली. सारांश, या त्रयींतून तिची कीर्ति चित्र, नाटक व चरित्र या रूपत्रयानें अर्वाचीन महाराष्ट्रांतच नव्हे, तर उत्तर हिंदुस्थान, गुजराथ, बंगाल अशा इतर प्रांतांतही अजरामर झाली.

असो. ग्वाल्हेरची सुटका तावडतोब झाल्यामुळें,[2] शिपायांच्या बंडाच्या ज्वाळा महाराष्ट्रांत जाऊन विशेष भडकल्या नाहींत. परंतु, नानासाहेब, तात्या टोपी, झांशीची राणी इत्यादि प्रमुख वीरांचा पराक्रम छपून राहिला नाहीं. त्याचें वारें, कारणपरत्वें, महाराष्ट्रास लागलें तें लागलेंच. दक्षिणभागांत बंड उपस्थित झालें. कारण, तेथें खालसा व इनामकमिशन[3] यांचा अनिष्ट परिणाम म्हणजे सार्वजनिक असंतोष हा अगोदरपासून दिसून येत होताच.

---

१. ते हैदराबाद संस्थानांत गेले होते; तेथेंही जेव्हां त्यांचा पाठलाग झाला, तेव्हां ते हुमनाबादकर ' चतुर्थ दत्तावतार ' म्हणून गाजलेले श्रीगुरुमाणिकप्रभु, या साधुवर्यांस शरण गेले; तेव्हां, प्रभुप्रसादानें व तिरस्करिणीविद्येनें, त्यांस शत्रूची फौज दिसावी परंतु शत्रूच्या फौजेस मात्र ते दिसूं नयेत ! ( टोळेकृत ' माणिक प्रभूचें चरित्र, ' पृ० २२१–२२३ वीं, पहा )

२. ' शिपायांच्या बंडाचा इतिहास ' लिहिणारे मॅलिसनसाहेब यांनीं असाच अभिप्राय नमूद केला आहे ( सदर्हू ग्रंथ, पु० ५ वें, पृ० १५० वें पहा )

३. मागील पृ० २३–२४ वीं पहा. नानाफडणविसांच्या दफ्तरांत सुमारें १०० रुमाल मेणवली येथें राहिले होते. तेही इनाम-कमिशननें जप्त करून, त्यां-

सातारच्या राजाकरितां विलायतेंतील वेकिलींत अपयश पावलेले त्यांचे दिवाण रंगो बापूजी यांनीं नानासाहेब पेशवे यांचे समदुःखी वकील अझिमउल्ला यांशीं संगनमत करून, स्वदेशीं परत आल्यावर, बंड केलें. परंतु तें फळास येण्यापूर्वींच त्याचा सुगावा लागून, १७ जणांना फांशी होऊन, त्यांचा पुढारी रंगो बापूजी हा मात्र सांपडला नाहीं.

---

पैकीं काय ते १०।१५ परत आणून दिले, कॅप्टन् कौपर यांनीं बाकीच्या रुमालांची काय विल्हेवाट केली, नकला देऊन अस्सल कागद कोणीं उपटून नेले; याची कल्पना वाचकांनींच करावी ( खरेकृत ' नाना फडनाविसांचें चरित्र, ' आवृत्ति २ री, प्रस्तावना, पृ० ३ रें पहा ) सातारच्या सगुणाबाईसाहेबांनीं, १८७४ सालीं, कंपनी सरकारच्या ठरावावरून महाराणी विक्टोरिया यांकडे जें अपील केलें आहे, त्यांत त्यांनीं अशीच रडकथा गाइली आहे. त्या म्हणतात कीं, " दरबारच्या ज्या बहुतेक कागदपत्रांनीं मला महाराणीसाहेबांजवळ दाद मागतां आली असती, ते ईस्टइंडिया कंपनीच्या हुकमावरून बदनाम झालेल्या इनामकमिशनच्या अधिकाऱ्यांनीं झाडून नेले. जे कांहीं थोडे उरले आहेत, त्यांवरून आपलें संस्थान कां खालसा झालें व कोणत्या उपायांनीं तें पुन्हा प्राप्त होईल हें कळत नाहीं. इतका त्यांत गोंधळ आहे. " ( सदर्हू अपील, खंड १८ वा, पृ० १० वें, पहा.)

१. या उत्तरपक्षांत जे कागदपत्र पुरावा म्हणून दाखल करण्यांत आले, त्यांवरून, पदच्युत केलेल्या सातारकरांच्या पदरीं राजद्रोह हा भयंकर दोष बांधितां येत नाहीं. १८१९ ते १८३५ पर्यंत, त्यांच्या दरबारीं असलेल्या प्रत्येक रेसिडेंटानें त्यांविषयीं आपला अनुकूल अभिप्राय प्रकट केलेला आहे; १८२९ व १८३१ त, कोर्ट ऑफ डायरेक्टर्स यांनीं मुंबईसरकारांत पत्रद्वारें असाच अभिप्राय कळविला आहे; ता० २२ जुलै १८३५ ला, त्या अधिकारिमंडळानें मुंबईसरकारमार्फत एक मानाची तरवार राजेसाहेबांस बक्षीस दिलेली आहे; व ता० २९ डिसेंबर १८३५ ला, सदरहू मंडळानें त्या तरवारीसंबंधीं मानपत्र त्यांकडे पाठवि-

मागील पृष्ठावरून पुढें चालू

बेळगांव, धारवाड व विजापूर येथें इनाम-कमिशनचा गवगवा फार झाला होता. त्यावरून लोक चवताळून सूड उगविण्याच्या

---

लेलें आहे. १८३३ नंतर, सातारकरांकडील कांही प्रदेशासंबंधीं त्यांचा मुंबई-सरकाराशीं तंटा उपस्थित होऊन, त्या वेळच्या रेसिडेंटला व कोर्ट ऑफ डायरेक्टर्स् यांना त्यांचा पक्ष मान्य असूनही, त्यांस हार खावी लागली. सर रॉबर्ट ग्रँट या गव्हर्नरसाहेबांनीं एक वर्ष झुलवण्या लावून, त्यांची कैफियत कोर्ट ऑफ डायरेक्टर्स यांकडे पाठविली नाहीं ( १८३५–१८३६ ). तेव्हां, त्यांस मुंबईसरकाराचा अत्यंत राग आला व मुंबईसरकारवर चर्फडण्यांत कांहीं अर्थ नाहीं असें दिसून येतांच, त्यांनीं कोर्ट ऑफ डायरेक्टर्स यांजकडे दाद मागण्याकरितां एक वकील विलायतेस पाठविला.

येणेंप्रमाणें, सातारकर व मुंबईसरकार यांत द्विधाभाव उत्पन्न झाला. तेव्हां चुगलखोरांची पोळी पिकली. राजेसाहेबांस उत्तरपक्ष करण्यास संधि मिळाली नाहीं; राजेसाहेबांस अनुकूल असे जनरल लॉडविक् या रेसिडेंटांची साताऱ्याहून दुसऱ्या ठिकाणीं बदली होऊन, कर्नल ओव्हॅन्स यांची त्या जागेवर नेमणूक झाली; त्यांचें सर्व लक्ष्य राजेसाहेबांवर दोषारोप करणारा पुरावा गोळा करण्याकडे होतें; त्यांचा तत्कालीन कटांशीं बादरायणसंबंध दाखविणारें टिप्पण सर रॉबर्ट ग्रॅंट यांनीं प्रसिद्ध केलें.

प्रभुज्ञातींत ब्राह्मणांनीं वेदोक्त कर्म चालवावें कीं नाहीं या वादांत राजेसाहेबांनीं प्रभुपक्ष स्वीकारिल्यामुळें, ब्राह्मणांची तळव्याची आग मस्तकास गेलेली होतीच. १८३१ च्या मार्च महिन्यांत, वाईकर ब्राह्मणसमुदायानें राजेसाहेबांचे पहिले विश्वासांतले ग्रामस्थ ब्राह्मण नागो देवराव यांच्या पुढारीपणाखालीं राजेसाहेबांच्या नालस्तीची एक यादी मुंबईसरकारकडे रवाना केली.

१८३६ त काळ्या पायदळ पलटणींतील दोघां शिपायांस राजेसाहेब व त्यांचे दिवाण गोविंदराव यांनीं फितूर केल्याचा पुरावा झाला. व कर्नल लॉडविक ( रेसिडेंट ), कर्नल ओव्हॅंस् ( मुंबईच्या लष्कराचे क्वार्टरमास्तर जनरल ) व मिस्टर विलौबी ( मुंबईसरकारच्या राजकीय खात्याचे चिटणीस ) या गुप्त

पुढें चालू.

बेतांत होते. तिघां काळ्या पलटणींनीं बंड करण्याचा बेत केला होता. कोल्हापूर येथील २७ वे पायदळपलटणींतील एका यहुदी ॲडज्यूटंटनें आपलें कुटुंब घरीं पाठविण्याचा विचार केला होता. त्या संशयावरून कट फुटला. तरी, ठरल्याप्रमाणें, ऐन पावसाळ्यांत ता० ३१ जुलैच्या रात्रीं बंड झालें. नेटिव्ह ॲडज्यूटंटनें मडमांस आपल्या बंगल्यावर जाण्याचा इशारा देण्याची खोटी कीं, त्यांवर गोळ्यांचा वर्षाव होऊं लागला. कांहीं गोऱ्या कामदारांना पकडून, त्यांना नदींत जलसमाधि देण्यांत आली. कोणी पोलिटिकल एजंटच्या बंगल्यावर गेले. कॅप्टन स्नीडन् यांच्या हाताखालीं कोल्हापुरची स्थानिक पलटण असून, पोलिटिकल एजंट कर्नल मॉघन यांनीं आयत्या वेळीं आपली अक्कल खर्च करून, बंडवाले शहरांत येऊं नयेत म्हणून, त्यांनीं वेशीचे दिंडी दरवाजे बंद करून घेतले. हें पाहून, बंडवाले रत्नागिरीकडे वळले. तेथून एका गोऱ्या पलटणीनें त्यांस पिटाळून सावतवाडीच्या जंगलांत घालविलें. तसे ते पुन्हा कोल्हापुरास आले. तेव्हां साताऱ्याहून नवीन आलेले लेफ्टेनंट कर यांनीं त्यांचा पाडाव केला. कोल्हापुरचा लढाऊ सरंजाम उतरविण्यांत आला. राजानें आपला धाकटा भाऊ चिमासाहेब यांचें

---

कमिशनापुढें सदहू प्रकरणाचा एकतर्फी विचार होऊन, नागपूरकर माजी राजेसाहेब ( जोधपूर येथें कैदेंत असलेले ) यांशीं सातारकरांनीं, सूत्र बांधिलेलें आहे, अशी बाळाजीपंत नातू ( पुण्यांतील शेवटले बाजीरावांचे गुप्त शत्रु ) यांची साक्ष होऊन, सर जेम्स् कॉनेक् या नवीन गव्हर्नरसाहेबांनीं राजेसाहेबांस दोषी ठरवून, राजेसाहेबांनीं त्या ठरावाचा निषेध सारखा ३ दिवस करितांच, साहेब बहादुरांनीं त्यांवर पदच्युतीचा हुकूम सोडिला [ रंगो बापूकृत ' सातारकर राजेसाहेबांचा उत्तरपक्ष ' ( १८४५ ), पृ० ७ वें, १० वें, ११ वें, १९ वे, ५२ वें, १८७ वें पहा ]

नानासाहेबांशीं सूत्र आहे अशी खबर दिल्यावरून, त्या भावास कैदेंत ठेवण्यांत आलें.

बेळगांवांतील बंड, मुळांत असतांच नाहींसें करण्यांत आलें. सांगली येथें एक इंग्रजी पलटण ठेवण्यांत आली. मिरजचा कोट पाडण्यांत आला. तेथील दारूगोळा जप्त करण्यांत आला. नर्गुंदकर बाबासाहेबांनीं इंग्रजांवर हल्ला करून, मॅन्सनसाहेबांचें शिर कापून, तें गांवच्या वेशीवर लाविलें, तेव्हां त्यांचें संस्थान जप्त झालें. तेथून त्यांस यात्रेकरूच्या वेषानें पळ काढावा लागला.

खुद्द मुंबई शहर दिवाळींत लुटण्याचा कट काळ्या पलटणींतील गंगाप्रसाद या परदेश्याच्या बैठकींत चालला होता.तो मुंबईचे पोलीस सुपरिंटेंडेंट मिस्टर फोर्जेट या अँग्लो-इंडियन कामदाराच्या चातुर्यानें व बहुरूपीपणानें उघडकीस येऊन,गंगाप्रसाद यास फांशी व इतर सहा जणांना काळें पाणी झालें. आणि एकंदर शहरास दहशत बसावी म्हणून, सरकारानें पोलीस ऑफिससमोर कित्येक दिवस फांशी लावून ठेविली होती.

येणेप्रमाणें, या भयंकर उत्पाताचा अंत झाला. शिपायांसारख्या अशिक्षित व धर्मभीरु लोकांच्या समजुतीकडे दुर्लक्ष्य केलें असतां काय होतें; राज्यापहार करण्याच्या बुद्धीनें, एतद्देशीय संस्थानिकांच्या दत्तविधानावर गदा आणिल्यानें काय होतें; सुधारणेचा तोरा मिरविणाऱ्या राष्ट्रास रानटी लोकांतील एकीपुढें कितपत चालतां येतें; शेवटीं, ' बळी तो कान पिळी ' असा प्रकार कसा घडून येतो; इत्यादि महत्त्वाच्या गोष्टी प्रस्तुत प्रकरणांत विचार करण्यासारख्या आहेत. तारुण्य, द्रव्य व राज्य यांच्या मदानें अंध झालेल्या ईस्ट इंडिया कंपनीस त्या समजल्या नाहींत. या महापराधाबद्दल तिला जें अपरंपार शासन झालें, तें पुढील प्रकरणांत येईल.

# अर्वाचीन महाराष्ट्र.

## भाग २ रा. बादशाही अंमल. (१८५८-१९११)

## प्रकरण ५ वें.

### गायकवाडांवरील संकट ( १८७३-७५ ).

शिपायांचें बंड थंड झाल्याबरोबर, प्रजेचा सांभाळ अधिक चांगला व्हावा म्हणून, कंपनीसरकारच्या हातचीं राज्यसूत्रें महाराणी व्हिक्टोरिया यांनीं आपल्या हातीं घेतलीं. त्यांनीं आपल्या सरळ व निर्मळ शासनपद्धतीचा एक बहुमोल जाहिरनामा काढिला त्यांनीं लोकांस अभयवचन दिलें[1] ( १८५८ ).

येथवर सर्व शिष्टाचार ठीक झाला. शिपायांचें बंड मोडण्यास मात्र, सरकारी तिजोरीला जो चट्टा बसला होता, तो भरून काढण्या-

१. कंपनीसरकारनें संस्थानिकांशीं केलेले तहनामे पाळण्यांत येतील, या महाराणीसाहेबांच्या अमोल वचनावर दृढभाव ठेवून, सताऱ्च्या सगुणाबाई साहेबांनीं सातारा संस्थानावरील आपल्या हक्काचा शहानिशा होण्याकरितां, एक कमिशन नेमण्यांत यावें, असें त्यांकडे नम्रपणानें मागणें केलें होतें ( १८७४ ).-सदर्हू अपील, खंड २४ वा व १०१ वा, पृ० ११ वें व ४४५ वें, पहा.

करितां, मिठावर व प्राप्तीवर[3] जबर कर बसविण्यांत आले. जमीन-[3] महसुलाची नवीन वाढती जमाबंदी करण्यांत आली. व लोकांनीं पुन्हा वर डोकें करूं नये म्हणून त्यांस निःशस्त्र बनविणारा ' हत्यारांचा कायदा ' ( १८६० ) करण्यांत आला; गोऱ्या पलटणी वाढविण्यांत आल्या; एकाच छावणींत भिन्नभिन्न प्रांतांतील काळ्या पलटणी ठेवण्यांत आल्या.

---

१. पेशवाईत जो रु. २॥ खंडी होता (' सातारचे राजे व पेशवे यांच्या रोजनिशा ' स न्यायमूर्ति रानडे यांनीं जोडिलेली इंग्रजी प्रस्तावना पहा ). तो इंग्रजींत रु. २॥ मण झाला. म्हणजे, तो २० पटीनें वाढला.

२. ' मोहतर्फा ' ( पेशवाईतील दुकानदारीवरील कर ) याची ही सुधारलेली आवृत्ति होय. कारण, त्यांत प्रजेचें उत्पन्न दरसाल वाढतें असे सरकार गृहीत धरून चालतें. म्हणजे ही गोष्ट ' पुराव्याच्या कायद्या ' प्रमाणें सरकार आपण होऊन सिद्ध करीत न बसतां, तें नास्तिपक्ष सिद्ध करण्याचें अवघड काम लोकांवर लोटून देतें.

३. ' मुंबई इलाख्यांतील जमिनीची पाहणी व जमाबंदी यांसंबंधीं सरकारी पत्रव्यवहार ' या इंग्रजी पुस्तकांत ( पृ० १३२ वें ) आला आहे; ' The plan of leases proposed in paragraph 10 of the Government letter would give the lessee a 5 p. c. reduction on the rates fixed by our surveys. Were this reduction to secure the abolition of remissions to the lessees, it would be cheaply purchasd. But, I fear it would not. It

पुढें चालू.

सरकारचें लक्ष्य, याप्रमाणें, राज्यांत शांतता राखण्याकडे लागलें असतां, लोकप्रवृत्ति-सुखार्थ दिसूं लागली. कुलाबा येथें बी. बी. सी. आय. रेल्वेचें शेवटलें स्टेशन व लष्करी अंमलदारांचे बंगले करण्याकरितां, शहरांत जागा अत्यंत महाग म्हणून बॅकबे बुजवून, नवीन १५०० एकर जागा बनविण्याच्या सरकारच्या विचाराप्रमाणें, शेट प्रेमचंद रायचंद, नाना शंकरशेट इत्यादि धाडसी व्यापारी लोकांनीं एक मंडळी काढून, आपल्या रु. १०००० किंमतीचा एकेक अशा २००० शेअरांपैकीं सरकारकरितां ४०० शेयर्स राखून ठेवून, बाकीचे लोकांत खपविण्याचा धुमधडाका सुरू झाला ( १८६३–६५ ). नवीन बँका व इतर संस्था यांनीं चटाचट शेयर्स घेण्यास सुरवात केली. एकाच्या नांवावर दुसऱ्याच्या दुसऱ्याचा तिसऱ्याच्या नांवावर, तिसऱ्याचा चवथ्याच्या नांवावर

---

seems to me that the Rayuts in surveyed districts are already as far bound by leases, as they in the present state of the country can be; and if the great object of our revenue surveys is not gained, the cause thereof is traceable, I think, not to the absence of leases, but to the fact of the *new rates not being sufficiently low.*' Official correspondence on the System of Land Revenue & Assessment in the Bombay Presidency ( Revised Ed. of 1859, p. 132 ).

चढविलेल्या अर्ध्या शेयरवर धाड पडण्यापर्यंत मजल येऊन ठेपली. चढाओढ अत्यंत होत चालली. शेवटीं, अशी मौज झाली कीं, मिस्टर सिल्व्हेस्टर बर्च, त्या वेळचे अकौंटंट जनरल व ' बॉंबे बँके ' चे सरकारी व्यवस्थापक व अध्यक्ष, यांनीं आपल्या बरोबरीच्या पुष्कळ मोठ्या कामदारांप्रमाणें, निदान पांच शेयर राखून ठेवण्याविषयीं प्रेमचंदाकडे मिनतवारीनें मागणें केलें होतें. तेव्हां त्यांस रु. ३,७५,००० चे वेगवेगळ्या प्रकारचे शेयर प्रेमचंदाकडून मिळाले! सरकारकरतां राखून ठेविलेले ४०० शेयर लिलाव करून विकण्याची पाळी आली ! मंडळी व तिचे भागीदार यांस काय तो दोन बोटें स्वर्ग उरला !

परंतु, ' अत्यारूढिर्भवति महतामप्यपभ्रंशनिष्ठा ' या कालिदासोक्तीप्रमाणें हा अलौकिक उत्साह, ही विलक्षण स्फूर्ति जेमतेम एक वर्षाची धनीण राहिली होती. प्रेमचंदाचें सौभाग्य हें शिराळशेटाच्या औटघटकी राज्यासारखें क्षणिक झालें होतें. त्याची लटपट, त्याची खटपट, ही डोळ्याचें पातें लवतें न लवतें तोंच राम म्हणणार होती. तिची नाडी बंद पडत चालली होती. तिचे हातपाय थंड पडत चालले होते. तिचा घर्घराट सुरू झाला होता. मुंबईतील व्यापार व उद्योग यांत, या बोटाची थुंकी त्या बोटावर करण्याचा सपाटा सारखा चालू झाला होता. त्यामुळें गोष्ट एवढ्या थरावर गेली कीं, ' बॅंक बे कंपनी ' चें खाडकन वाटोळें झालें[२] !

---

१ ' मोठे देखील अत्युच्चपदास पोंचले असतां, त्यांचा अधःपात होऊं लागतो '

२ मिस्टर दिनशा एदलजी वाच्छाकृत ' प्रेमचंद व त्याचा काळ ' ( १९१३ ) हें इंग्रजी पुस्तक पहा.

अशी वणिग्वर्यांची भयंकर हानि झाली. आतां विद्वज्जनांकडे वळलें तर असें दृष्टीस पडूं लागलें कीं, नवीन विद्येकडे त्यांचें लक्ष्य लागून, त्यांच्या ठायीं कर्तव्यजागृति झालेली आहे; बंगाल्यांतील पंडित ईश्वरचंद्र विद्यासागर व राजा राममोहनराय यांप्रमाणें, वे० शा० सं० विष्णु परशुरामशास्त्री पंडित 'इंदुप्रकाश' चे चालक व रा० ब० माधव गोविंद रानडे, एम्. ए, एल्एल्. बी. हे झळकूं लागले आहेत; मुंबईत 'विधवाविवाहसाहाय्यक सभा' ( १८६६ ) व 'प्रार्थनासमाज' ( १८६७ ) या संस्थांचा उदय होत आहे; मुंबईच्या विश्वविद्यालयानें देशी भाषांस मज्जाव ( १८७० ) करितांच, तिचा त्या विद्यापीठांत सुखप्रवेश व्हावा म्हणून, रा० ब० रानडे यांसारख्या थोर पुरुषांचा दीर्घोद्योग सुरू होत आहे, पुण्यास पार्लमेंटसभेचा वस्तुपाठ देशबंधूंस द्यावा म्हणून, रा० ब० रानडे यांसारख्या महा व्यक्तींकडून रा० गणेश वासुदेव जोशी ( ऊर्फ 'सार्वजनिक काका' ) यांच्या 'जोशी हॉल' मध्यें 'सार्वजनिक सभे' ( १८३१ ) ची प्राणप्रतिष्ठा होत

१ इंचे उत्पाद वे. शा . सं. विष्णु परशरामशास्त्री पंडित ( १८२७–७६ ) हे होते. ( बालबोध; दिसेंबर १८८४ त्यांचा सुप्रसिद्ध कवि व संस्कृतांत वक्ते रा. विठोबाअण्णा दप्तरदार यांबरोबर पुणें येथें श्रीशंकराचार्यांसमोर कडाक्याचा वाद होऊन त्यांत पुनर्विवाहपक्षाचा पराभव झाला होता ( १८७० ).

२ बाबू सत्येंद्रनाथ टागोर आय्. सी एस्. कृत 'बोंबाई-चित्र' ( पृ० १३८ वें ) पहा.

(पुढें चालू.)

आहे; गणेशखिंडीं ( पुणें ) तील सरकारी बंगल्यावर, सर विलियम् रॉबर्ट सेमोर व्हेसे फिट्झलर्ड जी. सी. एस्. आय्. या गव्हर्नर-साहेबांनीं लोकच्छंदानुवर्तित्व स्वीकारून, शिंदे-होळकरांसच नव्हे, तर महाराष्ट्राच्या या टोंकापासून त्या टोंकापर्यंत ' ग्यानबा–तुका-रामा ' प्रमाणें गाजत असलेले रा० यशवंत महादेव भोंसेकर ( ऊर्फ-' यशवंतराव महाराज ' किंवा ' देवमामलेदार ' ) यांस जाफत ( १८७१–७२ ) देऊन, पेशवाईसमारंभाची लोकांस आठवण

---

अंबाल्याचे वकील, बाबू माधोराम, बी. ए. यांनीं ' ' श्रीमान् महादेव गोविंद रानडे और उनका काम ' ( १९०९ ) या आपल्या उर्दू पुस्तकांत सदर्हू संस्थेची प्रशंसा अशी केली आहे कीं, ' इस सभाका मतलब यह था के, लोगोंके तक्लीफियोंका हाल गव्हर्मेंटपर जाहिर किया जावे–जो काम इस सभानें लोगोके भलाईके लिये किया, उस्का सानी तमाम मुल्कमें मुष्किलसे दिखाई पडता है. सार्वजनिक सभा एक ऐसी जमात थी के, जिस्में हरएक मेंबर सभाके कामका जिमेदार था, और तहे दिल्से उस्के तरक्कीके लिये कोशिष करता था. ' ( या सभेचा हेतु असा होता कीं, लोकांच्या हालअपेष्टांचा वृत्तान्त सरकारास कळवावा. त्या सभेनें लोककल्याण जें साधलें आहे, त्या तोडीचें दुसरें सर्व देशांत सांपडणें कठीण आहे. सार्वजनिक सभा ही अशी एक संस्था होती की, तींतील हरएक सभासद हा तिच्या कामाबद्दल जबाबदार होता व तिच्या उन्नतीकरितां तो कळकळीनें झटत असे )–पृ० २०४–२०५ वीं.

१. ' लांबलांबुनि दर्शना जन येति धांवुनि सत्वरीं ! भासलें यशवंतमंदिर गर्जली जशि पंढरी ! फेडिती नवसास ! केस० रि० ' गाइ वृत्त यथाक्रम, कां न तें यशवंतचित्त संहरील भवभ्रम ? " रा. केशव सदाशिव रिज्ञबूडकृत ' यशवंतराव महाराजांचे चरित्र. '

करून देत आहेत.—' साधु आले घरा । तोचि दिवाळी दसरा ! विष्णुशास्त्री चिपळूणकर बी. ए.यांची ' निबंधमाला ' झळकत आहे ( १८७४ ).

तों महाराष्ट्राच्या एका मोठ्या वसाहतींत वातावरण अत्यंत क्षुब्ध झालें. बडोद्याचे अधिपति श्रीमंत मल्हारराव महाराज गायकवाड यांवर एक मोठें संकट आलें ( १८७३–७५ ).[1] रेसिडेंट कर्नल फेयर यांच्या तक्रारीवरून, त्यांच्या राज्यकारभाराची चौकशी करण्यासाठीं, ता० २८ ऑक्टोबर १८७३ रोजीं, ' बडोदें-कमिशन ' नेमण्यांत आलें. त्याच्या बैठकी नोव्हेंबर व डिसेंबर या दोन महिन्यांत बडोद्यांत झाल्या.

ता० १३ जॅन्युअरी १८७५ रोजीं, प्रस्तुत प्रकरणाची पूर्ण चौकशी करतां यावी म्हणून, मल्हारराव महाराजांस राज्यपदावरून सस्पेंड करण्यांत येऊन, ता० १५ फेब्रुअरीला कमिशन नेमण्यांत येऊन, ता० ३१ मार्चला त्याचा रिपोर्ट पूर्ण झाला. फिर्यादीच्या हकीकतीवर विश्वास ठेवून, सर रिचर्ड कोच् ( बंगालचे चीफ जस्टिस् ), कर्नल सर रिचर्ड मीड ( म्हैसूर व कुर्ग प्रांताचे चीफ कमिशनर ), मिस्टर पी. एस्. मेल्व्हिल् ( बंगाल सिव्हिल सर्व्हिस ) या तिघां कमिशनरांनीं आरोपीस दोषी ठरविलें. परंतु, श्रीमंत जयाजीराव शिंदे ( ग्वाल्हेरचे महाराज ), श्रीमंत रामसिंग ( जयपूरचे महाराज ) व राजा सर दिनकरराव राजवाडे ( ग्वाल्हेरचे

---

१. ' टाइम्स् ऑफ् इंडिया ' पत्राच्या चालकांनीं प्रसिद्ध केलेल्या ' रिपोर्टी ' च्या आधारें.

दिवाण ) त्या तिघां कमिशनरांनीं आरोपीच्या म्हणण्यावर विश्वास ठेवून, तो दोषमुक्त आहे असें ठरविलें.

त्यांतील प्रमुख असे जे शिंदेसरकार, त्यांचा अभिप्राय असा होता कीं, ' एकंदर विषप्रयोगासंबंधीं जो पुरावा मजपुढें आला आहे, त्यावरून माझी खात्री अशी झाली आहे कीं, मल्हारराव हे निरपराधी आहेत. गायकवाड यांनीं हिरे, तांबें किंवा सोमल यांच्या खरेदीकरितां चिठ्ठी करून दिलेली नाहीं. यासंबंधीं केवळ दामोदरपंताची जबानी आहे. शिवाय, या बाबतींत गायकवाडांचें अंग आहे असें सिद्ध करण्यास दुसरा कोणताही दस्तऐवज नाहीं ही गोष्ट निर्विवाद आहे. या प्रकरणांतील अनेक साक्षीदारांपैकीं रावजी, नरसू व दामोदरपंत या तिघांनींच काय त्या सदर्हू आरोपा-संबंधीं साक्षी दिल्या आहेत. त्यांच्या साक्षींत मुळींच ताळमेळ नाहीं. तेव्हां त्या विश्वसनीय आहेत असें कसें म्हणावें ? पेड्रो बटलर व अबदुल्ला यांच्या जबान्या; व सलीम, यशवंतराव खान-वेलकर, गुजाबा, नुरुद्दिन बोन्हा व हकीम यांची गैरहजिरी; या गोष्टी आरोपीच्या पथ्यावर पडल्या आहेत. शिवाय विषप्रयोगांत एवढी दिरंगाई व ढिलाई हीं, माझ्या मतें, मुळींच संभवत नाहींत. असें कृत्य एका दोघां विश्वासू माणसांकडून होण्यासारखें असून, त्यावर एवढें लटांबर नको होतें. आतां, विषाच्या लहान डोझानें जर मनुष्य मरतो, तर त्याचा प्रयोग वारंवार करण्याचें कारण नाहीं. सार्जंट बॅलंटाइन या योग्य गृहस्थाच्या मुख्य विधानाचा निषेध करण्याचें कांहीं कारण नाहीं असें मला वाटतें. ही गोष्ट लक्ष्यांत ठेवण्यासारखी आहे कीं, मल्हाररावांनीं सलीम व यशवंत-राव यांना सर लुई पेली यांच्या हवालीं करण्यांत गय केली नसून,

त्यांनीं त्यांस आपल्याकडून होईल तितकी मदत करण्याची इच्छा प्रकट केली होती. रात्रींच्या किंवा दिवसाच्या नोकरांमार्फतच्या दळणवळणासंबंधीं पाहूं गेलें, तर त्यांत जीव नाहीं. इतर देशी राजेरजवाडे व रेसिडेन्सीशीं, संबंध असलेले लोक यांच्या 'घरोघर अशाच मातीच्या चुली असतात. असेच भेटाभेटीचे प्रकार, असेच देण्याघेण्याचे प्रकार, असेच हितगुजाचे प्रकार आपआपसांत चालू असतात. सारांश, मी म्हणतों कीं, चौकशीकरितां पुढें आलेले दोन मुद्दे: एक विषप्रयोगाचा व दुसरा नोकर फितविण्याचा. त्यांवर मीं आपला अभिप्राय सादर केला आहे.'

यांत महाराज शिंदे यांनीं असें गृहीत धरिलें आहे कीं, गायकवाड व रेसिडेन्सी यांमध्यें दळणवळण असून, कर्नल फेयर यांवर खरोखर झालेला विषप्रयोग सिद्ध आहे. व त्यांचें मत असें आहे कीं, सदहू विषप्रयोगाशीं गायकवाडांचा लागाबांधा आहे असें सिद्ध झालेलें नाहीं.

जेयपूरच्या महाराजांच्या मतें, गायकवाडांनीं रेसिडेन्सीच्या नोकरांना पैसे चारून, कर्नल फेयर यांवर विषप्रयोग केला हें शाबीत

---

१. कलकत्ता येथील सुप्रसिद्ध 'मूकर्जीज् मॅगेझीन' मधील 'बडोदें' अंकांतील संपादक डॉ० शंभुचंद्र मूकर्जी, एम्. डी. यांनीं 'बडोदें-पीतपुस्तक' म्हणून प्रसिद्ध केलेल्या महत्त्वाच्या लेखांत, लॉर्ड नॉर्थब्रुक या व्हाइसरॉयसाहेबांचा अन्याय, कायद्याची ओढाताण, मल्हारराव महाराजांचा निर्दोषीपणा, संस्थानिकांचा सार्वभौम सत्तेशीं आलेला अंगांगीभाव यांचें आविष्करण केलें होतें. त्या

पुढें चालू.

झालें आहे; परंतु साक्षीपुराव्यांतील दोष ( उदाहरणार्थ, साथी-दारांच्या साक्षींस पुष्टिकारक अशा स्वतंत्र पुराव्याचा अभाव ) यावरून, कर्नल फेयर यांच्या सरबतांत विष सांपडलें. तरी, आरोपी निर्दोष आहे.

राजा सर दिनकरराव राजवाडे यांचा ठराव बहुतेक महाराज शिंदे यांच्याप्रमाणेंच आहे. त्यांनीं तारखांची ओढाताण व रावजी व दामोदरपंत यांच्या साक्षींतील सावळागोंधळ दाखविला आहे. यांमुळें, दोघांच्या जबान्यांवरून एक साग्र कथाभाग जुळत नाहीं.

येणेंप्रमाणें, सदहू आरोपांतून आरोपी मुक्त झाला. तरी, त्याच्या राज्यांतील दुर्व्यवस्थेवरून, त्यास पदच्युत करून, मद्रासेस रवाना करण्यांत आलें. ( ता० २२ एप्रिल १८७५ ) व त्याची गादी सध्यांचें सयाजीराव यांस कशी मिळाली तें पुढें येईल.

---

इंग्रजी लेखाचें उर्दू भाषांतर करवून, तें श्रवण करून, त्याचें मनन करून, त्यांतील लेखनकौशल्य व बुद्धिवैभव यांची सदहू जयपूरच्या महाराजांनीं कदर केली ( मिस्टर एफ. एच. स्क्राइन आय्. सी. एस्. कृत ' एक हिंदी वर्तमान-पत्रकर्ता ' ह्या इंग्रजी पुस्तकांतील पृ० ३८–४० वीं पहा ); व पुण्याचे सुप्रसिद्ध वकील रा० नारायण बापूजी कानिटकर यांनीं ' मल्हारराव गायकवाड ' हें नाटक मराठी रंगभूमीवर आणिलेलेंही पहा.

# प्रकरण ६ वें.



## शेतकऱ्यांचे दंगे ( १८७५ ), भयंकर दुष्काळ ( १८७६ ) व शेतकऱ्यांच्या दुःख-निवारणार्थ कायदा ( १८७९ ).

मल्हारराव महाराजांस कृतकर्माबद्दल यथायोग्य प्रायश्चित्त मिळालें. शिपायांच्या बंडांत लागलेल्या ठेंचेनें सरकार शहाणें झालेलें दृष्टीस पडलें. राजासारख्या एका व्यक्तीच्या कुकृत्यावरच नजर न ठेवितां, त्याच्या पूर्वजांच्या सत्कृत्यांवर लक्ष्य ठेवून, त्याच्या संस्थानाचा अपहार करणें हें सरकारास रुचलें नाहीं. ही, त्यांतल्या त्यांत समाधान मानण्याची गोष्ट आहे.

या सालची पहिली महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे 'शेतकऱ्यांचे दंगे' ही होय. ता० १२ मे १८७५ रोजीं पुणें जिल्ह्यांतील सुपें या गांवीं या दंग्यास सुरवात झाली. नित्याप्रमाणें तो बाजारचा दिवस, म्हणून तेथें आगोदरच अजूबाजूचे पुष्कळ गांवढळ लोक आले होते. तों, दुकानांत एकदम वाण्यांच्या व मारवाड्यांच्या

---

१. सातारा, सोलापूर इ० मुंबई इलाख्यांतील ठळक ठिकाणीं २० वर्षें न्यायखात्यांतिल नोकरी करून महाराष्ट्रास आपल्या बंगालप्रमाणें मातृभूमि मानणारे बाबू सत्येंद्रनाथ टॅगोर आय्, सी. एस् कृत 'बोंबाई-चित्र' ( मुंबई इलाख्याचें वर्णन ) या सचित्र बंगाली ग्रंथांतील पृ० १५६–१५७ वीं पहा.

लुटालूट सुरू झाली. तेथील कापडचोपड जळून फस्त होऊं लागलें. ही बातमी ऐकून जिल्हा मॅजिस्ट्रेट हे पुण्याहून पोलीस-पायदळ व घोडेस्वार व लष्करी पलटण घेऊन तेथें आले. त्यांच्या यत्नानें रु० ६०००।७००० चा गांवांतला माल ज्याचा त्यास परत मिळाला. १०० हून अधिक शेतकरी पकडून ज्यांवर दंगा शेकला, त्यांस शिक्षा झाल्या. सुप्याप्रमाणें इतर गांवींही दंगे झाले. ह्या सर्वांचें सामान्य लक्षण हेंच कीं, ऋणमुक्त होण्याच्या हेतूनें शेतकऱ्यांनीं सावकारांजवळील कर्जरोखे, गहाणखतें, फरोख्तें, मक्तेपत्रें हीं त्यांच्या दप्तरांतून हुडकून काढून त्यांची राखरांगोळी केली; व ज्या सावकारांनीं कागदपत्र देण्यांत दिरंगाई केली, त्यांचा खर्पूस समाचार घेतला—त्यांचें दस्तऐवजरूपी अस्त्र शतशः ध्वस्त केलें, एवढेंच नव्हे तर त्यांचे नाककान कापून, त्यांच्या येथें लूटमार केली. पुणें जिल्ह्यांतील दंग्याचा शेजारील अहमदनगर जिल्ह्यांत प्रवेश झाला. तेव्हां अधिकाऱ्यांनीं मोठ्या यत्नानें सर्वत्र शांतता केली; सावकारांना अभयवचन दिलें; शेतकऱ्यांच्या स्थितीकडे लक्ष्य दिलें.

याच सालीं, आणखी एक निराळ्या प्रकारची हूल घडली. स्वामी दयानंदसरस्वती ही गुर्जर धर्ममूर्ति उत्तरहिंदुस्थानांत व गुजराथ येथें नांव-लौकिक मिळवून, महाराष्ट्रांत अवतीर्ण झाली. तिच्या मनांतून, ‘ प्रार्थनासमाजा ’ च्या साहाय्यानें, जुलै व

---

१ याच महिन्यांत, याच क्लबमध्यें, काशीकर, संस्कृत कवितें ( अनुष्टुभांत )त बायबलचें भाषांतर करणारे रेव्हरंड नीळकंठ शास्त्री थत्ते, यांची सदहू स्वामींशीं झटापट चालली होती. एक दिवस स्वामींचें व्याख्यान, तर दुसरे दिवशीं शास्त्रीबोवांचें.

पुढें चालू.

आगस्ट हे दोन महिने पुणें येथें आपल्या ' आर्यसमाजा ' ची शाखा स्थापण्यांत घालवावयाचे होते. त्या हेतूनें, त्यांनीं बुधवारां-तील बेलबागेसमोरील भिड्यांच्या दिवाणखान्यांत वास्तव्य असलेल्या ' हिंदुक्लबां ' त एक संध्याकाळची व्याख्यानमाला सुरू केली. ती ता० ५ सेप्टेंबरला समाप्त होणार असें प्रसिद्ध झालें. तेव्हां, वे० शा० सं० रामदीक्षित आटपे यांनीं स्वामींचें उट्टें काढण्या-करितां, शकुनिमामासारखी युक्ति काढिली. सकाळचे ६ वाजण्या-पूर्वीं, बरोबर बँड व ५।२५ उनाड टप्पूंचा घोळका असून, उत्तम तऱ्हेनें शृंगारलेली गर्दभाचार्यांची स्वारी काळ्या हौदावरून शहरांत हंशा पिकवीत चालली; ती, संध्याकाळचे ६ वाजतां, ' हिंदुक्लबा ' च्या दाराशीं ठेपली. तों, स्वामींची मिरवणूक हत्तीवरून निघाली. तींत, विरुद्धपक्षाची मंडळी घुसली. बहुत गर्दी उडाली. पाऊस पडल्यामुळें, रस्त्यांत चिखल झाला होता. ज्याच्या हातांत जें सांपडेल, त्यानें तो त्या मिरवणुकीचा समाचार घेत होता. दगड, काठ्या, चिखलाचे गोळे यांशीं गांठ पडली. आदितवारच्या मोती-चौकापासून दारूवाल्याच्या पुलापर्यंत पांचसहा गरीब माणसांना जखमा झाल्या. तेव्हां, पोलिसांच्या मध्यस्तीनें, मिरवणूक शांतपणें मुक्कामास गेली. जखमी लोकांना इस्पितळांत नेण्यांत आलें. कुचाळ लोकांवर खटले करण्यांत आले.[1]

---

त्यांत मौज ही कीं, स्वामींच्या व्याख्यानाच्या वेळीं, दिवाणखान्यांत जाण्यास रीघ नसे; पण शास्त्रीबोवांच्या वेळेस, श्रोत्यांनीं हातपाय पसरून सुखें शयन करावें इतकी जागा असे ( ' निबंधमाला. ' भा. १ ला. पृ० ३७८ वें. कुळकर्णीमंडळीची आवृत्ति, आ० २ री पहा ).

१. श्रीमती रमाबाई रानडेकृत ' आमच्या आयुष्यांतील कांहीं आठवणी . ' ( पृ० ५४–५७ वीं ) पहा.

या वर्षांतील शेवटली व अत्यंत समाधानकारक गोष्ट ‘ युवराजांचें आगमन ’ ही होय. महाराणी व्हिक्टोरिया यांची राजकार्यदक्षता व लोकप्रीति-लालसा या गुणांची तीवरून खात्री पटली. होळकरांनीं युवराजांचें जें स्वागत केलें, तें संस्थानिकांमधील उत्तमांपैकीं एक ठरलें. ता० ९ मार्च १८७६ रोजीं, सकाळचे दहाला, दुतर्फा चारपांच मैल सुंदर सशस्त्र सैन्य पाहून, अभ्यागत दंग होऊन गेले. खालसा मुलखापेक्षां संस्थानच्या प्रजेंत अधिक तेज असतें असें त्यांना वाटलें.[1] जिकडेतिकडे तलवारींचा लखलखाट व कमानींचा थाटमाट पाहून ‘ शिपायांच्या बंडा ’ ची खेदजनक स्मृति त्यांस झाली. संध्याकाळीं पांचाला, लालबागेंत, युवराजांच्या सन्मानार्थ दरबार भरला. नंतर, तुकोजीरावांनीं युवराजांस शेजारच्या एका खोलींत नेऊन, नजर करावयाच्या वस्तूंतून एक उत्कृष्ट हिऱ्याची अंगठी उचलून, ती त्यांच्या बोटांत घातली. रात्रीं रेसिडेन्सींत खाना झाला. त्या वेळीं महाराणींचें आरोग्य चिंतून, तुकोजीरावांनीं मराठींत नम्रतेनें असें भाषण केलें कीं, ‘ महाराणी सरकारांचें राज्य अशा पायावर बसविलेलें आहे कीं, राजा असो, रंक असो, एथून तेथून सर्वांस सारखा न्याय मिळावा. युवराजांसारख्या राजघराण्यांत श्रेष्ठ होऊं पाहणाऱ्यांचे पाय आपल्या गरीब इंदुरास लागले ही त्याची मोठी पुण्याई होय. तर, आपल्या

१ मिस्टर रसेल संपादित ‘ युवराजांचा प्रवास ’ ( आ० २ री. पृ० ५१६ वें ) पहा. प्रस्तुत पुस्तककाराचे परमपूज्य जनक, कै० वा० रा० सा० रावजी वासुदेव टुल्लु एम्. ए. ( भगवानदास संस्कृत स्कॉलर ). एलएल.बी., सुपरिंटेंडंट स्टेट एज्युकेशन ( इंदूर ) यांचें इंग्रजी कविताबद्ध मानपत्र व पुणें येथील ‘ सार्वजनिक सभे ’ चें गद्यात्मक मानपत्र हीं दोन निवडक म्हणून त्या ग्रंथांत पुरवणीदाखल आलीं आहेत.

परमपूज्य मातुःश्रींवर माझी कशी निष्ठा आहे हें आपण त्यांस खात्रीपूर्वक सांगाल अशी आपणांस हात जोडून माझी विनंति आहे.'

अशा शिष्टाचारांत महाराष्ट्र दंग होत आहे, तों त्यावर आकाशाची कुऱ्हाड आली. अरबी समुद्राचे प्रचंड आघात सहन करणारा; देश व कोंकण अशीं महाराष्ट्राचीं दोन छकलें करणारा; कैलासाप्रमाणें, शिरावर धौममहाबळेश्वर धारण करणारा; पाताळासारख्या, खोल खिंडी दाखवून, मनुष्याच्या मनांतील गर्व हरण करणारा; श्रीसमर्थ व श्रीशिवछत्रपति यांचें स्मरण करून देणारा; हिंदीमहासागराचें क्षारजल प्राशन करून, त्याचेंच मधु वमन मेघांकडून करवून कृषिरक्षण करणारा; शेंकडों मैल लांब व सरसगट १५०० पासून २००० फूट उंच असा राक्षसी देह धारण करणारा; गौरकायांच्या वन्हिरथामुळें, सकलांच्या सौख्योपचारार्थ, चंदनाप्रमाणें, स्वदेह झिजविणारा; असा सह्याद्रि क्रूर मुद्रा धारण करून, भावी दुष्काळाचें चिन्ह संपन्न देशावर प्रकट करूं लागला. ज्या महाराष्ट्राचा निश्चय व कंटकवृत्ति अद्यापि अप्रतिम आहे, त्याचें उरलेलें जीवन जें कृषिकर्म, त्यावर अवर्षणाची धाड येऊं लागली. त्यावर आकाश फाटूं लागलें. त्यास ठिगळ लावण्याची तयारी होऊं लागली.

---

१. मुंबईचे तत्कालीन गव्हर्नर, सर रिचर्ड टेंपल, यांनीं '१८८० तील हिंदुस्थान' या आपल्या इंग्रजी ग्रंथांत असाच अभिप्राय दिला असून, महाराष्ट्रावर कडक नजर ठेवण्याविषयीं सरकारास इशारा केला आहे (आ० २ री, पृ० ९ वें व ७२ वें पहा); तसेंच, त्यांचा 'प्राच्य देशांतील अनुभव' (१८८१ ची आ०, प्रस्तावना, पृ० ६ वें; प्रकरण १० वें. पृ० २०८ वें; व प्रकरण १५ वें, पृ० ३४२ वें) पहा.

शेतकऱ्यांचें दुःख निवारण करण्याकरितां, तीन उपाय निघाले. एक उपाय असा कीं, सरकारानें आपल्या ' पब्लिक वर्क्स खात्या ' मार्फत दुष्काळपीडितांकरितां कामें काढावींत; मात्र धान्याचा भाव रुपयास १४ शेर व ३२ शेर असतां जो दोन आणे मजुरीचा दर होता, तो प्रस्तुत दुष्काळाच्या दिवसांत तीन आणे करण्यांत येऊन, त्यांपैकीं अर्धा रोख व अर्धा ऐन जिनसा देण्यांत यावा. दुसरा उपाय असा कीं, शिजविलेलें व कोरें अन्न यांचा धर्मादाय व्हावा. यांत लोकांनीं व सरकारानें एक विचार करून झटलें पाहिजे. प्रत्येक तालुक्यांत असे हजारों लोक असतात कीं, त्यांस दुष्काळाच्या कामांवर जाण्यांत कमीपणा वाटतो. त्यांना राजाच्या किंवा प्रजेच्या अन्नसत्रानें पोषिलें पाहिजे; मात्र अशा संस्था सरकारी स्थानिक अधिकाऱ्यांच्या प्रेरणेनें निघून, लोकाचार व आरोग्य यांकडे लक्ष्य ठेवितां येण्याकरितां, त्यांतील व्यवस्था लोकांकडे असावी. जे थोडे लोक नेमस्त दरानें धान्य घेण्यासारखे असतील, त्यांच्याकरितां, खासगी वर्गणी, म्युनिसिपॉलिटीची मदत किंवा सरकारचा हातभार यांच्या अवश्य त्या हमीवर धान्याचीं दुकानें काढावींत, ' मागणी व पुरवठा ' या अर्थशास्त्राच्या नियमाचा पोरखेळ करूं नये हें खरें; परंतु, ' विपत्तौ न च मर्यादा ' हेंही नीतिवचन तितकेंच खरें आहे. तिसरा व शेवटला उपाय असा कीं, देशावरील दुष्काळपीडित भागांतील गुरांढोरांना कोंकणपट्टींत आणून, तेथें त्यांच्या वैरणीची सोय केली पाहिजे. दुष्काळदुःखनिवारक योजनेंतील ही गोष्ट अत्यंत महत्त्वाची आहे. निदान प्रत्येक कलेक्टरानें आपल्या जिल्ह्यांत १० पासून २५ पर्यंत अशीं स्थळें निर्माण करावींत कीं, जेथें ४००।५०० गुरांढोरांच्या खाण्या-

पिण्याची तजवीज होईल; ज्याचीं १०।१५ गुरें असतील, त्यानें त्यांबरोबर तेथें राहून, वर आलेल्या धर्मादायावर त्यानें निर्वाह करावा. ' पांजरपोळ ' संस्थेचा कांहीं निधि इकडे खर्च करण्यास पंचांना कांहीं हरकत नाहीं. तसेंच वर्षारंभीं लिलावानें विकून टाकलेलीं कुरणें सरकारानें त्या त्या खरेदीदारास योग्य मोबदला देऊन, त्यांपासून परत घ्यावींत; या गोष्टीस ते लोक कबूल न झाल्यास, तीसंबंधीं कायदा करावा; नंतर तीं कुरणें रयतेस खुलीं ठेवावींत[१].

अर्वाचीन महाराष्ट्र, अशा रीतीनें, दुष्काळांतून डोकें वर काढीत आहे तों, त्यावर आणखी एक दुःखाचा डोंगर कोसळला. ता० २० मे १८७८ रोजीं, अर्वाचीन महाराष्ट्राचा एक मुकुटमणि हरपला. ' तुम्ही तिघे आजवर जसे गोडीगुलाबीनें एकत्र राहिलांत, तसें पुढेंही तुम्हीं रहावें. ' असा शेवटला हितोपदेश आपल्या समजूतदार मुलांस इंग्रजींत करून वे० शा० सं० कृष्णशास्त्री चिपळूणकर यांचा अंत छातींतील कळेनें त्यांच्या ५४ व्या वर्षीं झाला. पुण्याचें नाक गेलें ! पुण्याचें विद्वत्त्व गेलें ! मोरशास्त्री साठे या गुरुवर्यांच्या वचनानुसार कालमान फिरलेलें पाहून, कृष्णशास्त्री यांनीं आपलें पूर्ववय पुण्याच्या पाठशाळेंत गदाधरादिकांच्या समागमांत घालवून, खांद्यावर शालजोडी टाकून भिक्षावृत्तीनें दारोदार फिरण्यांत राम राहिलेला नाहीं असें पाहून, मिल्ले[२]-

---

१. ' नामदार रावसाहेब मंडलिक, सी. आय. ई. यांचे लेख व भाषणें ' ( इंग्रजी ), पृ० १२१--१२४ वीं पहा.

२ एकट्या मिल्लच्या व्यासंगानें, त्यांची बुद्धि सामाजिक सुधारणेकडे वळली; एवढेच नव्हे, तर तींत मिल्लची नास्तिकता शिरली ! ( रा० लक्ष्मण कृष्ण चिपळूणकर, बी. ए. कृत ' विष्णुशास्त्री चिपळूणकर यांचें चारित्र, ' पृ० १८९ वें पहा ).

प्रभृति पाश्चात्त्य तत्त्वज्ञांच्या संगतींत उत्तरवय घालवून, रविकर-गतकमलन्यायानें आपल्या विकासप्रद सान्निध्याचा अमूल्य लाभ 'निबंधमाला' कारांस करून देऊनें, आपलें भाषावृद्धि व देशोन्नत्ति करण्याचें पवित्र व्रत आपल्या सत्पुत्रांस पाळण्यास लावून, त्यांनीं जो मोठा कार्यभाग 'पूना कॉलेजांतील प्रोफेसर,' 'ट्रेनिंग-कॉलेजचे प्रिन्सिपॉल,' 'रिपोर्टर ऑन द नेटिव्ह प्रेस, 'दक्षिणाप्राइझ-कामिटी' चे सेक्रेटरी, 'वसंतवक्तृत्वोत्तेजक सभेचे' अध्यक्ष 'विधवाविवाहसाहाय्यक सभेचे' सभासद या नात्यांनीं पार पाडिला; त्यांतल्या त्यांत, 'सॉक्रेटिसचें चरित्र,' 'अरेबियन नाइटस्,' 'रॅसेलस्,' 'अनेकविद्यामूलतत्त्वसंग्रह,' 'अर्थशास्त्र,' 'व्याकरणा-वरील निबंध' अशी विविध वाङ्मय सेवा त्यांस भूषणावह झाली.

मुंबईसरकारानें १८७८ चा ५ वा ॲक्ट अबकारीसंबंधीं पास केला. त्यामुळें, उत्तर कोंकणांतील भंडारी व कनिष्ठ वर्गांतील लोकांस अडचण झाली. आपलें दुःख सरकारच्या नजरेस आणून, तें सर-कारकडून दूर व्हावें म्हणून ठाणें जिल्ह्यांतील लोकांनीं एक इंग्रजी अर्ज गव्हर्नरसाहेबांकडे रवाना केला. त्यांत त्यांनीं असें म्हटलें होतें कीं, १८७८ पूर्वीं जे जे लोक दारूच्या धंद्यांत पडलेले होते, त्यांवर आज गदा आली. खजुरीवर रु० १॥ पासून रु० ४, ताडावर रु० ३ पासून रु० १२, व माडावर रु० ३ पासून रु० १४ असा जबरदस्त कर बसला. ठाणें जिल्ह्यांत कल्याण, वसई, माहीम येथील दारूच्या कंत्राटदारांशिवाय, त्या त्या झाडांच्या माल-कांस, वरील कर सरकारास देऊनही, ताडी काढण्याची मनाई झाली. तींत हेतु एवढाच कीं, ताडीचा खप जितका कमी होईल,

---

१. मांडेप्रकाशित 'निबंधमाला' ( भा० १ ला, पृ० १२१ वें ) पहा.

तितका मोहाच्या फुलांच्या दारूचा खप वाढेल. गांवोगांवीं ही दारू मिळूं लागली, पण समुद्रकांठीं राहणाऱ्या बऱ्याच मोठ्या लोकसमुदायाचें मुख्य पेय व दिवसाचा शीणभाग दूर करण्याचें साधन जी ताजी ताडी ती मिळेनाशी झाली. दुसरें मोठें नुकसान हें झालें कीं, कित्येक तालुक्यांचा एक संच जमवून घाउक लिलाव केल्यामुळें परस्थ श्रीमंतांस लिलाव बोलावयास सांपडून, पूर्वीच्या किरकोळ लिलाव बोलणाऱ्या ग्रामस्थ मध्यम स्थितींतील लोकांची पिच्छेहाट होऊन, ते निरुद्योगी झाले. तिसरा व शेवटला त्रास हा कीं, सध्यांच्या ५।५ वर्षांच्या मोठ्या मक्तेदारांनीं, लोकांची आवडनावड पाहून, चांगला व मुबलक माल तयार ठेवण्याची पर्वा केली नाहीं. त्यामुळें, अबकारी अक्टाप्रमाणें, बारीकसारीक गुन्ह्यांबद्दल ठाणें येथील तुरुंगांतील कैद्यांपैकीं एक तृतीयांश लोक सुखासमाधानानें राहणारे कैदी झाले आहेत[1]. तर, सध्यांची मक्त्याची पद्धति सोडून, पूर्वींची बुडीद ( झाडावरील कर ) देऊन, त्यावरील ताडीमाडी काढण्याबद्दल ज्यादा फी देऊन, त्याचे मालकास तो द्रव काढून विकण्याचा हक्क मिळून, योग्य चढाओढींत लोककल्याण होऊं द्यावें.

दक्षिण कोंकणांत ' खोती-बिल ' ( १८७९ ) पास होण्याकरितां, मुंबईसरकारच्या टेबलावर आलें. विजापूरच्या निजामशाहापासून चालत आलेला खोतांच्या जमिनीवरील त्यांचा मालकी हक्क, ते आपल्या धारेकऱ्यांस छळतात म्हणून, काढून टाकण्याचा बूट निघाला. ज्या खोताची १०० रु० किंमतीची जमीन आहे, त्याच्या त्या जमिनीच्या मशागतींत ज्यानें कवडी खर्च केली नाहीं,

---

१ ' १८७८ च्या मुंबईइलाख्यांतील ५ व्या अबकारी ॲक्टामुळें होणाऱ्या दुःखाच्या निवारणार्थ ठाणेकरांचा अर्ज ' ( पृ० ४ थें ) पहा.

त्या धारेकऱ्याच्या नांवें तींतील कांहीं भाग दाखल करून, पाहणीकामदारानें तिची किंमत ३०० रु० वर आणून, पुन्हा ह्या लुटीचा ठपका खोतावर ठेवावा; मामलेदारानें धारेकऱ्याशीं गुपचुप सार्टेलोटें जुळवून, त्याकडून परभारें धारा वसूल करावा; अशा अनिष्ट प्रकारांचा उपक्रम झाला. वास्तविक प्रकार सरकारच्या नजरेस आणून देणारी मान्य रचना म्हटली म्हणजे मिस्टर चॅप्लिन् यांचा रिपोर्ट ( १८२१ ), मिस्टर कँडी यांच्या दप्तरांतील ' खोती कागदपत्रांचा संग्रह, ' मिस्टर विंगेट यांचा रिपोर्ट, मेसर्स बर्डबुड, अयर्न व लायन यांचे फैसले असून, खुद्द सरकारच्या हातच्या अशा सनदा झालेल्या होत्या कीं, सदर्हू गांवांतील झाडझडोरा, पाटबंदस्ती, गवतकाडी, दगडबिगड, जमीनजुमला हा सर्वस्वीं वंशपरंपरागत खोतीवतनाचा आहे. दक्षिण कोंकणांत, शेतकऱ्यांशिवाय इतर लोक मजुरीवर पोट भरणारे नसल्यामुळें, धारेकऱ्यांसच सवलतीचा धारा ठरवून, आठवड्यांतून एक दिवस खोताच्या शेतीवर वेठीनें काम करण्याची चाल असे. तीमुळें, जुलूम होत नसे. तरी, सरकारास धारेकऱ्यांवर जुलूम होतो असें वाटून, त्यानें त्या गरिबास खोताच्या वरवर दिसणाऱ्या मगरमिठींतून सोडविण्याचा यत्न केला.

दक्षिण कोंकणांतील धारेकऱ्यांप्रमाणें, देशावरील शेतकऱ्यांचें दुःख निवारण करण्याकडे सरकारचें लक्ष्य वेधलें; व तसें तें वेधण्याचें कारण मागें आलेले शेतकऱ्यांचे दंगे हें आहेच. परंतु त्यांची

---

१. ' नामदार रा० सा० विश्वनाथ नारायण मंडलिक, सी. आय्. ई. यांचे लेख व भाषणें ' ( इं० ), पृ० ७०, ७१, ७९, ८२, ९४, ९५, १०२, १०३, १०७, १०८ वीं पहा.

शाहानिशा करण्याचा प्रसंग येऊन ठेपला हें सरकारच्या ध्यानांत येऊन, तदनुसार त्याकडून कृति घडली.

शेतकऱ्यांची स्थिति कशी आहे, ती बिघडण्याचें कारण कोणतें आहे, ती सुधारण्यास कशाची जरूर आहे, या प्रश्नांचा विचार करण्याकरितां सरकारानें एक कमिशन नेमिलें. त्यांत मुंबई-इलाख्यांतील एक न्यायाधीश, वायव्य प्रांतां-( सध्यांच्या संयुक्त प्रांतीं )तील दोन जमाबंदी कामदार व मुंबई इलाख्यांतील दोन जमा-बंदी कामदार असे पांच कमिशनर होते. खरें पाहूं गेलें, तर त्यां-पैकीं पहिले तीन त्रयस्थ अतएव योग्य, परंतु शेवटचे दोन, ' गुळाचा गणपति व गुळाचाच नैवेद्य ' या न्यायानें, स्वतःच्या कृतीवर प्रांजलपणें अभिप्राय देण्यास असमर्थ होते. तेव्हां, पहिल्या तिघांनीं सरकारची ' सव्वा लाखाची मूठ ' सहज उघडून, असें सिद्ध केलें कीं, अशिक्षित शेतकऱ्यास सरकारचा डोईजड सारा, धान्यास चांगला दर येण्यापूर्वीं नुकसान सोसून तें विकून किंवा सावका-रच्या जाळ्यांत सांपडून, भरावा लागतो. रय्यतवारी पद्धतीप्रमाणें, सरकार हेंच खोत किंवा जमीनदार असल्यामुळें, सरकारास साव-कारांपासून रयतेचें कल्याण करणें असल्यास, सरकारनेंच रयतेस स्वस्त व्याजाच्या दरानें रक्कम कर्जाऊ देऊन, रयतेची अडचण दूर करावी. सरकारनें रयतेच्या पाठीवर मारावें. सरकारनें रयतेच्या

---

1. The revised assessments of the land revenue in thjs Presidency were too heavy & that the manner of aasessment faulty'—*The Dekkan Riots Commission* in the words of the State Secretary's Despatch No 4 dated 87 th March 1880.

पोटावर मारूं नये. सावकारानें दरसाल दरशेंकडा ३५ टक्के व्याज आकारिलें, तर सरकारनें त्याच्या १/६ आकारिलें, तरी हरकत नाहीं. सावकारास आपली रक्कम वसूल करण्याकरितां यातायात पडते; तेवढी सरकारास आपली रक्कम वसूल करावयाकरितां पडणार नाहीं. सावकाराप्रमाणें, सरकार हें खोटीं खतें, हिशोबांतील खेंचाखेंची इत्यादि अनिष्ट प्रकार करून, रयतेस फसविणार नाहीं. सबब, सरकारनें प्राथमिक शिक्षण व पोस्टल सेव्हिंग्स् बँक यांचा सर्वत्र प्रसार करून, रयतेच्या निढळत्या घामाची अल्पस्वल्प शिल्लक राहील असा सारा पण उतरविला पाहिजे.

कमिशनच्या रिपोर्टांतील वरील सूचना मुंबईसरकारला मान्य झाल्या. मात्र, सारा उतरविण्याविषयींची सूचना त्यास पसंत पडली नाही. कारण, त्या बाबतींत कमिशननें जो कोटिक्रम लढविला, त्याची अंमलबजावणी करणें हें त्यास जड वाटलें. तसें करूं म्हटलें, तर पूर्वींची ऐनजिन्नसी वसूलपद्धति पुन्हा सुरू करावी लागेल. परंतु, ती अवनतिकारक रूढि प्रचलित करणें हें सरकारास बिलकूल शक्य नाहीं. जर सरकार देण्याचा दर ठराविक नसेल, तर रयतेनें कायद्याप्रमाणें सरकारास काय द्यावें या संबंधीं धरबंद राहणार नाहीं. सरकार व रयत यांचा प्रस्तुतसारखा निश्चित संबंध असून, जर असा गृहभेद दृष्टोत्पत्तीस येऊं लागला, तर पूर्वींचा अनिश्चित प्रकार सुरू केल्यास, सर्वजण घरच डोक्यावर घेतील. [1]लोकांत उन्नतीची आशा व तदंगभूत राजनिष्ठा उत्पन्न करण्याकरितां, सरकारास जी घस सोसावी लागते, ती सोसण्याचा मार्ग

---

१. सर रिचर्ड टेंपलकृत ‘ प्राच्य देशांतील अनुभव ’ ( १८८१ ची आवृत्ति, प्र० ८ वे, पृ० १८२ वें ) पहा.

खुंटल्यासारखा होईल. कारण, सरकाराला होतां होईल तोंपर्यंत ' ऋण काढून सण ' करावयाचा नाहीं. सदर्हू कमिशनच्या ठायीं ही व्यवहारशून्यता दृग्गोचर होत असल्यामुळें, त्यास धोपट मार्ग दिसत नाहीं. तेव्हां सरकारास ' शेतकऱ्यांच्या दुःखनिवारणार्थ कायदा ' ( १८७९ ) करतां येतो—

तो असा कीं, शेतकऱ्यांनीं सावकाराला जीं खतें लिहून द्यावयाचीं, तीं सरकारासमक्ष लिहून, त्यांनीं तीं नोंदवून घेतलीं पाहिजेत; उग्राणी केलेल्या रकमांच्या पावत्या सावकारांनीं शेतकऱ्यांस दिल्या पाहिजेत; शेतकरी मागतील, तेव्हां सावकारांनीं त्यांस हिशोब दाखविले पाहिजेत; त्यांच्या नकला त्यांस दिल्या पाहिजेत; शेतकऱ्यांवरील मुकदम्यांत, होतां होईल तोंपर्यंत, कोर्टानें तंटा आपसांत मिटविण्याचे उपाय केले पाहिजेत; प्रतिवादीच्या गैरहजिरीवरून, कोर्टानें एकतर्फी हुकूमनामा देऊं नये; प्रतिवादीनें पैतृक ऋण खुशीनें कबूल केलें, तर ठीक; नाहीं तर, तें फेडलेंच पाहिजे असें नाहीं; सावकारांस चक्रवाढ व्याज अग्राह्य असून, एका रकमेनें ' दामदुप्पट ' किंवा मुद्दलाहून अधिक व्याज घेतां येत नाहीं; आपण सावकाराचें कर्ज फेडण्यास असमर्थ आहों असें शेतकऱ्यांनीं कोर्टांत येऊन म्हणतांच, कोर्टानें त्यांस पकडून आणण्याची गरज नाहीं; जी जमीन कर्जाकरितां शेतकऱ्यांनीं सावकारांकडे गहाण ठेविली नसेल किंवा ती तशी ठेविली असून गहाणखत नोंदविलें नसेल, तिचा त्या कर्जाकरितां लिलांव होणार नाहीं.

प्रस्तुत कायदा लोकप्रिय होण्यास, स्वदेशी वस्त्रांबरोबर १८७६ त स्थापन झालेल्या ' लवादकोर्टांचा महिमा ' व्याख्यानरूपानें लोक-

निदर्शनास आणून देण्याचा रा. गणेश वासुदेव जोशी ऊर्फ 'सार्वजनिक काका' यांचा प्रयत्न बराच कारणीभूत झाला.

---

# प्रकरण ७ वें.



## वासुदेव बळवंत फडके यांचें बंड ( १८७९ ).

'शेतकऱ्यांच्या दुःखनिवारणार्थ कायदा' होऊन, त्यांच्या ऋणमुक्ततेचा एक उपाय निघत असतां, एका भयंकर ज्वालामुखीचा आकस्मिक स्फोट झाला. ता० १३ मे १८७९ रोजीं (म्हणजे सुमारें ५० वर्षांनंतर), रात्रीं, शनवारवाड्याप्रमाणें, विश्रामबाग व बुधवारवाडा या दोहोंच्या आहुति अग्निनारायणास पडल्या! पेशवाईच्या ऐश्वर्याची एकेक निशाणी नष्ट होत चालली म्हणून, सर्व पुणें शहर हळहळत झोंपेंतून जागें होत आहे तों, त्या त्या वाड्याची आग विझविण्याकरितां, शेंकडों बंब तेथें येऊन थडकले. त्यांतून पर्जन्यासारखी जलवृष्टि होऊं लागली. पोलीससुपरिंटेंडेंट मेजर डॅनियल यांची पोलिसपार्टी, लष्करांतील गोरे व काळे लोक, शहरांतील सभ्य व असभ्य, सुशिक्षित व अशिक्षित, श्रीमंत व गरीब, लहान व थोर हे सर्व एकदिलानें त्या वाड्यांची अखेरची सेवा करूं लागले. युरोपियन अंमलदार आपल्या मडमांसह त्या ठिकाणीं येऊन, जणूं काय त्या पेशवाईच्या स्मारकांस

सलामी देऊं लागले. शिंगांच्या वरचेवर होणाऱ्या भयंकर आवाजानें सर्वत्र शून्यता वाटूं लागली. आज, पुणें शहरांत कांहींतरी राजकीय फितुरीचा रंग असून, भयंकर दंगा होतो कीं काय अशी सर्वांस भीति वाटूं लागली. बंदोबस्तासाठीं नाकेबंदी होऊन, सरकारी तारायंत्राचे कडकट्ट कडकट्ट असे एकसारखे ध्वनि येऊं लागले.

आज रात्रीं, वासुदेव बळवंत फडके ( फरासखान्यांतील फायनन्स खात्याकडील कारकून ) हा जवान्मर्द देशाभिमानी ब्राह्मण-शिपाईगडी आपल्या शंभर रामोश्यांसह बोरघाटांतील आपल्या तळाहून पुण्यावर चालून येणार आहे; तो गणेशखिंडीवर जाऊन गव्हर्नरसाहेबांवर छापा घालणार आहे; अशा अनेक कंड्या उठल्या. सरकारासही असें वाटलेंसें दिसलें कीं, आज पुणें शहर आपल्या हातून निसटतें कीं काय; कारण, वासुदेव बळवंताच्या फितुरींत, पुण्यांतील विद्वान् व वजनदार मंडळी असावी असा सरकारास वहीम आला होता.

ज्यांच्या फैसल्यावरील अपिलाची सुनावणी चालली असतां, सर मायकेल वेस्ट्रॉप्सारखे मुंबई येथील हायकोर्टचे चीफ जस्टिस् खूष होऊन, आपल्या मांडीशीं मांडी लावून बसण्याची ज्यांची योग्यता आहे असें भविष्य करीत होते, ज्यांची पुण्याहून अन्य गौणस्थलीं बदली करून अप्रतिष्ठा करण्याविरुद्ध हायकोर्टाचा अभि-

---

१. सर रिचर्ड टेंपल ( मुंबई इलाख्याचे तत्कालीन गव्हर्नर ) कृत '१८८० तील हिंदुस्थान ' ( आ० री, पृ० १९८-१९९ वीं ) व ' प्राच्य देशांतील अनुभव ' ( १८८१ ची आ०, प्र० ८ वें, पृ० १८२ वें ) पहा.

२. अंबालेकर वकील बाबू माधोराम बी. ए. कृत ' श्रीमान् महादेव गोविंद रानडे और उनका काम ' ( १९०९ ची आ०, पृ० १८ वें ) पहा.

प्राय होता, त्या रावबहादूर रानडे,[1] फर्स्टक्लास सबॉर्डिनेट जज्ज, यांची पुण्याहून नाशिकास व नाशिकाहून खानदेशास उचलबांगडी करण्यांत आली. परंतु, ज्यांस तुर्कस्थान किंवा आफ्रिका येथील युद्धाच्या रम्यवार्तेनें पूर्वीचा मराठी गनीमी कावा करून, इंग्र-जांच्या कडेकोट लष्करी बंदोबस्तास धूप न घालून, बडे बडे म्हण-विणारांच्या रक्ताचा सडा शिंपडून, मुंबईसरकारचीं दोन काळीं पायदळ पलटणें व एक काळे घोडेस्वारांचें पलटण यांस तीन महिने खेळवून, ज्यानें स्वतास ' दुसरा शिवाजी ' म्हणण्यास आरंभ केला होता, त्या वासुदेव बळवंत फडके यांस जमीनदोस्त करण्याकरितां सरकारचे नाकीं नऊ आले[2] ! तेव्हां, ते राजश्री गाणगापुरच्या धर्मशाळेंत रात्रीं तापानें फणफणत एकटे परंतु सशस्त्र, यात्रेकरूच्या वेषांत निद्रिस्त असे हातीं येऊन, तेथून त्यांस पुण्यास आणून, न्यायासनासमोर उभें करून, काळ्या पाण्यावर पाठविण्यांत आलें.

लक्ष्यांत ठेवण्याची एक गोष्ट ही कीं, सदहू फडके यांस जेव्हां पकडण्यांत आलें, तेव्हां झाडा घेतांना त्यांची रोजनिशी

---

१. मुंबईच्या ' टाइम्स ऑफ् इंडियां ' त, रानडे या नांवाच्या एका इसमाने बुधवारच्या वाड्यास आग लाविली होती; सबब त्याचा बादरायण संबंध रावबहादूर रानडे यांशीं लाविला होता. ( श्रीमती रमाबाई रानडेकृत ' आमच्या आयुष्यांतील कांहीं आठवणी, ' आ० २ री, पृ० ७० वें पहा ).

खानदेशासारख्या दूरच्या जिल्ह्यांत त्यांस फेंकिल्यावरही,. वरिष्ठ अधिकारी त्यांचीं पत्रें फोडून त्यांकडे पाठवीत ( तेंच पुस्तक, पृ० ७१ वें पहा ).

२. सर रिचर्ड टेंपलकृत ' प्राच्य देशांतील अनुभव ' ( १८८१ ची आ०, प्र० १६ वें, पृ० ३८२ वें ) पहा.

मिळाली, तीवरून सरकारची अशी खात्री झाली कीं, पुण्यांतील वरील दोन आगींच्या वेळीं, फडक्यांची छावणी घाटांत होती; व फडक्यांच्या बंडाशीं रावबहादूर रानडे यांचा अर्थार्थी संबंध नव्हता. व जी बुद्धिमत्ता एकदा लोकांवर सत्ता गाजविण्यांत प्रकट झाली होती, जी कर्तृत्वशक्ति एकदा लोकांत चळवळ उत्पन्न करीत होती, जी कंटकवृत्ति एकदा लोकांस जिवावरच्या संकटाची पर्वा न करण्यास लावीत होती; जी औदार्यलहरी एकदा लोकनौकेस पैलतीरास नेत होती; ती बुद्धिमत्ता, ती कर्तृत्वशक्ति, ती कंटकवृत्ति व ती औदार्यलहरी, माल, दैवरूपी जादूगाराची कांडी सर्कन फिरतांच चटकन् कोठल्या कोठें नाहींशी होऊन, इंग्रजी राज्याची घडी विसकटूं पाहणें हें काम, म्हणजे बहुतेक चुटक्यांचा मांडव उभा करूं पाहणें आहे, असें अर्वाचीन महाराष्ट्राच्या प्रतीतीस आलें.

# प्रकरण ८ वें.

## राष्ट्रीय सभेची प्राणप्रतिष्ठा ( १८८५ ).

वासुदेव बळवंत फडके यांची वाऱ्याची मोट फुटल्याचें मागें आलें आहे. तरी पुण्याची कर्तृत्ववान् मंडळी आपला कर्माधिकार अन्य व स्तुत्य दृष्टीनें व्यक्त करूं लागली. ‘ निबंधमालें ’ तील स्वतंत्र विचार हे राजसेवेस नडूं लागून, ता० १ ऑक्टोबर

१८७९ रोजीं, विष्णुशास्त्री यांनीं सहा महिन्यांची रजा घेऊन, ता० १ जॅन्युअरी १८८० ला रु० १०० ची सरकारी मास्तर-कीची जागा सोडून, बुधवारांतील मोरोबादादा फडणिसांच्या वाड्यांत, रा. बाळ गंगाधर टिळक बी. ए. एल्एल्. बी. व रा. महादेव बल्लाळ नामजोशी यांच्या साह्यानें ' न्यू इंग्लिश स्कूल ' म्हणून, शिक्षक व विद्यार्थी यांस लागेल तेवढें स्वातंत्र्य देणारी; हेड-मास्तर व इन्स्पेक्टर यांपासून निर्भय, कॅटलॉग, बुकें, रजिस्टर कागद यांच्या त्रासांतून मुक्त, घंटा व वेळापत्रक यांच्या तंत्रा-पासून विन्मुख, तरी विद्यार्थांस मोकळ्या मनानें शिक्षकांना शंका विचारूं देणारी, व त्यांत सभ्यपणा राखणारी, अशी नवीन शाळा काढिली.

ता० ३१ ऑक्टोबर १८८० ला, रा. अण्णासाहेब किर्लो-स्कर यांनीं ' संगीत शाकुंतलाचा पहिला प्रयोग ' पुण्यांतील ' आनंदोद्भव ' नाटकगृहांत करून, नाट्यकलेची अभिरुचि लोकांत उत्पन्न करण्याचा यत्न सुरू केला. त्यांत त्यांस इतकें मोठें यश प्राप्त झालें कीं, ' ' केसरीसारख्या नवीन परंतु वजनदार होऊं पाहणाऱ्या साप्ताहिकांत, विष्णुशास्त्री यांसारख्या देशभक्त विद्व-द्रत्नास ' नाटकें पहावींत कीं पाहूं नयेत ? ' असा विद्वत्ताप्रचुर व सहानुभूतिपूर्ण अग्रलेख लिहिण्याची स्फूर्ति झाली.

१८८१ च्या सुमारास, मुंबईंतील ' प्रार्थनासमाजा ' च्या मुख्य शाळेंत, पंडिता रमाबाई यांनीं ' आर्यमहिलासमाज ' नांवाची स्त्रीशिक्षणास मदत करणारी एक संस्था डॉ० आत्माराम पांडुरंग तर्खडकर, भास्करराव भागवत इ० पोक्त मंडळीच्या साहा-य्यानें काढिली. तिच्या सभा दर शनिवारीं भरत असून, कोणीं



श्रीमंत महाराज सयाजीराव गायकवाड, बडोदे. [ पृ० ७७

एखाद्या विषयावर निबंध वगैरे लिहून आणून वाचीत असत; नंतर त्यावर थोडीबहुत चर्चा होत असे. रावबहादूर रानडे व प्रोफेसर केरो लक्ष्मण छत्रे यांनीं पुण्यांतील ' फीमेल ट्रेनिंग कॉलेज ' च्या दिवाणखान्यांत स्त्रीशिक्षणास साहाय्य करण्याकरितां, साप्ताहिक व्याख्यानांची अशीच कांहीं योजना केली होती. हिलाही जोडून, पंडिता रमाबाईनीं आपल्या ' आर्यमहिलासमाजा ' ची एक शाखा काढिली. तींतील पंडिता बाईच्या मधुर, अस्खलित, सहज व मनोरम वक्तृत्वशैलीनें, सदर्हू संस्था लोकप्रिय होऊं लागली.

ता० २८ डिसेंबर १८८१ ला, मल्हाररावामागें त्यांचें कुटुंब श्रीमती जमनाबाई यांच्या मांडीवर बसविलेले, खानदेशांतील श्रीमंत काशीराव बाबासाहेब गायकवाड यांचे मधले पुत्र, सातारचे कलेक्टर मिस्टर इलियट यांच्या हाताखालीं शिक्षण मिळवून, तंजावरच्या राजकन्या चिमणाबाईसाहेब यांशीं शरीरसंबद्ध झाले. श्रीमंत सयाजीराव महाराज यांस राज्याधिकाराचा योग आला. त्या मंगल समयीं, ' केसरी ' नें त्यांस अत्यंत कळकळीनें असा सदुपदेश केला कीं, राजाचें वर्तन अत्यंत विचारशील असावें; त्यानें राजाप्रजा यांच्या हितांत एकात्मता राखावी; प्रजासत्तात्मक राज्याकडील जगाच्या स्वाभाविक प्रवृत्तीस उत्तेजन द्यावें; उत्तम मंत्री नेमून, लोककल्याणार्थ झटावें; लोकांस मुद्रणस्वातंत्र्य द्यावें; कायदे लेखी असून, न्याय थोड्या खर्चांत व थोड्या वेळांत मिळावा; खासगी व सरकारी खातीं वेगवेगळीं असावींत; कारभार कमी ठेवून, त्यांचा विनियोग लोकहितार्थ करावा.

---

१. वर्ष १ लें, अंक ५२ वा पहा.

१८८२ तील पहिला चर्चाविषय म्हणजे ' कोल्हापूर प्रकरण ' हें होय. कोल्हापुरचे कारभारी रावबहादूर बर्वे यांच्या कारभारावर निष्कारण कडक टीका करून, त्यांची लेखी अब्रूनुकसानी केल्याचा आरोप ' केसरी ' चे संपादक रा. गोपाळ गणेश आगरकर एम्. ए. व ' मराठ्या ' चे एडिटर रा. बाळ गंगाधर टिळक बी. ए. एल्एल्. बी. यांवर शाबीत झाला व बॅरिस्टर मिस्टर फेरोजशहा मेहता, एम्. ए. यांची वकिली-मात्रा फिर्यादी-तर्फेचे बॅरिस्टर मिस्टर इनव्हरॅरिटी यांवर चालली नाहीं. आरोपींस मुंबईतील डोंगरीवर ' १०१ दिवसांचा कारागृहवास ' भोगावा लागला.

ही धास्ती धरून विष्णुशास्त्री चिपळूणकर या व्यवसायबंधूंनीं ता. १७ मार्च १८८२ ला विषप्राशन करून आत्महत्त्या केल्याची कंडी पोलीसपर्यंत पोंचली. परंतु, प्रो० केरूनाना छत्रे, बाबा गोखले वगैरे वजनदार मंडळींनीं डॉ० विश्राम रामजी घोले या सरकारदरबारांत मानमान्यता असलेल्या डॉक्टरांचा दाखला आणून पोलिसची संशयनिवृत्ति केली. ' हितवादी ' सारखी इंग्रजी शिकलेली मंडळी आपणांपासून दूर पश्चिमेकडे अंधपणानें धांवू नयेत म्हणून विरुद्ध दिशेनें ज्या मालाकारांनीं सवाई जोर दाखविला होता, ज्या ग्रंथकारानीं प्रतिपक्षाचा पराभव करितांना त्यांचा उपहास करण्यांत आपल्या मानी स्वभावानुसार अप्रातिम उत्साह दाखविला होता, ते देशहितार्थ कच खाणारांपैकीं होते हेंही संभवत नाहीं.

ता० ७ एप्रिल १८८३ रोजीं सौ. आनंदीबाई जोशी[1] या सतरा वर्षांच्या तरुणीनें, देशहितार्थ असेंच अपूर्व धैर्य दाखविलें.

---

१. मिसेस् चॅप्मनकृत ' कांहीं विख्यात हिंदी स्त्रिया ' या इंग्रजी कृतींत अग्रस्थान दिलें आहे.

कोल्हापूरचे अमेरिकन मिशनरी रेव्हरंड गूहिन यांमार्फत, त्याचे अमेरिकेंतील मित्र मिस्टर वाइल्डर यांस पाठविलेलें पत्र व त्यांस मिळालेलें उत्तर हीं ' ख्रिश्चन रिव्ह्यूं ' त रोशेलकर मिसेस् कार्पेंटर या परोपकारी ' अमेरिकन मावशी ' स वाचावयास सांपडल्या दिवसापासून येथपर्यंत त्या दोघीजणींत प्रेम वृद्धिंगत होत जाऊन, आपले प्रियपति रा. गोपाळराव जोशी यांस निरुपायानें हिंदुस्थानांतील पोस्टखात्याच्या नोकरीवरच सोडून, आनंदीबाईनीं आपल्या अज्ञ देशभगिनींकरितां वैद्यकाच्या सिध्द्यर्थ कलकत्याहून अमेरिकेस प्रयाण केलें. असें साहस आजपर्यंत, कोणत्याही हिंदी स्त्रीनें केलें नव्हतें. या मागूनचा मानही अर्वाचीन महाराष्ट्राकडेच आहे. पंडिता रमाबाई सरस्वती या आपल्या २५ व्या वर्षी स्वयंवृतप्रियपति बाबू बिपिन बिहारी मेधावी, एम्. ए बी. एल्. यांच्या लग्नापासून १ वर्षांत झालेल्या दारुण मृत्यूनंतर, आपलें एकुलतें एक प्रियबालक मनोरमा हिला बरोबर घेऊन उच्च शिक्षणद्वारें विधवांची उन्नति करण्याकरितां, मुंबईहून विलायतेस निघाल्या ( १८८३ ).

पुढील सालीं, महाराष्ट्रांत शिक्षणप्रसारार्थ, ' डेक्कन एज्युकेशन सोसायटी, ( मागें आलेल्या ' न्यू इंग्लिश स्कुला ' स कायदेशीर रीतीनें अस्तित्वांत आणणारी संस्था ) व ' महाराष्ट्र फीमेल एज्युकेशन सोसायटी ' ( पुण्यांतील मुलींचें हायस्कूल, नॉर्मल-स्कूल व स्त्रियांचें ट्रेनिंग कॉलेज या निम-सरकारी संस्था चालविणारी ) लोकरंजनार्थ प्रो० विष्णुपंत छत्रे यांची प्रो० विल्सन यांच्या नमुन्या-वरची सरकस, असे नवे प्रकार दृष्टीस पडत असतां, त्यांत भर

---

१. मिसेस् चॅप्मनकृत ' कांहीं विख्यात हिंदी स्त्रिया ' यांत त्यांस द्वितीय स्थान दिलें आहे.

घालण्याकरितांच कीं काय, लॉर्ड रिपन या लोकप्रिय व्हाइसरॉय साहेबांनीं रावसाहेब विश्वनाथ नारायण मंडलिक, सरकारी वकील ( मुंबई )यांस आपल्या कायदेकौंसिलांत मुंबई इलाख्यातर्फे सभासद नेमिलें. या निवडणुकींत राजकर्त्यांची गुणग्राहकता स्पष्ट व्यक्त झाली. कारण, रावसाहेब मंडलिक यांनीं, मुंबईचें हायकोर्ट, मुंबईचें म्युनिसिपल कॉर्पोरेशन, मुंबईचें विश्वविद्यालय यांतच नव्हे; तर मुंबईच्या कायदेकौंसिलांत सर रिचर्ड टेंपल व सर जेम्स् फर्ग्युसन या गव्हर्नरद्वयाबरोबर अत्यंत निर्भयतेनें व निःस्पृहतेनें केवळ स्वजनहितार्थ केलेल्या वादविवादांत नांवलौकिक मिळविला होता. कलकत्त्यास निघण्यापूर्वीं, मुंबईइलाख्याच्या वतीनें त्यांस जी मोठी थाटाची संध्याकाळची मेजवानी झाली, तिचे यजमान सर जमशेटजी जीजीभाई नाइट यांनीं एकंदर मंडळीचें हृद्गत प्रदर्शित करतांना असे उद्गार काढिले कीं, ही मोठ्या आनंदाची गोष्ट आहे कीं, व्हाइसरायसाहेबांच्या कायदेकौंसिलांत प्रतिनिधि पाठविण्याचा या इलाख्याचा हक्क लॉर्ड रिपनसाहेबांनीं अखेरला मान्य करून असें उदाहरण घालून दिलें कीं, त्यांत दिसून येणारी न्यायबुद्धि व दृढनिश्चय यांकडे दृष्टि दिली, तर आपणांस असा विश्वास येतो कीं, त्याच्या परंपरेंत अंतर पडणार नाहीं.

---

१. १८७४ पासून म्हणजे आपल्या वयाच्या ४१ वर्षापासून, हे नामदार नानाशंकरशेट यांनंतरचे दुसरे नामांकित मुंबईच्या कायदे–कौंसिलांतील सभासद होत.

२. ' नामदार रावसाहेब विश्वनाथ नारायण मंडलिक यांचे लेख व भाषणें ' ( इंग्रजी ) आरंभींचे रा० पाध्येकृत ' चरित्र ' पहा. ७८ सर विलियम हंटर (सुप्रसिद्ध इतिहासकार ) व ' मि० विन्फ्रिड सीवेन ब्लंट ( तत्कालीन रोजनिशीकार ) यांचें असेच मत आहे.

स्थानिक स्वराज्यांतूनच देशी स्वराज्य होणें हीच सुधारणेची दिशा असें जाणून, ' सार्वजनिक सभे ' च्या आमंत्रणावरून, पुण्यातील पेशव्यांच्या हिराबागेंत ' हिंदी राष्ट्रीय सभे ' ची मुहूर्तमेढ रोंवण्याचें बहुतेक ठरलें होतें ( १८८५ ). परंतु, तेथें त्या सुमारास महामारीचा उपद्रव झाल्यामुळें तिचें स्थलांतर होऊन, ती मुंबई येथें गोवाळी-तलावाजवळ शेट गोकुळदास तेजपाल यांच्या संस्कृत पाठशाळेच्या पटांगणांत भरली. हिंदुस्थानांतील प्रांतोप्रांतींच्या भिन्नभिन्न जातींच्या विद्वानांनीं प्रत्येक वर्षी एका ठरीव ठिकाणीं चालू राजकीय विषयांवर वादविवाद करणें हें जसें इष्ट; तसें ऐक्य व प्रेम यांकरितां एकमेकांचा पाहुणचार करण्याची एकमेकांस संधि मिळणें हेंही इष्ट असून, राजकीय शिक्षण संपादन करण्याचा हा राजमार्ग शोधून काढण्याचें श्रेय अर्वाचीन महाराष्ट्राला प्राप्त झालें. ती अपूर्व कल्पना रावबहादूर रानडे यांच्या दांडग्या मेंदूंतून निघाली.[1] यावर सभेचे प्रतिपक्षी[2] असें प्रतिपादूं लागले कीं, जर अशा सभेचे सभासद असें मनांत समजत असतील कीं, आपण

१. मद्रासकर नटेश कंपनी-प्रकाशित ' न्यायमूर्ति रानडे यांचें संक्षिप्त इंग्रजी चरित्रां ' तील नामदार गोखले यांची साक्ष ( पृ० ४० वें ) पहा.

२. यांतील प्रमुख म्हटले म्हणजे, अलीगड येथील ' मॅहामेडन-अंग्लो ओरिएंटल कॉलेज ' चे प्रिन्सिपॉल मिस्टर थिऑडोअर बेक ( यांचे ' हिंदी विषयावरील निबंध ' पृ० ६३–८७ वीं ); कलकत्त्यांतील ' रईस व रय्यत ' या वजनदार इंग्रजी पत्राचे संपादक डॉ० शंभुचंद्र मूकर्जी एम्. डी; ( मिस्टर स्काइन आय्. सी. एस् कृत ' एक हिंदी पत्रकर्ता ' पृ० ५५ वें ); व भिंग्याचे राजे ' लोकसत्ताक राज्यपद्धति हिंदुस्थानास अयोग्य ' या इंग्रजी छोटेखानी पुस्तकाचे कर्ते ) हे होत.

लोकांचे प्रतिनिधि आहोंत; सबब, सरकारास ज्या कांहीं सुधारणा करणें असेल, त्या त्यानें आपल्या विचारानें कराव्या, तर मात्र ती गोष्ट विचार करण्यासारखी आहे. या विधानाच्या समर्थनार्थ, त्यांचें असें म्हणणें पडलें कीं, ‘ राष्ट्रीय सभेचा सदर्हू मूलसिद्धांत हा एक हेत्वाभास असून, त्यामुळें ऐतिहासिक कल्पनांच्या संगतीस हरताळ लागतो. ‘ ना विष्णुः पृथिवीपतिः ’ असें अनादिकालापासून ज्यांचें बाळकडू आहे, त्यांनीं एकाएकीं त्यास फांटा देऊन, लोकसत्ताक राज्याची हाव धरणें हें गैर आहे. अल्प व सजातीय राष्ट्रांत या राज्यपद्धतीचा प्रसार होण्यास किती यातायात पडते, किती कालावधि लागतो, या गोष्टी मनांत आल्या म्हणजे त्या राज्यपद्धतीचा प्रसार पांचपट मोठ्या व विजातीय राष्ट्रांत होणें हें वाऱ्याची मोट बांधण्याप्रमाणें निष्फळ आहे. तरी इंग्लंडांत राहून, जे इंग्लंडाबाहेरचीं राज्यसूत्रें हालवीत असतात, त्यांस जागें करणें अवश्य आहे. केप कॉलनींत एका इंग्रजांस दोन बूर, बारा झुलू व आफ्रिकेंतील रानटी जाती असतांही, तेथें पार्लमेंटसभा स्थापण्यांत आली. तेव्हां, सर्वत्र असा समज झाला कीं, लोकनियुक्त सभेपासून होणारें हित मनुष्यमात्रास झालें पाहिजे. अशावेळीं, कॉन्सर्व्हेटिव्हपक्षानें आपलें मत सिद्ध करून दाखविलें पाहिजे.

हिंदुस्थानांत लोकनियुक्त संस्थेस चार अडचणी आहेत. एक, शेतकरी वर्गाचें अज्ञान; दुसरी, मुत्सद्दी व कायदेपंडित यांचा अभाव; तिसरी, पार्लमेंटास डोईजड फौज; व चौथी, विजातीयता. आतां, पहिल्या अडचणीविषयीं पाहूं गेलें, तर शेंकडा ९० हून अधिक लोक हे शेतकरी असल्यामुळें, त्यांच्यावर लोकनियुक्त संस्थेची मातबरी आहे. त्यांत तर अज्ञानांधकार माजलेला आहे.

राज्यकारभारावर आपला वचक कसा बसवावा याची शेतकरी वर्गास मुळींच कल्पना नाहीं. म्हणून सध्यांच्या स्थितींत शेतकरी वर्गावर राज्यकारभार सोंपविणें हें गैर आहे. कारण, तसें केलें, तर त्यांच्या धर्मसमजुतीप्रमाणें गोहत्त्या बंद होऊन, जमीनमहसूल हा देवालयें, धर्मशाळा इ० धर्मकृत्यांकडे खर्च होईल. व अशी अज्ञानांध व धर्मांध शासनपद्धति प्रस्तुत मनूंत शक्य व इष्ट नाहीं. तरी, दिखाऊ लोकनियुक्त संस्था ही कल्पनेच्या आटोक्याबाहेर नाहीं. स्थानिक स्वराज्यांतून निवडलेले प्रतिनिधि ठिकठिकाणच्या कायदेकौंसिलांत घ्यावेत; व ' राष्ट्रीयसभे ' ची मागणी हीच आहे. अशा व्यवस्थेंतील प्रतिनिधि हे, इंग्रजी शिक्षण ज्यांस मिळालें आहे, त्या नियमित वर्गाचे प्रतिनिधि असून, त्यांची स्थिति त्रिशंकूप्रमाणें आहे. त्यांची सत्ता राष्ट्रीयशक्ति जी काळी फौज तीवर नाहीं व शेतकऱ्यांच्या अंगांतील वीरश्रीवरही त्यांचा काबू नाहीं. दुसरें असें कीं, कोणत्याही अँग्लो-इंडियन किंवा सुशिक्षित एतद्देशीयाच्या हातांत राजसत्ता आली, तर मनुष्यस्वभावानुसार, ती ती जात स्वार्थसाधु होईल. तींत सध्यांच्या अधिकारिशासनपद्धतींतील निःपक्षपातीपणा राहणार नाहीं. ' अँग्लो-इंडियन डिफेन्स असोसिएशन ' ही संस्था अँग्लो-इंडियनांस विशेष हक्क मागण्याकरितां एका पायावर तयार आहे; व एतद्देशीय वर्तमानपत्रें हीं एतद्देशीयांचा चंचुप्रवेश राज्यकारभारांत व्हावा, म्हणून राज्यकर्त्यांस सदा विनवीत आहे. त्यांचें म्हणणें असें कीं, सर्व सिव्हिल जागा परीक्षेवर म्हणजे गुणावर देण्यांत याव्यात. आतां, ज्यांची सरकारावर एवढी काकदृष्टि असते, त्यांच्या हातांत सत्ता आल्यास, ते केवढी कृतज्ञता प्रकट करणार हें उघड आहे.

बरें, इतकें करून जर सुशिक्षित एतद्देशीयांच्या हातांत सत्ता दिली, तर ती चालविण्यास लागणारें शहाणपण तरी त्यांच्या अंगांत आहे किंवा नाहीं, हें पण पाहिलें पाहिजे. दुसरी अडचण ती हीच. ज्या एंजिनीयरास गंगेवर पूल बांधावयाचा आहे, ज्या बॅरिस्टरास भानगडीचा मुकद्दमा जिंकावयाचा आहे, ज्या डॉक्टरास सन्निपात बरा करावयाचा आहे, त्या एंजिनीयरास, त्या बॅरिस्टरास, त्या डॉक्टरास आपल्या धंद्यांत निष्णात व्हावें लागतें. तद्वत्, ज्या मुत्सद्द्यास राज्यशकट सुरळीत चालवावयाचा असेल, त्यास राजनीतींत मर्मज्ञ झालें पाहिजे. इंग्लंडप्रमाणें हिंदुस्थानांत सुशिक्षित राजकार्यदक्ष अशीं सरदारघराणीं, व खाऊनपिऊन सुखी कुटुंबें नाहींत. येथले उत्कृष्ट विद्वान् एक तर सरकारी नोकरींत, नाहींतर वकिलींत पडलेले आहेत. सरकारानें परकीय राष्ट्राशीं कसें वागावें; जमीनमहसुलाचे कायदे कसे असावेत; नाण्यांचे व्यवहार कसे चालावेत; जमाखर्चाचे ताळे कसे बसवावेत; इत्यादि गहन प्रश्न सोडविण्यांत ज्यांचे केंस काळ्याचे पांढरे झाले आहेत, तेच पार्लमेंटचे सभासद होण्यास योग्य होत. नुसत्या कायदेकौंसिलाकरितां चार सभासद मिळण्याची पंचाईत, तर पार्लमेंटची गोष्ट काढावयासच नको. परंतु, दोन पिढ्या उलटल्या, कीं ही स्थिति सुधारेल. उद्योगधंदे व व्यापार यांची बरकत होऊन, सुशिक्षित श्रीमंत व वजनदार मध्यमस्थितींतील लोक पुढें सरसावतील. तेव्हां मात्र, त्यांस राज्यकारभारांत सवडीसवडीनें घेण्यास हरकत नाहीं.

म्हणजे, हिंदुस्थानांत पार्लमेंटसभा स्थापन झाली, तर, आतां तिसरी अडचण ही कीं, या पार्लमेंटच्या हातांत जिचा वर्षाचा रु० २०,००,००,००० चा खर्च आहे अशी फौज ( विशेषतः

गोरी फौज ) व परंपरेनें अंतर्व्यवस्था व परराष्ट्रसंबंध या बाबी देण्याची गोष्ट इंग्लंडसारख्या पराक्रमी व स्वाभिमानी राष्ट्रास रुचणार नाहीं. त्याच्यानें आयदोजी बनून राहवणार नाहीं. इंग्रज-सरकारची सत्ता फौजेवर कायम ठेविली, तरी असाच पेंच पडणार कीं, ५०० निःशस्त्र सिव्हिलियनांनीं १,००,००० सैन्य आवरावें कसें ? इंग्लंडमध्यें लोकांस आपल्या इतिहासप्रसिद्ध संस्थांबद्दल एवढा अभिमान वाटतो कीं, त्यांच्या केंसास धक्का लागण्याची खोटी, कीं तडकदिशीं सर्व राष्ट्र ' रणं देहि ' ' रणं देहि ' असा आक्रांत करीत, खडबडत लढण्यास तयार होतें. पहिल्या चार्ल्स राजानें पार्लमेंटकडे वांकडी नजर करितांच, राजा-प्रजा यांत यादवी माजली. मालकाचा हुकूम तोडण्यापेक्षां पार्लमेंटचें मत झिडकारणें हें अधिक भयंकर आहे, अशी भावना काळ्या फौजेंत उत्पन्न होण्याइतका शिक्षणप्रसार काळ्या फौजेंत होईल, तेव्हां ( म्हणजे एक शतकानें ) येथील पार्लमेंट सार्थ झाली तर होईल. तूर्त, जशी सुशिक्षित वर्गास सिव्हिल सर्व्हिस मोकळी ठेविलेली आहे, तशी ज्यांच्या बाहुबलावर व हिम्मतबहादुरीवर भरभराटलेले वकील व चुरचुरीत लेख लिहिणारे पत्रकर्ते नादत आहेत, त्या काळ्या फौजेची कदर-झाली पाहिजे. फार झालें, तर आपण पदकांनीं तिची संभावना करितों; परंतु, रशियन सरकार तर तिला अधिकार देतें. तर, आपणही सँडहर्स्ट येथें कुलीन राजघराण्यांतील होतकरू तरुण तयार करून, त्यांस फौजेंत अधिकारी नेमिलें पाहिजे.

शेवटली अडचड विजातीयतेची उरली. जेथें दोन राष्ट्रें असून, त्यांपैकीं एकाची संख्या दुसऱ्याहून अधिक असल्यामुळें, ' बळी, तो कान पिळी ' असा अनिष्ट प्रकार होण्याचा संभव आहे; तेथें

पार्लमेंट सभेसारखी संस्था चालणार नाहीं. युरोपखंडांत अनेक राष्ट्रें एकमेकांच्या गळ्याचा घोट घेण्यास सज्ज आहेत. त्यांकरितां एक पार्लमेंट होणें हें जसें शक्य नाहीं, तसें हिंदु-मुलसमान हे गेल्या सहा शतकांपासून आजपर्यंत एकमेकांचा घूर पीत असल्यामुळें, त्या दोघांकरितां एक पार्लमेंट होणें हें संभवनीय नाहीं.

सारांश, राष्ट्रीयसभेची लोकनियुक्त पद्धति ही केवळ नामधारी आहे; ती खरी म्हटली म्हणजे जातिशासनपद्धति आहे; ती स्थायिक व निःपक्षपाती नाहीं; ती चालविणारे नालायक आहेत; तिला सैन्य ताब्यांत ठेवितां येणार नाहीं; तिला भिन्न राष्ट्रांचें एकी-करण करितां येणार नाहीं. या वादांत, सत्यनिर्णय कसा होत गेला आहे, तें योग्य स्थळीं येईल.

---

# प्रकरण ९ वें.

## क्रॉफर्ड-प्रकरण ( १८८८–८९ ).

सौ० आनंदीबाई जोशी यांस फिलॅडेल्फिया ( अमेरिका ) येथें एम्. डी. पदवीचा लाभ ( १८८६ ); तुकोजीराव होळकर व जयाजीराव शिंदे या वजनदार संस्थानिकांचा मृत्यु ( १८८६ );

महाराणी सरकारांची ज्युबिली[1] ( १८८७ ); डॉ० आनंदीबाई जोशी एम्-डी. यांचा अकालीं मृत्यु ( १८८७ ); दादाजी भिकाजी या पतीवरील, रखमाबाईचा निरर्थक सुधारक तत्त्वाचा काडी मोडून मागण्याचा मुकदमा ( १८८७ ); यशवंतराव महाराजांचा वैकुंठवास ( १८८७ ); अशा परोपरीच्या सुखदुःखाच्या गोष्टींवरून अर्वाचीन महाराष्ट्राचा नूर कम-जास्त प्रमाणानें इतिहास-

---

१. याच मंगलप्रसंगानें इंग्रज लोकांची पूर्ण ओळख पटविणारा रा० सा० रावजी भवानराव पावगी बी. ए. ( भगवानदास संस्कृत प्राइझमन ) कृत ' विलायतचा प्रवास ' हा ग्रंथ बाहेर पडला. तद्वत्, याच प्रसंगाचें चिरस्थायी स्मारक म्हणून सर्व हिंदुस्थानांत अपूर्व अशी औद्योगिक शिक्षण देणारी ' व्हिक्टोरिया ज्युबिली टेक्निकल इन्स्टिटयूट ' ही मुंबई येथें निघाली. ही कल्पना मुंबई येथील वजनदार मंडळीच्या मनांत अशी आली कीं, लॉर्ड रिपन या लोकप्रिय व्हाइसरॉयसाहेबांचें स्मारक हें मुंबई शहरांस शोभून, लोकोपयोगी असावें या हेतूनें रु० १,५०,००० वर्गणी व्यवस्थापक मंडळीचे हातीं पडतांच, स्थानिक सरकाराशीं तिने पत्रव्यवहार सुरू करून, प्रस्तुत शुभ संधी साधून, सदहू संस्थेच्या स्थापनार्थ गोळा होणाऱ्या रकमेंत वरील वर्गणी घालून,—मुंबईच्या म्युनिसिपल कॉरपोरेशनें रु० ८०,००० व लॉर्ड रे ( गव्हर्नर साहेब ) यांनीं सालीना सरकारी देणगी रु० २५,०००, रु० ४५००० किरकोळ देणग्या, व वरील रु० १,५०,००० वर्गणी मिळून, एकंदर रु० ३,००,००० आंकडा व सर दिनशा एदलजी वाच्छा यांची रु० ३,००,००० ची इमारत असें करून, प्रस्तुत स्मारक निर्माण झालें.

२. एकतर्फी स्त्रीशिक्षणाचा असा अनिष्ट परिणाम दाखविणारी रा० नारायण बापूजी कानिटकर ( वकील ) यांची ' तरुणीशिक्षणनाटिका ' मराठी रंगभूमीवर आली.

भक्तांच्या निदर्शनास येत असतां, सरकारच्या घरांतील एक पिलूं बाहेर पडलें. क्रॉफर्ड-प्रकरण उपस्थित झालें.

दक्षिणभागचे कमिशनर मिस्टर आर्थर क्रॉफर्ड आय्. सी. एस्. यांची मध्यभागच्या कमिशनरच्या जागेवर बदली झाल्यापासून सारखीं दोन वर्षें, ओमॅनी[1] हे धारवाड व कॅनरा जिल्ह्यांचे ( प्रथम पहिल्या वर्गाचे असिस्टंट व नंतर ॲक्टिंग ) कलेक्टर असतां, त्यांच्या नजरेस असें आलें कीं, प्रत्येक खात्यांतील खालच्या अंमलदारांत अनीतीचा प्रसार झालेला असून, तिची उत्पत्ति माजी कमिशनरसाहेब ( क्रॉफर्ड ) यांच्या घरांत झाली असावी. म्हणून, १८८८ च्या जूनच्या सुरवातीस, इन्स्पेक्टर-जनरल ऑफ् पोलिस या नात्यानें पुण्यास बदलून आल्यावर, निरनिराळ्या व्यक्तींकडून साहेबमजकुरांवर आलेल्या भयंकर आरोपांचें त्यांस कांहीं वाटलें नाहीं.

ता० २४ जूनला, नामदार मिस्टर नेलर यांजकडून त्यांस एक अर्धवट सरकारी लखोटा आला. त्यांत रावबहादूर भीमभाई कृपाराम या हुजूर डेप्युटींचीं २ पत्रें; रावबहादूर काशिनाथ बळवंत पेंडसे एम्. ए. ( भगवानदास संस्कृत स्कॉलर ) क्रॉफर्डसाहेबांचे हेड असिस्टंट, यांची चीफ सेक्रेटरींशीं झालेल्या भेटीचीं टिपणें; व भडगांव येथील ‘ नमुन्याच्या शेता ’ च्या कांहीं भागांचीं खिमजी जिवा यानें जी विक्री केली, तीसंबंधी क्रॉफर्डसाहेबांनीं केलेल्या कामाचे कागद होते. त्यांतील क्रॉफर्डसाहेबांवरील आरोपाची चौकशी करून, त्या कागदांचें मनन करून, पुढें काय करावयाचें तें सर-

---

१. यांनीं व यांच्या हाताखालील वेन्स यांनीं मिळून ‘ गुप्त टिपणें ’ पुस्तकरूपानें प्रसिद्ध केलीं आहेत.

कारास कळविण्याविषयीं लिहिलेलें होतें. त्याकरितां ओमॅनीसाहेबांनीं, दुसऱ्या दिवशीं सरकारच्या कौन्सिलरांची भेट नामदार मिस्टर रिचले यांच्या बंगल्यावर घेतली. तींत असें ठरलें कीं, ओमॅनीसाहेबांनीं प्रस्तुत प्रकरणाचा तपास करावा. ता० २८ जूनला, त्यांस तसा शिरस्त्याचा लेखी हुकूम सुटला. त्यांतील शेवटल्या खंडांत असें होतें कीं, जे इसम सदर्हू गुन्ह्यासंबंधीं खरी व पुरी माहिती सरकारास देतील, त्यांस शिक्षा होणार नाहीं. यास ' ओमॅनीसाहेबांची गॅरंटी ' असें म्हणत.

ओमॅनीसाहेबांनीं रावबहादूर पेंडसे यांस पुरावा गोळा करण्याच्या कामांत मदत करण्यास सांगितलें, तेव्हां त्यांची स्थिति मोठी नाजूक होती. क्रॉफर्डसाहेबांनीं त्यांस कधींही दुखविलें नसून, त्यांस आदरबुद्धीनें व ममतेनें वागविलें होतें. तेव्हां क्रॉफर्डसाहेबांविरुद्ध पुरावा गोळा करणें म्हणजे ' खाल्लया घरचे वांसे मोजण्या ' सारखा समय आला होता. त्यांच्या मनांतून क्रॉफर्डसाहेबांचें उट्टें काढावयाचें नव्हतें; त्यांची द्रव्यदृष्टिही नव्हती; व प्रस्तुत प्रकरणांतील पात्रांचा होणारा छळ त्यांच्या लक्ष्यांत येण्याइतके ते अदूरदृष्टि नव्हते. अतएव, ओमॅनीसाहेबांचा उजवा हात होण्यांत, त्यांच्या मनांत कोणतेंही काळेंबेरें नव्हतें. आपल्या कचेरींतील हाताखालच्या मंडळीवर व कमिशनरसाहेबांच्या हुकुमतींतील अधिकारी वर्गावर त्यांचें स्वताचें जें वजन होतें, तें त्यांच्या असिधाराव्रतामुळेंच होतें. त्याच त्यांच्या असिधाराव्रतामुळें, आपल्या आसपास व कमिशनरसाहेबांच्या हपिसांत जो अनीतीचा प्रकार जारीनें चालू होता, त्याचा त्यांस गंधही नव्हता. लांच खाल्लेल्या ठरावांत कायद्याच्या दृष्टीनें चूक होऊं नये व योग्य पक्षाकडूनच

तो खातां यावा, म्हणून क्रॉफर्डसाहेब वारंवार त्यांची सल्लामसलत घेत असत. तरी, बोभाटा केल्याशिवाय, किंवा क्रॉफर्डसाहेबांसारख्या अनुभवलेल्या अधिकाऱ्यांशीं द्वैतभाव उत्पन्न केल्याशिवाय, पेंडसे-मजकुरांनीं आपलें काम चालू ठेविलें. त्यांनीं आपल्या वर्गीयांत असाधारण असें उत्तम प्रकारचें धैर्य प्रकट केलें. त्यांनीं आपलें कर्तव्य शांत मनानें केलें. त्यांचें जें एवढें वजन होतें, व त्यांस या तपासांत जें एवढें यश आलें; त्यांत पेंडसे त्यांची इभ्रत, त्यांची दानत, त्यांची करामत हींच कामास आलीं.

प्रस्तुत प्रकरणांतील सूतउवाच करण्यांत, रावबहादूर भीमभाई कृपाराम यांचाही हेतु अयोग्य नव्हता. क्रॉफर्डसाहेबांनीं मूर मॅकेंझी-साहेबांस लिहितांना, त्यांना नाहक बदनाम करण्याचा जो यत्न केला होता, त्याचा त्यांस वाजवी राग आला होता. ज्यांच्या अनीतीची अपकीर्ति एतद्देशीय लोकांत सर्वतोमुखी झाली होती, त्यांनीं प्रतिष्ठा मिळविण्याकरितां अशी कुचेष्टा केलेली पाहून, भीमभाईच्या तर अंगाचा तिळपापड झाला होता. परंतु, ते जरी असे चिडलेले होते, तरी चौकशी चोख व्हावी अशी त्यांचीही मनापासून इच्छा होती. व पेंडसे याप्रमाणें भीमभाईचें वर्तन हें, अथपासून इतीपर्यंत अत्यंत धिम्मेपणाचें व नेमस्तपणाचें होतें. जी जी बाब त्यांकडे सोंपविली होती, तिचा छडा त्यांनीं काळजीपूर्वक, मोठ्या चतुराईनें व अगदीं धारवाडी कांट्यानें लाविला होता; पुण्यास त्यांच्या गुजराथचें चिटपांखरूं नव्हतें; ते एकांतप्रिय होते; व प्रस्तुत प्रकरणांतील साक्षिदारांशीं परिचय असल्यामुळें, जी एक मौज उडाली होती, तिला ते अंतरलेले होते. तरी, त्यांची कार्यक्षमता, त्यांची

बुद्धिमत्ता, त्यांची लोकप्रियता या गुणांचा प्रस्तुत महाकार्यांत चांगला उपयोग झाला.

रावबहादूर पेंडसे यांच्या शिफारसीवरून, रावबहादूर हरी नारायण ( माजी पोलिस-इन्स्पेक्टर ) यांस डिटेक्टिव्ह कामावर नेमण्यांत आलें. त्यांना धास्ती वाटूं नये, म्हणून त्यांच्या परिचयांतील पोलिस-सुपरिंटेंडंटमार्फत त्यांस धारेस आमंत्रण गेलें. तेथून ते न्यायखात्यांतील आपल्या हुद्द्याच्या जागेवरून, रजा घेऊन, पुण्यास आले. ब्रिटिश सरकारचे पेन्शनर म्हणून या सध्यांच्या संस्थानांतील अधिकाऱ्यांस ओमॅनीसाहेबांनीं गळ घातली असून, त्यांनीं आपल्या मूळ यजमानाची सेवा पत्करण्यांत यत्किंचित्‌ही गय केली नाहीं. जरी रावबहादूर हरि नारायण यांचे आप्तसंबंधी पुण्यांत होते, तरी ब्राह्मणसमाजाशीं त्यांचें सख्य नव्हतें. राज्यव्यवस्थेकरितां त्यांनीं राजनिष्ठेनें पुण्यांतील दरोड्याच्या कामांत मेहनत केली होती. त्यांनीं वासुदेव बळवंत फडके या बंडखोरास धरण्यांत साहाय्य केलें होतें. त्यांचें निस्पृह वर्तन, त्यांचें चित्रगुप्तकौशल्य, त्यांची स्थानिक चळवळींपासून अलिप्तता: हे गुण ओमॅनीसाहेबांच्या अंगीकृत कार्यास पुष्कळ फलप्रद झाले.

ता० १ जुलैला, रावबहादूर पेंडसे यांनीं कांहीं मामलेदारांना साक्षीदार म्हणून पुण्यास बोलावण्याचा हुकूम झाला असतां, रावबहादूर हरि नारायण यांनीं दारूबाजीमुळें चाकरीवरून निघून क्रॉफर्डसाहेबांची मूठ दाबून, पुन्हा रुजू झालेल्या दुलेखानामार्फत काजी आबास यांकडे भोंक पाडण्यास सुरवात केली. काजी आबासद्वारें, पोलिस-इन्स्पेक्टरच्या जागेकरितां, सरोत्तमसिंग यांनीं पुण्याच्या पोलिस-सुपरिंटेंडंट यांच्या शेऱ्यानिशीं अर्ज केला होता.

त्यासोबतचें काजी आबासनें हणमंतरावांस लिहिलेलें पत्र पकड-ण्यांत आलें.

रावबहादूर हरि नारायण यांनीं शेंदुरणीकर जहागीरदार दीक्षितांचे बंधु आण्णासाहेब कायगांवकर यांकडेही असेंच संधान लाविलें. रावबहादूर पेंडसे यांच्या अगदीं उलट स्वभावाचे रा० बाळाजी गंगाधर साठे हे, क्रॉफर्डसाहेबांचे मुख्य हस्तक जे वयोवृद्ध, एका पायानें पंगु, व स्वभावानें तापट असे स्पायर्स, त्यांच्या बगलेंत शिरले होते. त्यांनीं अशी माहिती दिली कीं, आपण ता० ८ ला रात्रीं दहा वाजतां, स्पायर्स् यांना भेटण्याकरितां त्यांच्या बंगल्या-वर गेलों होतों; हणमंतरावांच्या मत्सरामुळें आपलें क्रॉफर्ड साहेबांशीं जें वितुष्ट पडलें होतें, त्याचा शेवट झाला; दुसरे दिवशीं सकाळीं, आपण रु० १५००० च्या कर्जापैकीं रु० ३०००। ४००० चा हप्ता ठरवून घेण्याकरितां, भाऊ मनसाराम यांस क्रॉफर्डसाहेबांच्या बंगल्यावर घेऊन गेलों होतों.

ता० १६ जुलैला, पुण्याच्या डिस्ट्रिक्ट मॅजिस्ट्रेटसाहेबांसमोर हणमंतराव या ३६ वर्षांचा, श्यामवर्ण, सुस्वरूप, बुद्धिमान्, आंग्लभाषानिष्णात, कन्नददेशस्थ ब्राह्मण-क्रॉफर्डसाहेबांचे दुसरे मुख्य हस्तक, यांवरील लांचाच्या आरोपाची चौकशी सुरू झाली. याच दिवशीं, क्रॉफर्डसाहेबांना सस्पेंड करण्यांत येऊन, त्यांचें हपीस पोलिसांच्या ताब्यांत देण्यांत आलें. तसेंच, कॉफर्डसाहे-बांच्या आश्रित मंडळा-( हणमंतराव, काजी आबास व रावसाहेब नरहर दाजी कलवडे यां-) चीं पत्रें अडकविण्याचा पोस्ट मास्तरांस हुकूम झाला. व कलवडे, बापट, कुमठेकर हे मामलेदार, व पट-वर्धन हे क्रॉफर्डसाहेबांचे हेड क्लार्क, यांना सस्पेंड करून, पुण्यास

बोलावण्यांत आलें. आणखी, क्रॉफर्डसाहेबांच्या खडकी येथील बंगल्याची नाकेबंदी करण्यांत आली. विशेषतः, पुण्याकडील वाटे-वर टेहळणी ठेवण्यांत आली.

दुसऱ्या दिवशीं, क्रॉफर्डसाहेबांनीं यःपलायन केलें. त्यांनीं उपवास केला असून, आपले बरेच कागदपत्र कमिशनरच्या हपि-सांत पाठवून दिले होते. त्यांनीं एक लांबलचक उत्तरपक्ष लिहून, त्यांत त्यांनीं सर्व दोष साठे यांच्या माथीं मारिला होता; सदर्हू कटाचें आविष्करण करीपर्यंत स्वस्थ न बसण्याविषयीं, त्यांनीं आपल्या भाऊबंदांस विनविलें होतें; व आपल्या बायकामुलांचा निरोप घेतला होता. यावरून, प्रस्तुतसारख्या अंगावर येऊन ठेपलेल्या प्रसंगीं, अत्यंत महत्त्वाची पुराव्याची गोष्ट म्हटली म्हणजे 'यः पलायते स जीवति' ही उपजत बुद्धि त्यांस सुचून, त्यांनीं आपल्या पलायनाची काळजीपूर्वक तयारी केली होती. आपल्या भावाची भेट होऊं नये, म्हणून त्यांनीं ठरविलेल्या वेळेअगोदरच गृहत्याग केला होता.

मिस्टर प्रॉपर्ट व कर्नल बॅबिंग्टन यांनीं मध्यरात्रीं असा रिपोर्ट केला कीं, मिस्टर लेस्ली क्रॉफर्ड हे खडकीस आले, तेव्हां त्यांस असें आढळून आलें कीं, त्यांचे बंधु घरांत नसून, ठेबलावर एक चिठोरें सांपडलें; त्यांत त्यांनीं असें दर्शविलें होतें कीं, आपण नदींत उडी टाकून आत्महत्त्या करणार. पहाटे ५ च्या गाडीनें, रेल्वे पोलिस-इन्स्पेक्टर जेफ्रिस यांना मुंबईस जाण्याचा हुकूम झाला. त्यांत त्यांना असेंही सांगण्यांत आलें होतें कीं, वाटेंतील

---

८० त्यांचा हेतु मुंबईहून जलमार्गानें निघून जावयाचा होता ('मुंबई सरकारच्या राज्यकारभाराचा वृत्तांत' १८८८–८९ भा० १ ला, पृ० ३ रें पहा).

प्रत्येक स्टेशनावर क्रॉफर्डसाहेबांवर पाळत ठेवावी. जर क्रॉफर्ड-साहेब गाडींत असतील, तर इन्स्पेक्टरसाहेबांनीं त्यांवर नजर ठेवावी, पण त्यांच्या वाटेस जाऊं नये; मात्र, त्यांनीं तशी खबर ओमॅनीसाहेबांस ताबडतोब तारेनें कळवावी. त्याप्रमाणें, इन्स्पेक्टर जेफ्रिस यांनीं अशी चिठ्ठी पाठविली कीं, क्रॉफर्डसाहेब हे वेषांतर करून, पुण्याहून ठाण्यास तिसऱ्या वर्गांतून निघालेले आहेत; व रेल्वे पोलिस अधिकाऱ्यांस त्यांवर देखरेख ठेवण्याचा इशारा केलेला आहे. नंतर, मुंबई येथें क्रॉफर्डसाहेबांस चतुर्भुज करण्यांत येऊन, कर्नल पोर्टमन यांबरोबर पुण्यास रवाना करण्यांत आलें. तेथें त्यांचे कांहीं पारशी स्नेही त्यांबद्दल जामीन राहिल्यामुळें, साहेबमजकुरांस खुलें करण्यांत आलें.

अहमदनगरचे पोलिस-सुपरिंटेंडंट यांस सदर्हू तपासाचे कामांत मदत करण्यास नेमिल्याप्रमाणें, ते पुण्यास हजर झाले. परंतु, आजारीपणाच्या सबबीवर त्यांनीं त्यांतून आपलें अंग काढून घेतलें. म्हणून, त्यांच्या जागीं, रत्नागिरीचे केनेडी साहेबांस पुष्टि-कारक पुरावा गोळा करण्याकरितां नेमण्यांत आलें. नाशिकचे ल्यूकससाहेबांकडे सतत वाढत जाणाऱ्या दप्तराचें काम सोंपविण्यांत आलें. कारण, विश्वासास पात्र असा कारकून मिळेना. भीमभाई-कडे ओमॅनीसाहेबांस मदत करण्याचें काम सांगण्यांत आलें.

यादवराव साठे यांची जबानी इतकी तंतोतंत उतरली कीं, त्यांस चौकशीच्या कामांत कारकून नेमण्यात आलें. मध्यभागांतील वत-नाच्या कामाकडील क्रॉफर्डसाहेबांचे मुख्य हस्तक, काजी आबास यांच्या दृष्टीनें दोन गोष्टी ठळक होत्या. एक अशी कीं, क्रॉफर्ड-साहेबांच्या हवालीं लांचाचे पैसे करण्यांत आपलें अंग मुळींच

नव्हतें; असें सतत म्हणावयाचें व दुसरी ही कीं, ज्या स्पायर्स-साहेबांनीं लहानपणापासून आपलें उघड उघड पालनपोषण करून, पुण्याच्या काजीच्या जागेवरील आपला हक्क स्थापित करण्यांत विशेष कामगिरी बजाविली होती, तीविरुद्ध कोणतेंही अवाक्षर काढावयाचें नाहीं. काजी आबासप्रमाणें, अहमदनगरचे खजिनदार व रावसाहेब कलवडे यांचे स्नेही, रा. देशमुख, यांनीं ही गोष्ट अंगिकारिली कीं, आपण रावसाहेब कलवडे यांच्या सोलापुरी पथकांतील रावसाहेब बिंदु गोपाळ भट, गणेश बल्लाळ मुळेकर व बाळकृष्ण नरहर दाणी या मामलेदारांपासून क्रॉफर्डसाहेबांच्या वतीनें जुलमानें लांच वसूल करणारा फक्त हस्तक होतों. रावसाहेब कलवडे यांच्या वजनामुळें, त्यांच्या पथकानें गुन्हा कबूल केला नाहीं. हणमंतरावांनीं रा. देशमुखाच्या जबानीचें पुष्टीकरण केलें. नगरकर व दर आलेल्या काजी अब्बास यांचे हस्तक दुलेखान यांस, आपल्या जिल्ह्यांतील लांच देणाऱ्या वतनदारांस आपल्या तक्रारी घेऊन पुढें येण्यास सांगण्याकरितां तिकडे पाठविलें होतें. बऱ्याच पोलिसांहून कमी लांच खाणारे व सद्वर्तनाचे रा. संगप्पा यांस तशाच कामगिरीवर सातारा जिल्ह्यांत पाठविलें होतें.

ता० २६ जुलैला, सरकारी सॉलिसिटर लिटल्साहेब यांची नेमणूक झाली. ता० ३१ जुलैला, हणमंतरावांनीं क्रॉफर्ड साहेबांचे वकील, रा. गंगाराम भाऊ म्हस्के यांस पत्रद्वारें असें कळविलें कीं, त्या कामदाराच्या गैरकायदेशीर वर्तनांत आपलें अंग मुळींच नव्हतें. यानंतर, हणमंतराव व क्रॉफर्डसाहेब यांवरील प्रकरणाचा आढावा काढून, सरकारी ॲड्व्होकेट-जनरल मिस्टर जार्डिन यांकडे रवाना करण्याचा सरकारी सॉलिसिटरास हुकूम

झाला. ता० ७ ऑगस्टला, अॅड्व्होकेटजनरल यांनीं सरकारास असा सल्ला दिला कीं, १८५० च्या ३७ व्या कायद्याअन्वयें, क्रॉफर्डसाहेबांचा इन्साफ कमिशनमार्फत व्हावा. ता० १० ऑगस्टला, सरकारानें मध्यभाग व दक्षिण भाग येथील कमिशनरांना निकडीचे असे हुकूम सोडिले कीं, क्रॉफर्डसाहेबांच्या इन्साफाची यथास्थित पूर्तता व्हावी, म्हणून क्रॉफर्डसाहेबांनीं गुणी इसमांच्या हक्कांची पायमल्ली करून, नोकरीवरून दूर झालेल्यांच्या ज्या ज्या नेमणुका आजपर्यंत केल्या असतील, त्यांविषयीं देखत-हुकूम रिपोर्ट करावेत. ता० १३ ऑगस्टला, कौंसिलर्स व चीफ सेक्रेटरी यांनीं ओमॅनीसाहेबांची गांठ घेऊन, त्यांस ' पुणें-वैभव ' कर्ते रा० केळकर यांशीं पत्रव्यवहार करून, ' दुबळ्या रयतेचा खडतर काळ ' या आपल्या ता० ५ जुलै १८८३ च्या अंकांतील अग्रलेखद्वयांतील क्रॉफर्डसाहेबांवरील लांचाच्या उघड उघड आरोपांची माहिती आपणांस कोणांकडून मिळाली तें पाहण्याचा हुकूम झाला. तसेंच, नेटिव्हप्रेसवरील रिपोर्टरांस असा हुकूम झाला कीं, अशा तऱ्हेच्या लेखांचा शोध आपल्या दप्तरांत करावा. सरकारी अधिकाऱ्यांनी आपापल्या हाताखालील प्रदेशांत कर्जबाजारी न होण्याविषयीं सरकाराचा हुकूम लिटल्साहेबांच्या हातांत देण्यांत आला. ता० १५ ऑगस्टला, रा० बाळाजी लक्ष्मण सामंत यांनीं आपल्या जामाताच्या हस्तें क्रॉफर्डसाहेबांस रु० २३,००० कर्जाऊ देतां यावे म्हणून रु० १३,००० त्यांस उसने दिले होते. याची पावती नसल्यामुळें, कोल्हापूर संस्थानांतील रीजंटची जागा स्वतास प्राप्त व्हावी म्हणून, स्पायर्समार्फत क्रॉफर्डसाहेबांस दिलेला हा लांच झाला. ज्यांना क्रॉफर्डसाहेबांच्या पैशाच्या व्यवस्थेची

इत्थंभूत हकीकत माहीत होती, ते सर्व पारशी लोक मात्र अगदीं मूग गिळून बसले होते. सर जमशेटजी जीजीभाईपासून 'डेक्कन हेरल्ड' ( पुणें ) चे संपादक व वकील मेरवानजीपर्यंत प्रत्येक पारशी गृहस्थ कॉफर्डसाहेबांच्या कृष्ण-कारस्थानावर उघडपणें किंवा पर्यायानें पांघरूण घालीत होता; फक्त, मेलचे कंत्राटदार मिस्टर नौरोजी यांनीं आपल्या खातेवह्या पाहूं देण्यांत लागेल ती सवलत दिली होती. कराचीचे एक श्रीमंत व्यापारी एदलजीशेट हे प्रकृति बरी होण्याकरितां पुण्यास आलेले असून, व्याजू रु० २००० च्या वायदेचिठ्ठीसंबंधीं त्यांची तपासणी झाली. तींत असें निष्पन्न झालें कीं, सावंतप्रकरणांत स्पायर्स यांनीं त्यांस ती विकली असून, या व्यवहाराची तारीख कळविण्याचें वचन देऊन, त्यांनीं तें पुरें केलें नाहीं. पारशी[1] पोलिस इन्स्पेक्टरच्या गचाळपणापेक्षां कांहींतरी अधिक गोम असल्यामुळें, पारशीलोकांची सहानुभूति सरकारास संपादन करितां आली नाहीं. आपणांस कॉफर्डप्रकरणांशीं कांहीं कर्तव्य नव्हतें असें स्थापित करण्याच्या यत्नांत आपली नीति इतर एतद्देशीयांहून वरचढ आहे हें दर्शविण्याचा त्यांचा आवही फुकट आहे.[2]

---

१. ओमॅनीकृत 'गुप्त टिपणें' ( पृ० ३७ वें ) पहा.

२. मिस्टर शापुर्जी सोराबजी या नामांकित इंग्रजी निबंधकाराचेंही असेंच मत आहे; 'I think we have the sense of right, but I submit with concern and regret that we are, at any rate, comparatively wanting both in valour &

( चालू. )

पुणें येथील ‘ सार्वजानिक सभे ’ चे चिटणीस व ‘ ज्ञानप्रकाश ’ या अँग्लो-मराठी साप्ताहिकाचे चालक व संपादक, रा० सिताराम हरि चिपळूणकर हेही क्रॉफर्डसाहेबांचे मोठे पाठराखी होते. हण-मंतरावांचा इन्साफ चालू असतां, सदहू पत्रकर्त्यांनीं आपल्या पत्राच्या रकान्यांतून साक्षिदारांना धमकावण्याचा प्रथम स्पष्ट प्रयत्न केला होता. त्यांच्या विधानाचा झोंक असा असे कीं, क्रॉफर्डसाहेबांच्या तऱ्हा कशाही असल्या; तरी त्यांची सरकारी कृति अशी असे कीं, लोकांना उन्नतीची आशा वाटत असे। तीमुळें खरें लोकहित होत असे; व सध्यांच्या आविष्करणानें हिंदी लोकांची अब्रू जाणार आहे.

असो. ता० २३ ऑक्टोबर १८८८ पासून ता० ११ जॅन्यु-अरी १८८९ पर्यंत, कमिशनची बैठक पुणें येथील कौंसिलहॉलांत झाली होती. तींत, नामदार आर्थर विल्सन बॅरिस्टर-अॅट-लॉ, जज्ज ( हाय कोर्ट, कलकत्ता ), नामदार जेम्स् वॅलॅस् क्विंटन्, सी. एस्. आय्. बी. सी. एस्. वायव्य प्रांतांतील रेव्हिन्यु-बोर्डचे सभासद व मिस्टर रॉबर्ट जोसेफ क्रॉस्थवेट, बॅरिस्टर-अॅट-लॉ, ज्युडीशल कमिशनर ( मध्यप्रांत ) हे न्यायाधीश होते. फिर्यादीतर्फे अॅडव्हो-केटजनरल मिस्टर जार्डिन बॅरिस्टर-अॅट-लॉ व आरोपीतर्फे मिस्टर

---

moral conrage & act upto that sense of right.-Shapurji Sorabji's Prize Essay on *The Evil Social Customs at present hrevalent but among the Parsis & the* Best *Means of Eradicafing' them* (1891) p. 41.

इन्व्हेरॅरिटी बॅरिस्टर-ॲट-लॉ हे वकील होते. आरोपी मिस्टर आर्थर ट्रॅव्हर्स क्रॉफर्ड, आय्. सी. एस्. सी. एम्. जी. यांवर ३३ आरोपि असून, त्यांपैकीं ८ संबंधीं काम चाललें नाहीं. पहिले ३२ आरोप हे आरोपीस कबूल नव्हते; परंतु ३३ वा कबूल असल्याचें त्यानें लिहून [1]दिलें:—

'सोराबजी कावसजी कॅप्टन यांपर्यंत व यांस धरून ३३ व्या आरोपासंबंधीं जे साक्षिदार झाले आहेत, त्यांजवळून आपण पैसे उसने घेतले आहेत, मला लद्धा इब्राहिमचें देणें आहे; परंतु हें कर्ज कर्जबाजारीपणापासून झालेलें नाहीं; परंतु, पुरविलेल्या मालाबद्दल असलेल्या चालू खात्याची ती बाकी आहे. गोविंद बुधरावांपासून रु० २००० मीं उसने घेतले आहेत; परंतु अथनी येथील मामलेदारकचेरींत त्याचा मुलगा त्या वेळीं कारकून होता किंवा इतर ठिकाणीं सरकारी नोकरींत होता हें मला माहीत नाहीं. यशवंतराव काशीराव यांच्या ॲडमिनिस्ट्रेटरजवळून मीं पैसे कर्जाऊ घेतले नाहींत. काशिनाथ बळवंत पेंडसे यांपासून मीं रु० ३०० कर्जादाखल घेतले नाहींत. गणेश बल्लाळ मुळेकर यांपासून पैसे कर्ज म्हणून मीं घेतले नाहींत. गणेश चिमणाजी वाड यांपासून मीं कर्ज घेतलें नाहीं. रामचंद्र कृष्ण शहाणे यांनीं १८८८ च्या जूनमध्यें गाडीभाडें भरून ओटस् ( एक प्रकारचें धान्य ) पुरविल्याची गोष्ट मला मान्य आहे. ती रक्कम मजकडे आल्याची गोष्ट मला मान्य नाहीं.

'नारायण चिंतामण सोहनी यांच्या नांवें १८८३ त खरेदी केलेलीं विजापूर येथील चिनी मातीचीं भांडी हीं सर जेम्स् फर्ग्यु-

---

1. 'क्रॉफर्ड-कमिशन' ( पृ० १ लें व २ रें ).

सन ( गव्हर्नरसाहेब ) व मजसकट त्यांच्या मंडळींतील इतर गृह-स्थांनीं विकत घेतलीं होतीं. निरनिराळ्या दुकानदारांशीं सौदा पटवून, तीं चिनी मातीचीं भांडीं पाठवून देण्याविषयीं त्या मामले-दारास सांगितलेलें होतें. प्रत्येक गिऱ्हाइकाकडून यावयाचे पैसे मागाहून वसूल करून, १८८३ त मीं मामलेदारास दिले.

यशवंतराव काशीराव यांजवळून पैसे कर्जाऊ घेतल्याचा आरोप असल्यास, मी म्हणतों कीं मीं कांहीं पैसे त्यांजवळून कर्जाऊ घेतले होते—पण मीं किती घेतले होते, ते मला सांगतां येत नाहींत. तो प्रकार असा कीं, मी बऱ्याच मंडळीसह शिकार खेळण्यास जंगलांत गेलों असतां, आम्हांला रोकडीची पंचाईत पडली. हल्याळ या अगदीं जवळच्या गांवाहून, यशवंतराव हे आम्हांस अन्नसाम-ग्रीचा पुरवठा करीत असत. सर्व मंडळीचा हिशोब ठेवून, आम्हांला लागेल ती नगद रक्कम मी त्यांकडून मागवीत असें. मंड-ळीची फाटाफूट होतांच, त्याची ती रक्कम त्यास मी परत करीत असें. हे पैसे शिकारीमंडळीकरितां कर्जाऊ घेतलेले असून, केवळ एकट्या माझ्याकरितांच नव्हते. '

सदर्हू इन्साफाच्या शेवटीं, कमिशननें आपला असा अभि-प्राय नमूद केला कीं, शेवटल्या आरोपाखेरीज इतर कोणताही आरोप सिद्ध होत नाहीं. तरी, सरकारी अधिकाऱ्यानें हवें तसें कर्ज काढणें हें सरकारी कामांत हरकत करणारें असल्यामुळें, स्टेट सेक्रेटरी यांनीं क्रॉफर्डसाहेबांस नालायक ठरवून, नोकरीवरून दूर केलें. पण, हणमंतरावाच्या पायांत शृंखळा पडल्यावर, दक्षिण व

मध्य भागाच्या कारभारांत क्रॉफर्डसाहेबांनीं कित्येक वर्षें चालवि- लेल्या आरोपांतील प्रकरणांत लांच खाल्ल्याची गोष्ट त्यांनीं कबूल केली. सरकारतर्फें साक्ष देणाऱ्या सुमारें १५ मामलेदारांना स्टेट सेक्रेटरी यांनीं हिंदुस्थानसरकाराकडून ' निर्भयत्व रद्द करणारा कायदा ' करवून, त्या अन्वयें नोकरीवरून दूर करून, नुकसानी- दाखल त्यांस ५५ वर्षांचें वय होईपर्यंत सरकारी नोकरींत असल्या- प्रमाणें पगार मिळून पुढें मरेपर्यंत पेन्शन मिळावें व बहुतेक तशाच १३ मामलेदारांना सरकारी नोकरींत ठेवावें असा हुकूम केला.

या प्रकरणावरून, पांच गोष्टी घेण्यासारख्या आहेत. एक अशी कीं, क्रॉफर्डसाहेबांच्या मित्रमंडळीनें जी सारखी चळवळ चालू ठेविली, तींत तिला यश आलें; दुसरी अशी कीं, सद्धेतुप्रेरित अशा ( लॉर्ड रे गव्हर्नरसाहेब ) मुंबईसरकारास देखील एका युरोपियन अधिकाऱ्यास शिक्षा देतां आली नाहीं. तिसरी अशी कीं, एखाद्या युरोपियनाचा अपराध जगजाहीर असला, तरी नेटिव्ह-फिर्यादीला तो स्थापित करण्यांत बहुतेक यश येत नाहीं.[२] चवथी अशी कीं, क्रॉफर्डसाहेबांच्या कारकिर्दींत जो अंधेर महाराष्ट्रांत माजला होता, त्यासारखा मामलती मक्त्यानें देण्याऱ्या शेवटल्या बाजीरावसाहे- बाच्या कारकिर्दींत माजत होता, त्याचें योग्य प्रायश्चित्त म्हणजे पदच्युति ही त्यांस भोगावी लागली; व, क्रॉफर्डसाहेबांच्या हातून घडलेल्या प्रकारच्या अनीतीबद्दल, त्यांसही पदच्युतिच भोगावी

---

१. ' मुंबईइलाख्याच्या राज्यकारभाराचा वृत्तांत ' ( १८८८–८९, भा० १ ला, पृ० ४ थें ) पहा.

२. पुणें येथील ' सार्वजनिक सभे ' चे त्रैमासिकांत येथपर्यंत असेंच तात्पर्य आलें आहे ( १८९० चा जुलै-सेप्टेंबरचे अंक पहा ).

लागली. पांचवी व शेवटली अशी कीं, पेशवाईचा अंत शेवटल्या बाजीरावसाहेबांच्या अनाचारामुळें झाला, तसा इंग्रजीचा अंत स्रॉफर्डसाहेबांच्या दुर्वर्तनामुळें झाला नाहीं. ते नालायक ठरतांच, त्यांच्या जागीं दुसऱ्या कमिशनराची नेमणूक झाली. तो तर केवळ एक अधिकारीच होता. परंतु, चवथा जॉर्ज व चवथा विलियम या राजांची अनीति जगजाहीर असतां, त्यांच्या बरोबर विलायतेंतील इंग्रजी नष्ट झाली नाहीं; एवढेंच झालें कीं, प्रजेची राजनिष्ठा तेवढ्यापुरती डळमळीत[१] झाली. राज्यक्रांति घडली नाहीं. कारण, राजाची सत्ता दिवसेंदिवस पार्लमेंटच्या सत्तेनें नियमित होत चालली होती. यावरून, राज्यरक्षणाच्या महत्कृत्यांत पार्लमेंटसारख्या लोकनियुक्त संस्थेचें महत्त्व ध्यानांत ठेवण्यासारखें आहे. त्याविषयीं पुढील प्रकरणांत येईल.

---

१. मिस्टर जस्टिन मॅक्कार्थी यांचा अभिप्राय असाच आहे:

'The truth is that the last two reigns did much to loosen the tie of allegiance, but even the general confidence in the virtue of monarchial rule.' (Mr. Justin Maccathy's *Histroy of* Our *Own Times*,p. 25 )

# प्रकरण १० वें.

## मध्यंतरींच्या कांहीं गोष्टी व पार्लमेंटमध्यें दादाभाई नौरोजी यांचा प्रवेश ( १८९२ ).

क्रॉफर्ड प्रकरणानंतरच्या अनेक अल्पस्वल्प गोष्टी आहेत. जी. आय्. पी. रेल्वेच्या उतारूंचा माल चोरण्याकरितां कांहीं गोऱ्या गार्डांनीं ' सोनेरी टोळी ' बनविलेली होती. तिचा थांगपत्ता लागून, गार्ड स्प्रिंग यांस हायकोर्टासमोर चतुर्भुज करून उभें करण्यांत आलें होतें, परंतु ज्युरीनें त्यांस निर्दोषी ठरवून, हायकोर्टानें त्यांस आरोपमुक्त केलें. त्यानंतर, फ्रामजी कावसजी इन्स्टिटयूट ( मुंबई ) मधील मिस्टर केन, एम्. पी. यांचें ' मद्यपाननिषेधा ' वर व्याख्यान झालें. त्याचा परिणाम असा झाला कीं, अबकारी कामिशनर यांनीं. ता० ८ जून १८८९ ला असें सर्क्युलर काढिलें कीं, देशी दारूवरील कर उतरविण्यांत येऊन, ठाणें व कुलाबा या जिल्ह्यांत तिचा दर कायम करण्यांत येईल. त्यामुळें, लोकांस संतोष झाला. या सालची दुसरी मोठी गोष्ट म्हटली म्हणजे रावसाहेब मंडलिक यांचा मृत्यु ही होय. त्यांची लोकप्रियता व त्यांचें राजदरबारांतील वजन हें त्यांची विद्वत्ता, वाग्मिता व नियमितता यांचें फळ होतें; त्यांच्या अंगीं सल्पिशस, व्हेरो व मॅसीनस यांचे गुण असून, त्यांची कीर्ति त्या तिघांच्या कीर्तीइतकी होती; ते भूतकाळ व वर्तमानकाळ यांतील दुवा होते असें म्हटलें तरी चालेल. अर्वाचीन महाराष्ट्रांत जो नेभळेपणा व नामर्दपणा शिरला आहे, तो त्यांस शिवलेला नव्हता.

म्हणजे ते पेशवाईचा आपला संबंध ओळखून, तेजस्विता व स्वाभिमान बाळगीत असत. डॉ. ब्लेनी ( मुंबईच्या म्युन्सिपल कॉर्पोरेशनमधील वयोवृद्ध हेल्थ ऑफिसर ) यांनीं तर त्यांविषयीं असें मत दिलें कीं, ' लोकनियुक्त संस्थे ' ( उदाहरणार्थ स्थानिकस्वराज्या ) ची प्रगति होण्याकरितां, त्यांनीं जे प्रयत्न केले होते, त्यात त्यांनीं खरोखर इंग्रज लोकांचा बाणा बाळगिला होता.[1] रत्नागिरीचे कलेक्टर डॉ० जे. पोलन आय्. सी. एम्. यांनीं देखील असेच उद्गार काढिले होते कीं, ' हिंदुस्थानांतील कोणत्याही जातीहून कनिष्ठ प्रतीची तैल-बुद्धि व कर्तृत्व त्याचें अंगीं नसून, ॲटिका ( ग्रीस ) मधील बुद्धि-मान् लोकांचे उपजत गुण त्यांच्या ठायीं होते '[2] चालू सालची तिसरी गोष्ट, मुंबई ( चर्नीरोड ) येथें, पंडिता रमाबाईहस्तें ' शारदासदना ' ची स्थापना ही होय. तिचा हेतु असा कीं, विधवांना शिक्षण देऊन, त्यांची स्थिति सुधारावी. त्याकरितां, पंडिताबाईनीं बॉस्टन येथें ' अमेरिकन रमाबाई ॲसोशिएशन ' स्थापून, त्यांच्या चिटणि-शीणपणास्तव कॅनडापासून पॅसिफिक महासागरापर्यंत प्रवास करून, निदान १० वर्षें तरी ५० विधवांना ऐहिक शिक्षण देतां येईल एवढी रक्कम गोळा करण्यासाठीं ठिकठिकाणीं वर्गणी गोळा करणारीं ठाणीं बसवून, ' उच्च जातीची हिंदू स्त्री ' या आपल्या इंग्रजी पुस्तकाच्या फायद्यांतून अमेरिकन बालोद्यानपद्धतीवर

---

१. मंडलिककृत ' लेख व भाषणें ' ( या आरंभीचें चरित्र, पृ० ३० वें ) पहा.

२. मंडलिककृत ' लेख व भाषणें ' ( या आरंभीचें चरित्र, पृ० १० वें ) पहा.

‘ शारदासदनपाठमाला ’ लिहून, राष्ट्रीय बळ खड्या फौजेंत, तोफांत किंवा तलवारींत नसून राष्ट्राच्या विद्वत्तेंत आहे असें उत्कृष्ट रीतीनें प्रतिपादन करणारें पुस्तक, ‘ संयुक्तसंस्थानाची लोकस्थिति, ’ मराठी-वाङ्मयास भूषणभूत असें प्रसिद्ध केलें.

पुढील सालची पहिली स्मरणांत ठेवण्यासारखी गोष्ट म्हटली म्हणजे फर्ग्युसन कॉलेजांतील प्रोफेसरांच्या कर्तव्याविषयीं मतभेद ही होय. प्रो० टिळक ( गणितविषयाचे अध्यापक ) यांच्या मतें, जेसूटपद्धतीप्रमाणें, ‘ डेक्कन एज्युकेशन सोसायटी ’ च्या सभासदानें अंगीकृत कार्यासच वाहून घेतलें पाहिजे; परंतु, प्रो० गोखले ( इंग्रजी व इतिहास या विषयांचे अध्यापक ) याच्या मतें, त्यानें शिक्षणेतर व्यवसायांत पडावें. एवढेंच नव्हे, खुद्द गोखले हे आपलें काम संभाळून, ‘ सार्वजनिक सभे ’ चे चिटणीस झाले. ती गोष्ट प्रो० टिळकांस न आवडून, त्यांनीं आपला तहाहयात सभासदाच्या जागेचा राजीनामा दिला. त्यांची विद्यार्थ्यांत फार चहा असे. जरी गणित हा विषय त्यांकडे नेहमीं असे, तरी ते संस्कृत व शास्त्र ( रसायन, पदार्थविज्ञान इ० ) हेही शिकवीत असत. तथापि, गणितांत, आपले डेक्कन कॉलेजांतील गुरु, प्रो० केरो लक्ष्मण छत्रे यांप्रमाणें, त्यांची उत्तम शिक्षणशैली असून, त्यांस शोधक बुद्धि व गहन विचार हीं आवडत असत.

या ( १८९० ) सालांतील रावबहादूर रानडे यांचीं पुण्यांतील औद्योगिक परिषदेचे अध्यक्ष व नागपुरांतील सामाजिक परिषदेचे अध्यक्ष या नात्यांनीं केलेलीं भाषणें प्रत्येक देशहितेच्छूनें मनन करण्यासारखीं झालीं. तसेंच, सेंट मेरीज कॉन्व्हेंट ( पुणें ) मधील सिस्टर्स यांच्या वार्षिक समारंभांतील रावबहादूर रानड्यांसारख्या

५०।७५ एतद्देशीय सभ्य गृहस्थ व स्त्रिया यांस दिलेला चहा व रावबहादूर रानडे यांकडील जातिभेद मोडून टाकणारी मेजवानी या सुधारक कृतीचा, मागील पुनर्विवाहाप्रमाणें, जुन्या मताच्या लोकांकडून उपहास होऊन, त्यांस शंकराचार्यांकडून बहिष्कृत करवून, दोन वर्षांत त्यांवर प्रायश्चित्ताचा लज्जास्पद प्रसंग आला[1]. यांत जुन्या मताच्या लोकांचे वकील सुप्रसिद्ध नाटककार रा० नारायण बापूजी कानिटकर व सुधारकांचे वकील रा० टिळक हे होते.

१८९१ सालीं, मलबारीशेट यांनीं हिंदू स्त्रियांची उन्नति करण्याचे हेतूनें, पतीचा पत्नीवर बलात्कार न होण्यास तिचे शरीरसंभोगाच्या वेळचें वय १० चें १२ वर आणण्याचें बिल हिंदुस्थान सरकारानें पास करावें म्हणून, जारीनें प्रयत्न चालू केला. त्यास विरोध करण्याकरितां, सदहू रा० कानिटकर यांनीं ‘ संमतिवयाचा कायदा ’ हें नाटक लिहून व रा० टिळक यांनीं पुण्यास जंगी सभा भरवून, जुन्या मताचा पुढाकार केला. अशा रीतीनें समाज द्विधा होऊन, जिकडे तिकडे उद्विग्नता प्रसार पावत असतां, शिंदे-होळकर या संस्थानिकांतील नाजूक हितसंबंध व त्यांवरील सार्वभौम इंग्रजसरकारची देखरेख दाखविणारें बुटी-प्रकरण उज्जनी येथें उपस्थित झालें.

इंदूर संस्थानचे चीफ जस्टिस रावबहादूर धुरंधर बॅरिस्टर-अॅट-लॉ, यांकडून ब्रिटिश रेसिडेन्सीमार्फत उज्जनींत येऊन राहिलेले रा० बळवंत वामन बुटी यांवर सुटलेलें वारंट शिरस्त्याप्रमाणें शिंदे-

१. श्रीमती रमाबाई रानडे–कृत ‘ आमच्या आयुष्यांतील कांहीं आठवणी ’ ( आ० २ री, पृ० १५६–१५७ वीं ) पहा.

सरकारच्या मॅजिस्ट्रेटच्या साहाय्यानें बजावितां येत नसल्यामुळें, तडक रेलवेलाइन म्हणजे ब्रिटिश हद्द अशी जी कायद्याची समजूत, तिप्रमाणें सदर्हू बुटी यांस कोणत्या ना कोणत्या प्रकारानें रेलवे-हद्दींत आणून, त्यांस धरून इंदुरास आणावें किंवा त्याच्या हाजिरीबद्दल रु० २००० च्या जामिनकीवर त्यांस खुलें करावें म्हणून इंदूरचे पोलिस-सुपरिंटेंडंट, असद्यारखान, यांस उज्जनीस रवाना करण्यांत आलें. त्यांनीं डाकबंगल्यांत उतरून, पोस्ट मास्तराशीं संधान बांधून, पोस्ट ऑफिसमध्यें समक्ष येऊन घेऊन जाण्यासारखें पत्र आल्याचा मजकूर त्यांकडून सर्व्हिस-कार्डावर लिहवून, तें ता० १७ मे १८९१ ला सदर्हू बुटी यांकडे पाठविलें. त्यांत कांहीं काळेंबेरें असून, आपणांस इंदुरास धरून नेण्याची तयारी चालली आहे असें समजून, बुटींनीं त्याकडे दुर्लक्ष्य केलें. पण, त्यांनीं उज्जनीच्या सुभेसाहेबांमार्फत शहर कोतवाल जोगेश्वर यांस आपणांस बचावण्याविषयीं ताकीद देवविली. इकडे, असद्यार-खानांनीं जोगेश्वर कोतवाल यांची एका विश्वासु हलवायाहस्तें रु० २००० नीं मूठ दाबून, बुटी यांजला घराबाहेर काढून, त्यांस पकडून देण्यांत साहाय्य मागितलें. तेव्हां, संध्याकाळीं क्षिप्रेवर संध्या करण्याकरितां जातां येतांना त्यांस पकडतां यावयाचें नाहीं. असें पाहून, एका परिचित शास्त्र्याकडून ता० १८ मे १८९१ ला दुपारीं कोतवालींत त्यांस बोलावून, तेथून त्यांस रेलवे-लाइन-कडे धरून, मारहाण करीत नेत असतां, ते बेशुद्ध झालेले पाहून, त्यांस लाइनीवर टाकण्यांत आलें. तेथून त्यांस त्यांच्या कनिष्ठ-बंधूनें खाटेवरून घरीं नेल्यावर, डॉक्टरी औषधोपचार होऊन, सालीना रु० ५००० कमावणारे पुत्र व १५।१६ वर्षांच्या तरु

णीचे पति–पोषाख, सोन्याची अंगठीं चांदीचें घड्याळ अशा रु० १५० च्या ऐवजासह–३१ तासांतच नष्ट झाले. या सदोष मनुष्य-वधाबद्दल असदुयारखान, जोगेश्वर, सूभासिंग व रामसहाय या प्रत्येक आरोपीस स्पेशल सेशन्स जज्ज रावबहादूर गोविंद वासुदेव टुल्लू एम्. ए, एल् एल्. बी. यांनीं १४ वर्षें सक्तमजूरी व रु० १००० दंड अशी शिक्षा ठोठावून, त्या दंडांतून रा० बुटी यांच्या दुर्दैवी विधवेच्या अन्नवस्त्राची सोय व्हावी असा ठराव केला. या धैर्याच्या, बुद्धिमत्तेच्या, धिम्मेपणाच्या, निस्पृहपणाच्या निकाला-वरून रावबहादूर टुल्लु यांनीं ग्वाल्हेरसारख्या एतद्देशीय संस्थानाची इंदूरसारख्या बरोबरीच्या एतद्देशीय संस्थानावरच नव्हे, तर इंग्रेजां-सारख्या सार्वभौम सत्तेवर आपली छाप बसाविली.

१. त्या वेळचे ग्वाल्हेरचे रोसिडेंट कर्नल बार व मध्यहिंदुस्थानांतील एजंट टु ध गव्हर्नर-जनरल यांनीं या प्रकरणासंबंधीं असा स्पष्ट उल्लेख केलेला आहे.

(i) 'It is a mark of great confidence in the justice and impartiality of the tribunal before which the accused is to be tried, in other words, it is a compliment to your personal character for uprightness and probity.'

(ii) 'To conduct the trial, the Gwalior Durbar appointed as special Judge, an officer of training & experience who appears to have taken great pains to investigate the case thoroughly'–Agent to The Governor General to the Secretary to the Govt of India (Dec. 19th, 1891)

बुटीप्रकरणांत अर्वाचीन महाराष्ट्राचें तेज असें झळकत असतां, सर्व हिंदुस्थानदेशास संतोषदायक अशी अपूर्व गोष्ट घडून आली. तीवरून, इंग्रजलोकांची जन्मसिद्ध न्यायबुद्धि प्रसिद्धीस आली. ती आपल्या इतिहासांत सुवर्णाक्षरांनीं लिहून ठेवण्यासारखी झाली. विलायतेंतील मध्यफिन्स्बरी परगण्यांतील मतदारांनीं शेट दादाभाई नौरोजी यांस आपल्या वतीनें पार्लमेंटसभेंत सभासद निवडून दिलें ( १८९२ ). या कपिलाषष्ठीच्या योगासंबंधीं त्यांनीं पार्लमेंटसभेंत जें भाषण केलें, तें सर्वमान्य होय. महाराणीसाहेबांस दिलेल्या मानपत्रावर हौस ऑफ कॉमन्समध्यें चर्चा चालू असतां, तें झालें:—

' येथें प्रवेश होतो न होतो, तोंच या सभेसमोर उभें राहणें हें मी कांहींसें साहसाचें व मूर्खपणाचें काम करीत आहें असें वाटण्याचा संभव आहे; व माझी सबब म्हणून एवढीच कीं, मला तसें करण्याची एक तऱ्हेची आवश्यकता आहे. इंग्लंडांतील एका परगण्याच्या वतीनें माझी निवडणूक झाली ही एक चमत्कारिक गोष्ट होय. ब्रिटिश राजसत्ता स्थायिक होऊन जीं पन्नास वर्षें झालीं, त्यांत प्रथमच एका इंग्लिश परगण्यातर्फे सभासद म्हणून एका हिंदी गृहस्थाचा या सभेंत प्रवेश झाला आहे. मीं म्हटल्याप्रमाणें हिंदुस्थानच्या इतिहासांत ही चमत्कारावह गोष्ट होय एवढेंच नव्हे, तर ब्रिटिश साम्राज्याच्या इतिहासांत असें छातीवर हात ठेवून मला म्हणतां येईल. या महत्त्वाच्या व अश्रुतपूर्व चमत्काराच्या स्पष्टीकरणार्थ दोन शब्द बोलण्याची माझी इच्छा आहे. या शतकाच्या सुरवातीच्या सुमारास जेव्हां ब्रिटिश लोकांनीं हिंदुस्थानच्या राज्यकारभाराचीं सूत्रें मनःपूर्वक आपल्या हातांत घेतलीं,

तेव्हां ( म्हणजे अगदीं आरंभापासून ) ब्रिटिश लोकांच्या अंगची न्यायबुद्धि व औदार्य यांवरच ब्रिटिश राज्यसत्तेचें धोरण असें ठरलें कीं, ब्रिटिश स्वातंत्र्य व न्याय या दृष्टीनें हिंदुस्थानचा राज्यकारभार चालवावा. कांहीं कांकूं केल्याशिवाय, त्या देशांत पाश्चात्त्य शिक्षण, सुधारणा व राजकीय संस्था स्थापन करावी——अनेक शतकांपासून अवनतीप्रत पावत चाललेल्या त्या देशांत नवीन उत्साह उत्पन्न करावा. त्या देशाच्या ब्रिटिश राज्यकर्त्यांनीं त्यांस अत्यंत महत्त्वाचे आपले सर्व विशेष हक्क त्यांस दिले आहेत. ज्या भाषणस्वातंत्र्याकरितां लोकांस लढाया खेळाव्या लागून, रक्तपात करावा लागला होता, त्या भाषणस्वातंत्र्यासारखे लोकांचे हक्क, महाराज, तुम्ही राजापासून कांहीं दिवसांपूर्वींच मागितलेत. तें भाषणस्वातंत्र्य तुम्हीं आम्हांस दिलें आहे; व त्यामुळें, हिंदी गृहस्थांस तुम्हांसमोर उभें राहून, आपल्या मनास वाटेल ती इच्छा स्पष्ट व उघड भाषेंत व्यक्त करितां येते. ते विशेष हक्क देऊन, तुम्ही ही शेवटली गोष्ट साधण्याची तयारी करून ठेविली आहे. ब्रिटिश साम्राज्याच्या या मोठ्या बादशाही पार्लमेंटसभेचा सभासद होऊन या सभेंत तुम्हांसमोर उभें राहून, एका हिंदी गृहस्थास मोकळ्या मनानें व निर्भयपणानें आपले विचार प्रकट करण्याची संधि प्राप्त झाली आहे. या मोठ्या गोष्टीचें महत्त्व व श्रेय हें सर्व तुम्हांकडे आहे. तीमुळें, हिंदुस्थानच्या एका टोंकापासून दुसऱ्या टोंकापर्यंत जिकडेतिकडे आनंदीआनंद झाला आहे, जिकडेतिकडे ‘ नवीन श्वास व नवीन आस ’ यांचा उदय झाला आहे. ज्या गोष्टींमुळें हा अपूर्व योग जुळून आला आहे, त्या म्हटल्या म्हणजे ब्रिटिश लोकांच्या संस्थांतील जोम व त्यांच्या

अंगीं वास करणारें न्यायप्रेम व स्वातंत्र्य या होत; व हिंदुस्थानच्या वतीनें, ब्रिटिश लोकांचे आभार मानण्याकरितां, मी येथें उभा आहें। त्यांनीं असा योग जुळवून आणिला आहे कीं, एखाद्या हिंदी गृहस्थास हें पद प्राप्त होऊन, हिंदुस्थानांतील लोकांस होत असलेल्या त्रासाचें गाऱ्हाणें इंग्रजी भाषेंत स्पष्टपणें बोलून दाखवून, त्यानें आपल्या मनांत अशी गांठ बांधावी कीं, जरी आपण येथें एकटे आहोंत, जरी आपणास एकच मत देतां येतें, तरी जेव्हां जेव्हां म्हणून आपण एखादी उन्नतिकारक सूचना योग्य व सबळ कारणें देऊन पुढें आणूं, तेव्हां तेव्हां या सभेंतील दोन्ही पक्षांतील पुष्कळसे सभासद आपणास पाठबळ देऊन, आपण मागितलेली दाद देण्यास तयार आहेत असें त्यास दिसून येईल. हिंदुस्थानांतील दरोबस्त विचारी व सुशिक्षित वर्गाची हीच समजूत आहे. त्याच समजुतीमुळें, एखादें गाऱ्हाणें दूर करण्याकरितां, आपणांस एकसारखें काम करीत रहावें असें वाटतें. या सभेसमोरील चर्चाविषयक प्रश्न हा वेळोवेळीं मूर्तिमंत प्रकट होईल, तेव्हां मध्यफिन्स्बरी या इंग्रजी परगण्याचा प्रतिनिधि म्हणून त्यावरील आपले नम्रपणाचे विचार मला प्रकट करितां येतील. सध्यां, त्याविषयीं बोलण्याचें माझ्या मनांत नाहीं. मध्यफिन्स्बरींतील मतदारांनीं हिंदुस्थानांतील कोट्यवधि लोकांपासून निरंतरचे धन्यवाद संपादन केले आहेत, व आपल्या वतीनें एका हिंदी गृहस्थाची निवडणूक करून, ब्रिटिशसाम्राज्याच्या इतिहासांत प्रसिद्धि मिळविली आहे. त्यांचें नांव हिंदुस्थानांतील लोक कधींही विसणार नाहींत. एकदोन लक्षांच्या गोऱ्या पलटणींनीं ब्रिटिश राजसत्तेस जी बळकटी आली असती व हिंदुस्थानांतील लोकांची जी राजनिष्ठा प्राप्त झाली

असती, तीहून दसपट काम प्रस्तुत गोष्टीनें घडलें आहे. ज्या नैतिक शक्तीचा उल्लेख मिडलोथियनचे सभासद, नेक नामदार मिस्टर डब्ल्यू. ई. ग्लॅडस्टन, यांनीं केला आहे, त्या सुवर्णशृंखलेनें हिंदुस्थानदेश हा ब्रिटिश राजसत्तेशीं बद्ध आहे. जोंपर्यंत हिंदुस्थानांतील लोकांना ब्रिटिश लोकांतील न्याय व आदरबुद्धि यांपासून समाधान वाटत आहे, तोंपर्यंत हिंदुस्थानांतील त्यांची बादशाही राहील. व मला कांहींइतकी शंका नाहीं कीं, जरी आपलें पाऊल हळू हळू पुढें पडत असून, वेळेनुसार आंबट तोंड करण्याची पाळी आपणांस येत असली, तरी आपण जी जी दाद चिकाटी धरून, नेमस्तपणानें मागूं, ती ती आपणांस मिळेल.'

अर्वाचीन महाराष्ट्रांतील दिवाणगिरीवरून पार्लमेंटचें सभासदत्व प्राप्त करून, देशहिताचा राजमार्ग दाखविण्याचा मान, येणेंप्रमाणें, नामदार मिस्टर दादाभाई नौरोजी यांनीं मिळविला. रावबहादूर रानडे यांनीं त्यांच्या योग्यतेची अर्वाचीन महाराष्ट्रास यथास्थित कल्पना आणून दिली. त्यांनीं असें प्रतिपादन केलें कीं, ' नामूलं लिख्यते किंचित् ' या उक्तीची प्रतीति त्या पुण्यपुरुषाच्या वचनांत येत असल्यामुळें, वितंडवाद माजवून, कोणत्याही पक्षांत दुफळी करण्याचें महापातक त्याच्या हातून घडलेलें नाहीं.[२]



१. मद्रासकर नटेशं ॲंड कंपनी प्रकाशित ' दादाभाई नौरोजी यांचें चरित्र ' ( पृ० ११-१३ ) पहा.

२. मद्रासकर नटेशं ॲंड कंपनीप्रकाशित ' दादाभाई नौरोजी यांचें चरित्र ' ( पृ० ४० वें ) पहा.

# प्रकरण ११ वें.



## मध्यंतरींच्या महत्त्वाच्या गोष्टी व लोकपक्षाचा अप्रतिम प्रतिकार ( १९०१ ).

शेट दादाभाई नौरोजी यांनीं अर्वाचीन महाराष्ट्राचेंच नव्हे, तर सर्व हिंदुस्थानचें नांव विलायतेंत कसें गाजविलें, याविषयीं मागील प्रकरणांत आलें आहे. राष्ट्रोद्धारार्थ शिक्षणप्रसाराची आवश्यकता असते; शिक्षणप्रसारार्थ ग्रंथप्रकाशनाची आवश्यकता असते; ग्रंथप्रकाशनार्थ मुद्रणयंत्रालयाची आवश्यकता असते; व तींमुळें ज्ञान, उद्योग व संपत्ति यांची समृद्धि होत असते; व अवनत राष्ट्र हें उन्नत दशेप्रत पावत असतें. हे थोर विचार, ' अमेरिकन प्रेस ' मध्यें दरमहा दोन रुपयांवर टाईप घासणाऱ्या दहा वर्षांच्या हूड किंवा नंतर ' टाइम्स प्रेस ' मध्यें दहा रुपयांवर किंवा तेथून दीड वर्षानें ' इंदुप्रकाशां 'त तेरा रुपयांवर गेलेल्या, तरुण जावजी दादाजी चौधरीच्या मनांत आले नव्हते. तेथून दीड वर्षानें ' ओरिएंटल ' मध्यें तीस रुपयांवर टाईप पाडतांना, त्यांच्या कौशल्यामुळें, त्यांच्या डोक्यांत ते पुसट पुसट येऊं लागले; त्यांस १८६४ त दृश्य स्वरूप प्राप्त झालें; १८६९ त तर त्यांस ' निर्णयसागर ' ही संज्ञा प्राप्त झाली; त्या संस्थेचा नांवलौकिक ऐकून, मुंबईसरकानें ' जस्टिस् ऑफ दि पीस् ' हा बहुमानाचा किताब त्या संस्थेच्या उत्पादकास दिला. अशा कर्त्या पुरुषाचा अंत ( ५३ वे वर्षी ) झाला ( १८९२ ).

पुढील सालीं, ‘ नवीन हिंदी कायदेकौन्सिलांचा कायदा ’ झाला. त्यासंबंधीं ‘ लंडन टाइम्स ’ मध्यें सर विलियम हंटर या सुप्रसिद्ध इतिहासकारानें लिहितांना, शेट दादाभाई नौरोजीसारख्यांस धन्यवाद देऊन, अल्प हितोपदेश केला. ‘ राष्ट्रीय सभेच्या भक्तांनीं हौस ऑफ् कॉमन्स् ( साधारण लोकांची सभा ) व हिंदी कायदे-कौन्सिलें यांत जो चंचुप्रवेश केला आहे, त्यास कालांतरानें मुसल-स्वरूप प्राप्त होईल अशा दक्षतेनें वागणें, हें त्यांकडे व त्यांच्या व्यवसायबंधूंकडे आहे. ’

१८९३–९४ त हिंदुमुसलमानांत दंगे झाले. त्यांची सुरवात १८९३ च्या मोहरमांत ता० २५ जुलैला प्रभासपट्टण ( जुना-गड संस्थान ) येथें होऊन, शुक्रवार ता० ११ आगस्टला मुंबई-शहरांत त्यांचा प्रसार झाला. दुपारीं एक वाजतां, अमावास्या म्हणून बाजार बंद होता. तरी हनूमान् गल्लींतील मारुतीच्या देवळांत नगारा झडत होता. त्यामुळें शेज़ारील जुम्मा मशिदींत निमाज पढणारांस हरकत झाली. तेव्हां मुसलमान लोक, ‘दीन ! दीन !’ ( धर्म ! धर्म ! ) करीत सोटे घेऊन, त्या मारुतीच्या देवळावर चाल करून गेले ! तों आदल्या रात्रीपासून पाळतीवर असलेले पोलीस त्यांस आडवे आले. तरी कित्येक बदमाषांनीं त्यांस न जुमानितां, दगड, काठ्या व कवलें यांनीं हिंदुलोकांवर प्रहार केले व आसपासच्या दुकानांत लुटालूट केली. मारवाडी बाजार, भेंडी बाजार, ग्रँट रोड, कामाठीपुरा, मांडवी वगैरे ठिकाणीं दुपारचे दोन वाजल्यापासून संध्याकाळचे पांच वाजेपर्यंत दंगा चालला होता. जिकडे तिकडे हाहाकार उडाला ! पोलिस-कमिशनर मिस्टर व्हिन्सेंट यांनीं मुसलमानांच्या टोळ्या फोडण्याकरितां दोन तास आपली

पराकाष्ठा करून, लष्करी मदत मिळण्याची व्यवस्था केली. मिस्टर कूपर, चीफ प्रेसिडेन्सी मॅजिस्ट्रेट, यांमार्फत लष्कर शहरांत आणण्याचा हुकूम सोडून, ते स्वतः पायधुणी पोलिसस्टेशनावर आले; नंतर, भेंडीबाजारापासून डोंगरी तुरुंगापर्यंत एकेक चौकीवर एकेक नाईक व पांच पांच शिपाई ठेवीत गेले. अशी व्यवस्था करितांना, पोलिस-कमिशनर व त्यांचे असिस्टंट यांस जखमा लागल्या. पोलिसांसमोर हिंदूंवर हल्ला झाला. तरी त्यांचा कोणी बचाव करीना. काय ते मांडवींत लहाणे वाणी व गुलालवाडींत इतर हिंदू यांनीं आपलें रक्षण केलें. बाकी सर्व ठिकाणीं ( म्हणजे कामाठीपुरा, गोळापीठ व डोंगरी येथें ) घरें गेलीं, दुकानें गेलीं; देवळें गेलीं. ट्रॅम बंद झाली ! जी. आय्. पी. चे दोन हजार रुपये व बी. बी. सी. आय्. चे पांच हजार रुपये गेले ! टपाल लुटलें ! असा हैदोस झाला.

संध्याकाळचे ५ ला, घांटी, कोंकणी, कामाठी, दंडधारी जातीचे मजूर हे गिरण्यांतून सुटतांच, मुसलमानांशीं सामना करण्याकरितां निघाले. लष्करी लोकांची संख्या थोडी होती. म्हणून शहराचें संरक्षण होत नव्हतें. रात्रीचे ७।८ वाजतां, राजरस्त्यावर

१. हिंदुलोकांचीं पडलेलीं घरें व देवळे रु. ५१,३०१.
हिंदुलोकांचा लुटलेला माल रु. ९९,१९६.
हिंदुलोकांचा परत मिळालेला माल रु. ५,२२८.
मुसलमानांचीं फोडलेलीं घरें व मशिदी रु. २३,१९३.
मुसलमानांचा लुटलेला माल रु. ९९२४१.
मुसलमानांचा परत मिळालेला माल रु. १,७७८.
' मुंबईसरकारचा राज्यकारभाराचा वृत्तांत ( १८९३-९४ ). पृ० २५७ वें प्र० ७ वें, पहा.

प्रेतें व जखमी झालेल्या लोकांचे ढीग पडलेले होते ! दोन टांकी-जवळील रस्त्यावर लेफ्टेनंट वेस्ट यांनीं दंगेखोरांवर गोळी घालण्याचा हुकूम केला. तेव्हां तिघेजण ठार झाले. शनिवारीं व आदितवारीं असे २।४ प्रसंग आले.[1] परंतु सोमवारीं जिकडे तिकडे स्वस्थता होण्याचा रंग दिसूं लागला. हपिसांतून व उद्योगधंद्यावरून येणाऱ्या यजमानाविषयीं बायकोस, शाळेंतून येणाऱ्या मुलांविषयीं पालकांस व गिरणींतून येणाऱ्या मजुरांविषयीं कुटुंबांस काळजी वाटेनाशी झाली. दोन्ही जातींच्या विचारी पुरुषांच्या साहाय्यानें, सरकारनें, त्यांस समेट करण्याकरितां, मेळे—मिरवणुकी काढिल्या; तसेंच, असंतोषाचें बीं जें धर्मवेड, त्याविषयीं सारासार विचारानें नियम ठरविले; चतुर्भुज केलेल्या २५०० पैकीं, १४८५ ना शिक्षा झाल्या.

या ‘ मुंबईच्या दंग्या ’ चीं कारणें ४ होतीं. एक असें कीं, प्रभासपट्टण येथें ताबूत थंडे होण्याच्या दिवशीं, पोलिस-सुपरिंटेंडंटच्या हुकुमाप्रमाणें, हिंदुलोक घराबाहेर पडले नव्हते; तरी जुनागड संस्थानच्या नबाबसाहेबांनीं नेमिलेल्या दोघां हिंदु-मुसलमान न्यायाधीशांच्या कमिशनच्या रिपोर्टाप्रमाणें, मुसलमानांनीं तेरा हिंदूंचे खून पाडिले होते. दुसरें असें कीं, गोरक्षणाचा प्रयत्न सर्वत्र[2]

१ बळी पडलेल्यांची संख्याः—४६ मुसलमान ⎫ ‘ मुंबईसरकारच्या राज्यकारभाराचा वृत्तांत ’ १८९३-९४
३४ हिंदू ⎬
१ ज्यू ⎭ प्र० वें,( पृ.२२७ वें. )पहा.

२ हेंच दंग्याचें प्रत्यक्ष कारण होय, असें मुसलमान लोक म्हणतात. त्यांच्या मतें, बक्रीईद या सणांत गोहत्या आहे. यावर हिंदूंचे असे उलट म्हणणे आहे कीं, सरकारनें गोहत्येस प्रतिबंध करणें हें इष्ट आहे; कारण धर्मदृष्ट्या गाय ही पवित्र असून, हिंदुस्थानसारख्या शेतकीच्या देशांत गाईपासून होणाऱ्या बैलांची नेहमीं अडचण असते.

‘ मुंबईसरकारच्या राज्यकारभाराचा वृत्तान्त ’ १८९३-९४ ( पृ० ७ वें पृ० २५७ वें ) पहा. ]

जारीनें चालू होता. तिसरें, स्वसामर्थ्य व सरकारचा पाठिंबा यांचा मुसलमानांस गर्व झाला होता. चौथें असें कीं, प्रभासपट्टणच्या हिंदूंच्या तारेवरून मुंबईकर शेट लखमीदास खिमजी हे श्रीमंतांपासून गरिबांचें रक्षण किंवा सामान्यहितसंबंधाचें रक्षण या न्यायपुरवणीच्या तत्त्वा ( Maintenance ) वर पुण्यास लॉर्ड हारिस या गव्हर्नरसाहेबांच्या भेटीस गेले होते; तेव्हां त्यांनीं शेटजींची भेट न घेतां, त्यांस उलट असा जबाब पाठविला होता कीं, तुम्हांस या कामांत खटपट करण्याचें कारण नाहीं. त्यामुळें मुसलमान लोकांच्या पोटांत धुमसत असलेला द्वेषाग्नि अधिकाधिक प्रज्ज्वलित होत गेला होता.

या ' मुंबईच्या दंग्यां ' चा परिणाम म्हटला म्हणजे मुंबई शहराच्या नीट बंदोबस्ताकरितां जें जादा पोलिस बसलें, त्याचा ३/४ खर्च मुंबईच्या म्युनिसिपल कॉर्पोरेशनवर बसला.

' पुण्याचे दंगे ' डुल्या मारुतीच्या समारंभांत, ज्ञानदेव, तुकाराम यांच्या पालख्यांच्या मिरवणुकींत व गणपतिविसर्जनांत झाले. वादग्रस्त प्रश्न मुंबईच्या दंग्यांप्रमाणेंच होता. मुसलमानांच्या मशिदी, पीर व दर्गे यांवरून हिंदूंनीं वाजत गाजत मिरवावें काय ? पुण्याप्रमाणें येवलें वगैरे ठिकाणींही दंगे झाले.

हिंदु-मुसलमानांच्या दंग्यांस ऊत येत असतां, न्यायमूर्ति काशिनाथ त्रिंबक तेलंग एम्. ए. ( भगवानदास संस्कृत स्कॉलर, ) एल्. एल्. बी., ॲडव्होकेट, सी. आय्. ई. यांचा अकालीं अंत झाला ( १८९३ ). हे नुसते वक्तृत्वपटु कायदेपंडित नव्हते, तर उत्तम संस्कृतज्ञ व शोधक ग्रंथकार होते. त्यांनीं केलेलें भगवद्गीतेचें इंग्रजी कविताबद्ध रूपान्तर प्रो. मॅक्समूलरकृत ' पौर्वात्य पवित्र ग्रंथमालें ' त

आलेलें असून, त्याच्या प्रस्तावनेंत, कृष्ण हा येशूचा अवतार नसून उलट प्रकार मात्र वास्तविक आहे, असें सिद्ध केलेलें आहे. दुसऱ्या एका निबंधांत ' रामायण ' ही ' इलीयड ' ची प्रतिकृति नसून, उलट प्रकार काय तो खरा आहे, असें प्रतिपादिलेलें आहे. लेखन-परिश्रमाशिवाय, ' हिंदू युनियन क्लब ' ( हिंदूंच्या एकीकरणार्थ संस्था ), ' हेमन्तव्याख्यानमाला, ' इत्यादींत त्यांचें प्रधान अंग होतें. ते सुधारक असून, त्यांची समजूत अशी असे कीं, सुधारणा ही समाजांतलि जुन्या विचारांस जुळती असावी; म्हणजे तिला विशेष विरोध न येतां, ती चालू राहते. त्यांच्या स्मरणार्थ, टौन-हॉलमध्यें लॉर्ड हॅरिस या गव्हर्नरसाहेबांच्या अध्यक्षतेखालीं ता० ३१ ऑक्टोबर १८९३ रोजीं जी जाहीरसभा भरली होती, तींत रा० तेलंगांच्या बरोबर १६ हून अधिक वर्षें ज्यांनीं सार्वजनिक कामें अंगावर घेतलीं होतीं, ते नामदार फेरोजशहा मेहता एम्. ए., बॅरिस्टर अॅट-लॉ, सी. आय्. ई. यांनीं त्यांविषयीं असे शोकोद्गार काढिले कीं, " याच दिवाणखान्यांत रा० तेलंगांनीं अनेक वेळां लोक-सेवा केलेली आहे. व आज येथें हजर असणारांपैकीं पुष्कळांना त्यांची ती सुंदर व विचारवंत, तेजःपुंज व दयावंत मुद्रा; त्याचें तें श्रुतिमनोहर, उपदेशपर, विचारपरिप्लुत व रसभरित भाषण; त्यांचे ते गंभीर व न्याय्य विचार; त्यांची ती नेटाची पण नेमस्तपणाची लोकशिष्टाई आठवत असेल! इतक्या अनेक वर्षांच्या अनेक विचा-रांचें काहूर या प्रसंगीं व या दिवाणखान्यांत मनांत माजलें असतां, त्यांच्या बुद्धीची विशालता, त्यांच्या मनाची कोमलता, त्यांच्या

१. अलाहाबादकर बाबू सी. वाय् चिंतामणिप्रकाशित ' नामदार फेरोजशहा मेहता यांचीं भाषणें ' ( पृ० ३७७-३७८ वीं ) पहा.

स्वभावाची तारतम्यता हीं आज त्यांच्या अकालीं व ऐन उमेदींतील निधनानंतर तावडतोब डोळ्यांसमोर आणूं म्हणावें, तर कंठ दाटून येतो, डोळ्यांस गंगा-यमुनांचा पूर येतो; व असें होतें कीं, ‘ त्या गतमूर्तीचा हस्तस्पर्श आपणांस केव्हां होईल व त्या स्तब्ध मूर्तीची वाणी आपल्या कानांवर केव्हां येईल ! ’ ”

न्यायमूर्ति तेलंग यांच्या अकालीं मृत्यूवरून, पदवीधरांच्या अकालीं मृत्यूवर, डॉ० रामकृष्ण गोपाळ भांडारकर एम्. ए. (भगवानदास संस्कृत स्कॉलर ) पी एच. डी. ( गटेनबर्ग ) यांनीं, न्यायमूर्ति तेलंगांनंतर व्हाइस-चँसेलरची जागा मिळाल्यावर, विश्वविद्यालयाच्या वार्षिक पदवीदानसमारंभांतील व्याख्यानांत बालविवाह व व्यायामाभाव, अशीं त्याचीं मुख्य कारणें नमूद केलीं होतीं. त्यावर, न्यायमूर्ति तेलंगांनंतर त्यांच्या जागेवर आलेले त्यांचे गुरुवर्य न्यायमूर्ति माधव गोविंद रानडे, एम्. ए. ( इतिहासांत सुवर्णपदक मिळविणारे ), एल्. एल्. बी. ( ऑनर्स ) ॲडव्होकेट, यांनीं उत्तरपक्ष केला. त्यांनीं आपल्या परिचयाच्या गृहस्थांस पत्रें पाठवून, त्यांकडून सदर्हू प्रश्नावर उत्तरें आणविलीं. तेव्हां १४० जणांनीं त्यांस उत्तरें धाडिलीं. त्यांवरून, मुंबईच्या पदवीधरांच्या सभेसमोर न्यायमूर्तींनीं असें सिद्ध केलें कीं, ऐल्. सी. ई. ही सर्वांत अत्यंत निरुपद्रवी परीक्षा होय; पारशी लोकांत बालविवाह नसून, त्यांतील पदवीधरांचें २० ते ४० वर्षांतलें अपमृत्यूचें प्रमाण आपल्या पदवीधरांच्या अपमृत्यूइतकेंच आहे; पारशी लोकांतील

---

१. रा. सूर्यराम सोमेश्वर देवाश्रयीकृत ‘ न्यायमूर्ति रानडेनुं संक्षिप्त चरित्र ’ पृ० १८९-१९० वें ) व मुनशी माधोराम बी. ए. कृत ‘ श्रीमान् महादेव गोविंद रानडे और उनका काम ’ ( पृ० ३१६-३२१ वीं ) पहा.

उघड्या हवेंतले खेळ खेळण्याची गोडी अलीकडील २० वर्षांतील आहे; आपले विद्यार्थी अधिक कष्टाळू असून, दारिद्र्यामुळें त्यांस कसदार अन्न मिळत नाहीं; म्हणून विश्वविद्यालयांतील परीक्षांच्या अभ्यासाचा शीण त्यांस लवकर जाणवतो. अशा वस्तुस्थितींत, न्यायमूर्ति रानडे यांनीं विश्वविद्यालयास असें सुचविलें कीं, त्यानें आपला अभ्यासक्रम उमेदवारांस झेंपण्यासारखा ठरवून, ज्या विषयांत ते उत्तीर्ण होतील, त्यांत त्यांस पुन्हा बसवूं नये; व धंद्याच्या परीक्षा वर्षांतून दोनदां तरी व्हाव्यात.

या कडाक्याच्या वादांत पडलेल्या डॉ. भांडारकरांनीं डेक्कन कॉलेजांतिल आपल्या संस्कृत प्रोफेसरच्या जागेवरून पेन्शन घेतल्यावर, त्यांच्या स्मारक-चित्राच्या आविष्करणाचे वेळीं, मुंबईचे गव्हर्नर लॉर्ड हॅरिस यांनीं त्यांची अशी वाहवा केली कीं, "त्यांनीं शिक्षण, समाज व धर्म यांसंबंधीं आपलें कर्तव्यकर्म इतकें चोख बजाविलें आहे कीं, 'यः क्रियावान् स पंडितः' ही उक्ति जर कोणास पूर्णपणें लागू होत असेल, तर ते डॉ० रामकृष्ण गोपाळ भांडारकर हे होत. शिक्षकांच्या चांगल्या भाषणशैलीनें त्यांची तृप्ति होत नसे; तर आपल्या स्पष्टीकरणांत ते आपला सर्व उत्साह प्रकट करीत असत; त्यामुळें, तो तो विषय व तीं तीं पात्रें हीं डोळ्यांसमोर मूर्तिमंत उभीं राहत असत; व आपल्या उत्साहामुळें, ते विद्यार्थ्यांच्या मनांत चालू विषयांचें मर्म जाणण्याची इच्छा उत्पन्न करीत असत. हें कर्म यत्किंचित् नव्हे. परंतु, ज्याची मी विशेष महती समजतों,

---

१. 'मुंबईसरकारच्या राज्यकारभाराचा वृत्तान्त' (१८९५-९६) पृ० २३३-२३५ वीं पहा.

२. प्रो० फ्रेझरकृत 'डेक्कन कॉलेज' (पृ० ८० वें) पहा.

तो म्हणजे उत्कृष्ट निस्पृहतेचें शील, दंभद्वेष, सुधारणाप्रेम यांचा नित्याचरणांत व शिक्षणव्यवसायांत त्या विद्वान् डॉक्टरांनीं घालून दिलेला कित्ता होय. ”

डॉ० भांडारकरांचा असा बडेजाव पुणें येथें झाल्यावर, बडोदें येथें रावसाहेब बापट ( जमाबंदीखात्याचे खरे वरिष्ठ अधिकारी ) यांवर गुजराथी प्रतिपक्ष्यानें लांच खाल्याचा आळ आणिला. तेव्हां श्रीमंत सयाजीराव महाराज गायकवाड हे युरोपांत असून, राज्य-सूत्रें दिवाणबहादूर मणिभाई जसभाई या विद्वान् गृहस्थाच्या हातीं आहेत, असा कपिलाषष्ठीचा योग साधून, बडोदें संस्थानच्या एका अंगांतील व्यंग व्यक्त करण्याची ही काकदृष्टि होती. परंतु रा० बाळ गंगाधर टिळक, रा० महादेव चिमणाजी आपटे, व रा० दाजी आबाजी खरे या त्रिवर्ग नामांकित बी. ए., एल्‌एल्. बी.नीं रा० सा० बापट यांचा उत्तरपक्ष स्वीकारून, नामदार मिस्टर फेरोजशहा मेहता एम्. ए. बॅरिस्टर-ॲट-लॉ व बॅरिस्टर ब्रॅन्सन या सरकारी वकीलांस ३ महिने तोंड देऊन, कामिशनपुढें आलेल्या आरोपांतून रावसाहेब बापट यांस मुक्त केलें. या प्रकरणांत राजा व प्रजा यांचे परस्परांवरील हक्क, प्रजा व एक विवक्षित अधिकारी यांस मिळणारा न्याय, परस्पर समाजांतील ऐक्य, इत्यादि गोष्टी वादग्रस्त असल्यामुळें, त्यास बरेंच महत्त्व प्राप्त झालें होतें. व त्याची चौकशी नीट व्हावी म्हणून हजारों रुपये खर्च करून, योग्य तिऱ्हाईत अधिकाऱ्यांस पंच नेमून, श्रीमंतांनीं दोन्ही पक्षांस मान्य होईल असा निकाल अत्यंत चतुराईनें देऊन, राज्यांतील दुफळी मोडून टाकून, आपलें कर्तृत्व सिद्ध केलें. ( १८९३-९५ ).

याच वर्षद्वयांत अनेक संस्था उत्पन्न झाल्या. त्यांतील प्रमुख म्हटल्या म्हणजे ‘ डेक्कन व्हर्नॉक्युलर ट्रॅन्स्लेशन सोसायटी’( पुणें ), ‘ विधवाविवाहप्रतिबंधानिवारक मंडळी ’ ( पुणें ), ‘ अनाथबालिकाश्रम ’ ( पुणें ), ‘ उद्योगवृद्धिसंस्था ’ ( पुणें ), या होत. राणे या मराठे सरदारांस मोझांबिक (ऑफ्रिका) येथें पोर्तुगीज सरकारनें बदलल्यामुळें, त्यांनीं गोवें येथील सरकारी दारूगोळा लुटून सर्व गोमांतक उध्वस्त करण्याचा जो अट्टाहास केला होता, तो खुद्द पोर्तुगॉलहून एक लढाऊ जहाज घेऊन येणाऱ्या डयूक ऑफ ऑपर्टो यांनीं मोडून, १८५७–५८ ची अल्पस्मृतिहि लोकांस न होईल अशी खबरदारी घेतली; ही गोष्ट ऐतिहासिक महत्त्वाची झाली ( १८९५). रा. बाळ गंगाधर टिळक यांस मध्यभागतर्फे कौन्सिलर नेमण्यांत आलें, ही गोष्टही तशीच योग्य झाली (१८९५). या सर्वांस मागें टाकणारी गोष्ट म्हटली म्हणजे शेतकरी व सावकार यांत सलोखा व न्यायबुद्धि जागृत करणारा, गरीब रयतेच्या उंबऱ्यांत तिची दाद लावणारा, तिचा बडेजाव करून तिची पत वाढविणारा जो ‘ शेतकऱ्यांचे दुःखनिवारणाचा कायदा ’ ( १८७९ ) त्याची दुरुस्ती ( १८९५ ) ही होय. हीमुळें, शेतकऱ्यांच्या कर्जबाजारीपणाच्या मूळावर आघात झाला नाहीं; त्या कर्जबाजारीपणाबद्दल सावकारांच्या माथीं सर्वस्वीं खापर फोडणें हें रास्त नाहीं. १८७८ व १८९१ तील ‘ दुष्काळ-कमिशनां ’ नीं त्या कर्जबाजारीपणाबद्दल तंग व हेकेखोरपणाची सरकारी पद्धति जबाबदार धरिली होती. दरम्यान् लॉर्ड रिपन् या व्हाइसरॉयसाहेबांनीं सुटी व तहकुबी देतांना रेव्हिन्यू खात्यानें अधिक विचारीपणा व नेमस्तपणा दाखवावा, असें राज्याचें धोरण ठरविलें होतें; तरी त्यास पुढें वाटाण्याच्या अक्षता मिळाल्या.

सबब नवीन कायद्यांत, सरकारच्या जुलमापासून न्याय देणाऱ्या कोर्टाप्रमाणें, रेव्हिन्यू खात्याच्या कडक अंमलबजावणीवरील फिर्याद ऐकून न्याय देणारें कोर्ट नेमण्याची सोय झाली असती, तरच प्रस्तुत प्रश्नाचा सांगोपांग विचार केल्यासारखें झालें असतें. नामदार फेरोजशहा मेहता यांसारख्या, न्यायमूर्ति रानडे या तज्ज्ञांच्या अनुभवावर भिस्त ठेवणाऱ्या, देशी सभासदांचा असा अभिप्राय होता.[1]

पुढील वर्षी ( १८९६ त ) दुष्काळ व ग्रंथिकसंनिपात या संकटद्वयानें महाराष्ट्रदेशास जर्जर केलें. इंग्रजसरकारनें ' दुष्काळ दुःखनिवारक कायद्या ' प्रमाणें रयतेचें दुःख दूर करण्याचा यत्न केला; ' सार्वजनिकसभे ' चे नायक रा० टिळक यांनीं त्या कायद्यांतील सवलती लोकांस समजावून देऊन, त्यांचीं गाऱ्हाणीं अर्जद्वारें व सनदशीर रीतीनें सरकारच्या कानावर घालून, दंगे होऊं नयेत म्हणून स्वस्त दरानें धान्य विकणारीं दुकानें काढून, अहमदनगर व सोलापूरच्या साळ्यांसाठीं ' स्थानिक कमिट्या ' काढण्याची कल्पना सरकारास सुचविली; पंडिता रमाबाई यांनी दुष्काळाच्या जिल्ह्यांतून हिंडून पापाचरण व घोर मरण यांपासून उच्च जातींच्या ३०० मुलींना वांचवून त्यांना येशूच्या कळपांत ओढून, केडगांव ( पुण्यानजीकचें ) येथें ' मुक्ति ' ही ख्रिस्ती उद्योगशाला स्थापिली. श्रीमंत महाराज शिवाजीराव होळकर यांनीं महाराष्ट्रांतील आपल्या गांवच्या ३००० लोकांना आपल्या संस्थानांत आणून, त्यांस संस्थानच्या खर्चानें शेतींत बसवून रु० १२००० चें धान्य पुणें,

---

१. अलाहाबादकर बाबू सी. वाय्. चिंतामणिप्रकाशित ' नामदार फेरोजशहा मेहता यांची व्याख्यानें ' ( पृ० ३९४,३९५, व ६७२ वीं ) पहा.

नगर, सोलापूर इ० ठिकाणीं पाठवून दुष्काळाचीं कामें चालू करून ५०० अनाथ बालकांचा सांभाळ केला. येणेंप्रमाणें, दुष्काळाचें पहिलें संकट जो तो आपआपल्या परीनें दूर करीत होता.

दुसरें संकट ग्रंथिकसंनिपात ( प्लेग ) हें मुंबईतील मांडवी या, व्यापाराच्या दाट व कोंदट वस्तींत उद्भवून, त्याचा प्रसार सर्वत्र हां हां म्हणतां झाला. भोळे भाविक लोक त्यास 'ईश्वरी कोप 'असें म्हणूं लागले. तो औषधोपचारानें साध्य आहे, असें डॉक्टरलोक प्रतिपादूं लागले. सरकारनें प्लेगची लस तयार करण्याकरितां परळ ( मुंबई ) येथें एक जंतुशास्त्राची प्रयोगशाळा स्थापिली. तसेंच, त्यानें ' स्पर्शजन्य रोगासंबंधी कायदा ' पसार केला. त्यांत एक कलम असें होतें कीं, ज्या घरासंबंधीं प्लेग–अधिकारी यांस संशय येईल, त्यांत शिरण्याअगोदर, त्यांनीं त्या घराच्या मालकास सूचना दिली पाहिजे; याउपर जर मालक त्यांस आंत येऊं न देईल, तर त्यांनीं तेथें सक्तीनें प्रवेश करावा; व ज्यास प्लेग झाल्याचा संशय आला असेल, त्याची डॉक्टरकडून तपासणी करवावी. या भयंकर व अंगावर शहारे आणणाऱ्या वेळीं, रा० टिळकांसारखे स्वयंसेवक हजर असून लोकांस धीर देत असत. दुखणाइतांस अलग ठेवण्याच्या जागीं खाण्यापिण्यांत धर्माचरण घडावें म्हणून, त्यांनीं वर्गणी गोळा करून एक हिंदुहॉस्पिटल व एक स्वयंपाकशाळा स्थापून, अशा आणीबाणीच्या वेळीं रयतेशीं प्रेमानें वागण्याचा इशारा त्यांनीं सरकारास केला होता. परंतु त्याचा उपयोग झाला नाहीं. लोकांच्या धर्मसमजुतीकडे अधिकारिवर्गाचें लक्ष्य

१ सोराबजी जहांगीरकृत ' हिंदी राजेरजवाडे ' ( पुस्तक १ लें, पृ० ८५–९० वीं ) पहा.

गेलें नाहीं. त्यामुळें, कांहीं तरुण माथेफिरू मंडळीनें कट केला. पुणें येथील लष्करी प्लेग-अंमलदार मेसर्स रँड व आयर्स्ट यांचा समाचार घेण्याचा त्यांनीं विचार केला. ता० २२ जून १८९७ रोजीं, महाराणीसाहेबांच्या ' हीरकोत्सवा ' निमित्त गणेशखिंडींतील गव्हर्नरसाहेबांच्या बंगल्यावर खाना झाला. तेथून त्या अंधेऱ्या रात्रीं, १० च्या सुमाराला, अधिकारी मंडळी आपआपल्या घरीं परत जात होती. रस्त्याच्या बाजूंनीं पोलिसचा बंदोबस्त विशेष नव्हता. रस्त्याच्या बाजूंनीं दिव्यांचा विशेष लखलखाट नव्हता. रस्त्याच्या बाजूनीं विशेष वस्ती नव्हती. रँड व आयर्स्ट यांच्या गाड्या एकामागून एक अशा चालल्या होत्या. तेव्हां त्यांवर मागील बाजूनें चढून, चाफेकरबंधुद्वयानें त्यांतील अधिकाऱ्यांवर आपआपलीं पिस्तुलें झाडिलीं. या घोर पातकांबद्दल या गुन्हेगारांस कायद्याप्रमाणें, देहान्तप्रायश्चित्त पुढें—चौकशीअंतीं झालें. त्यांत अंग असल्याच्या नुसत्या पिशुन वार्तेवरून, १८२७ च्या २५ व्या कायद्याप्रमाणें सरदार बळवंत रामचंद्र नातु व त्यांचे बंधु यांस एकदम पुण्याहून ठाणें, अमदाबाद व बेळगांव इकडे नजरकैदेंत ठेवण्यांत आलें. [ ता० २८ जुलै १८९७ ].[1]

मध्यंतरीं, ता० १५ जून १८९७ च्या ' केसरीं ' त ' शिवराज्यारोहणा ' च्या वेळीं जीं गीतें म्हणण्यांत आलीं होतीं, त्यांपैकीं एक त्या उत्सवाच्या संक्षिप्त वृत्तान्तात आलें होतें. त्यावरून, रा० टिळकांवर ' राजद्रोहा ' चा आरोप शाबीत होऊन, दॉवर बॅरिस्टरांची शिष्टाई निष्फळ झाली. रा० टिळकांस १॥ वर्षांची कैद मुंबई हायकोर्टांत झाली. ' अग्रायणा ' सारख्या

१. रा० बळवंत रामचंद्र नातु (सेकंडक्लास सरदार व इनामदार) याची 'चँपियन' ( मुंबई ) या साप्ताहिकाची पुरवणी, म्हणून प्रसिद्ध झालेला पत्रव्यवहार पहा.

त्यांच्या शोधक बुद्धीच्या निबंधावरून ( १८९३ ), प्रो० मॅक्समूलरादि मंडळीनें महाराणीसाहेबांस अर्ज करून, शिक्षेपैकीं ६ महिने उरल्यावर, त्यांस मुक्त करविलें. त्या कारागृहवासांत, रा० टिळकांनीं आपली ' अग्रायणा ' ची कल्पना, प्रो० मॅक्समूलर-साहेबांनीं भेटीदाखल पाठविलेल्या आपल्या समग्र ऋग्वेदाच्या आवृत्तीवरून तसेंच भूगर्भशास्त्र व पुरातन वस्तुशास्त्र यांवरून दृढ करून, हिमयुगांत वैदिक ऋर्षीचे पूर्वज उत्तरध्रुवाकडे राहत असत, असा सिद्धान्त ठरविणारा ' आर्यांचें आर्टिक सदन ' हा विद्व-न्मान्य ग्रंथ लिहिला.

ता० १६ मार्च १८९८ रोजीं, बॉस्टन येथें ' अमेरिकन रमाबाई असोशिएशन ' च्या वार्षिक सभेसमोर, पंडिता रमाबाईनीं ' शारदा सदना ' चा ९ वर्षांचा वृत्तान्त वाचून दाखविला. त्या संस्थेंत १४ विद्यार्थिनींस शिक्षक म्हणून तयार करण्यांत आलें, त्यांपैकीं ९ जणी चांगल्या जागांवर असून, दोघींनीं स्वतांच्या शाळा चालविल्या; धात्रीकर्मांत ८ जणींना तयार करण्यांत आलें; त्यांपैकीं ५ जणींना जागा मिळाल्या; ७ जणी मुकादम व २ जणी गृहरक्षक बनून, १० जणी संसारांत बसल्या; ३५० विद्यार्थिनींपैकीं ४८ जणींवर पंडिता रमाबाईची छाया पडून, त्यांनीं धर्मांतर केलें; त्यापैकीं २३ स्वयंसेवक असून, सर्वजणींनीं आपल्या हिंदू चाली-रीती सोडिल्या नव्हत्या. नंतर, दुष्काळपीडितांकरितां काढिलेल्या ' मुक्ति ' या उद्योगशाळेची हकीकत देऊन पंडिताबाईनीं रु० १५,६२५ च्या वार्षिक मदतीची रु० ६२,५०० वार्षिक मदत मिळविली.

याच वर्षी, लष्कर-ग्वाल्हेर येथील निंबाजीच्या पहाडावरील परमहंस भाऊमहाराज दळवी हे समाधिस्थ झाले. ते सरदार लालासाहेब दळवी यांच्या येथें जन्मून ( १८२८ ), १४ व्या वर्षापासून वैराग्य धारण करून होते. त्यांच्या निर्लोभी व दैवी गुणांबद्दल मोठा लौकिक होता.[1]

मध्यंतरीं, न्यायमूर्ति बद्रुद्दिन तैय्यबजी यांनीं रु० ५०,००० च्या जामिनावर रा० टिळकांस खुलें केलें असतां, त्यांच्या परिचयाचे सरदार बाबामहाराज यांच्या अंतकाळच्या आग्रहावरून, ते त्यांच्या मृत्युपत्रचालकांपैकीं एक झाले. त्या कुलाच्या कर्जबाजारीपणांतून त्यांची जहागीर मुक्त करण्याचा त्यांचा हेतु होता. परंतु, कांहीं विघ्नसंतोषी मंडळींनीं बाबामहाराजांच्या मागें त्यांचें तरुण व अक्षरशून्य कुटुंब ताईमहाराज यांस फितवून, रा० टिळकांच्या हेतूचा विपर्यास त्यांस भासवून, सदहू मृत्युपत्राची रा० टिळक यांनीं मिळविलेली दाखलेसूद नक्कल व त्यांनीं ताईमहाराजांस देवविलेला औरंगाबादकर दत्तक रद्द करवून घेण्याकरितां दावा उपस्थित केला. त्यांतून एक फौजदारी पिल्लू निघालें. असा ४ वर्षे तंटा चालून, शेवटीं हायकोर्टांत त्या दोन्ही प्रकरणांची इतिश्री रा० टिळकांस अनुकूल अशी झाली.( मध्यंतरीं, जी. आय्. पी. रेल्वेकडील तारमास्तरांनीं एक जंगी संप केला. ( १८९६ ) त्यांना काम फार असून, पगार थोडा असे. तर, आपणांस बेतानें काम व पुरेसा पगार मिळावा अशा आशयाचा अर्ज व २४ तासांची सूचनाहीं त्यांनीं ‘ तारमास्तरांच्या मंडळा ’ मार्फत आपल्या वरिष्ठ अधिकाऱ्यांकडे पाठविलीं होतीं. त्यावर, त्यांकडून समाधान-

---

[1] ‘ सत्संग ’ ( वर्ष पहिलें, पहा अं० १० वा व ११ वा ).

कारक उत्तर न मिळाल्यामुळें, तारमास्तरांनीं रेल्वेकंपनीची नोकरी-एकदम ता० ६ मे १८९९ ला दुपारीं ३ वाजतां सोडून जो तो उपरणें झाडून आपआपल्या घरीं आला. पाश्चात्त्य शिक्षणानें अर्वाचीन महाराष्ट्रास संघशक्तीचा जो पाठ मिळत होता, त्याचें हें एक महत्त्वाचें उदाहरण होय. आतां एवढें बरीक खरें कीं, तारमास्तरांच्या दोनच मागण्या कबूल केल्या. पहिली ही कीं, स्टेशनमास्तरांस असिस्टंट देऊन, त्यांस रात्र रात्र डोळ्याचें पातें न लावितां जें काम करावें लागत होतें, तें कंपनीनें सोईवार केलें; व दुसरी ही कीं, जेथें स्टेशन गांवापासून दूर एकीकडे असे, तेथें वेळीं अवेळीं जाण्यायेण्याचा व एकटें रात्र रात्र रहाण्याचा त्रास वाटूं नये म्हणून, कंपनीनें स्टेशनमास्तरादि मंडळीस सकुटुंब राहण्याकरितां फुकट घरें बांधून दिलीं. तसेंच, जेव्हां कंपनीच्या नजरेस असें आलें कीं, हिंदुस्थानी व बंगाली हलक्या पगाराची नोकरमंडळी ही वरवर पोषाखाचा थाटमाट करून तोंडावर साखर पेरणारी असली तरी, ती उतारू लोकांस तितकीच लुटणारी आहे; तेव्हां तिनें आपली पूर्वींचीं, मध्यम वेतनाचीं, अंतर्यामापासून सेवा करणारीं, साधीं येथलीं माणसें

१ तारमास्तरांच्या संपांतील एक गृहस्थ, रा० चिंतामण नारायण शेंडे, हे मुंबई येथील ठाकुरद्वारानजीक ‘ गणेशमंडळ ’ म्हणून जें एक कापडाचें दुकान आहे त्याचे मालक असून, त्यांनीं सदहू तारीख कृपाकरून ता० ९ डिसेंबर १९०९ च्या आपल्या कार्डानें कळविली. पुढील हकीकत ता० ३ नोव्हेंबर १९१० रोजीं मुंबईंत समक्ष भेटल्यावर, चौकशीअंतीं समजली.

२ तारमास्तरांच्या १५ । १६ मागण्या असून त्यांपैकीं बहुतेक योग्य असून संप मोडल्यानंतर लवकरच त्यांतील बहुतेक मान्य करून कंपनीनें अमलांत आणिल्या ( ‘ जुने व नवे संप ,–’ केसरी, ३–६–१३ )

ठेविलीं; मात्र त्यांस अशा शर्ती घातल्या कीं, इतःपर कोणी 'तारमास्तरांच्या मंडळा' सारख्या संस्थेशीं संबंध ठेवूं नये, व कोणास कंपनीची नोकरी सोडणें झाल्यास, त्यानें कंपनीला शिरस्त्याप्रमाणें तसें करण्यापूर्वीं एक महिना अगोदर सूचना दिली पाहिजे.

याच वर्षांत कोल्हापूर येथें एक विषप्रयोगाचें प्रकरण उद्भवलें. महाराजांच्या येथील मेजवानीच्या वेळीं, पोलिटिकल एजंट कर्नल रे यांच्या रोटांत कांचेची पूड घालून, त्यांस मारण्याचा प्रयत्न केल्याविषयीं मिस्टर फरनँडीस यांवर फिर्याद आली. या प्रकरणाचा तपास चालू असतां, जे रोट जप्त करण्यांत आले होते, ते कोण-कोणत्या बशींत कसकसे ठेविलेले होते, याचा खुलासा झाला नव्हता. बशींत मांडले कोणते व टोपलींत शिल्लक राहिले कोणते, याची माहिती घेऊन, त्याप्रमाणें खुणा करून, रसायनपरीक्षकांकडे रोट पाठविल्याचें दिसत नव्हतें; पुढें त्यांकडून असा रिपोर्ट आला होता कीं, रोटांत थोडीशी रेतीची कचकच व कांचेची पूड आहे, पण ती मुद्दाम घातलेली आहे असें वाटण्याइतकी पुष्कळ नाहीं; डॉक्टर शेळके यांचा अभिप्राय असा होता कीं, रोटांतील चवलीएवढा तुकडा पोटांत गेला असतां मनुष्य मरेल, पण चावून खाण्याच्या रोटांत तो खपला नसता, हें विचार करण्या-सारखें होतें. येणेंप्रमाणें सरकारतर्फे पुरावा यथास्थित नसल्यामुळें फिर्याद काढून घेण्यांत आली. तेव्हां मॅजिस्टेटानें आरोपीस दोषमुक्त केलें. एका निनांवी पत्रावरून, फरनँडीससारख्या गृहस्थास, एखाद्या बदमाषाप्रमाणें, विनाकारण तुरुंगांत ओढून नेल्याबद्दल

नुकसानीचा दावा सरकारवर आणून, त्यांत सदर्हू साहेबांस प्रतिवादी करण्याचा विचार निघाला होता.

पुढील वर्षारंभीं, नामदार डॉ० भालचंद्र कृष्ण भाटवडेकर एल्. एम्. जे. पी. यांस सरकारकडून 'नाइट' (सरदार) ही बहुमानाची पदवी मिळाली. दुसऱ्या दिवशीं, 'टाइम्स् ऑफ् इंडिया' या पहिल्या प्रतीच्या अँग्लो-इंडियन दैनिक पत्रांत त्यांचें अल्पचरित्र आलें होतें. त्यांत या 'पहिल्या ब्राह्मण नाइट' ची कदर केली होती. मुंबईची म्युनिसिपॅलिटी, मुंबईचें कायदेकौन्सिल, मुंबईचें सिटी-इंप्रूव्हमेंट-ट्रस्ट, मुंबईची प्लेगजंतु-प्रयोगशाळा; या भिन्न भिन्न संस्थांची—विशेषतः शेवटलीची—सेवा सर भालचंद्र यांनीं किती उत्तम केली होती, प्लेगची लस टोंचून घेण्याविषयीं लोकांचा गैरसमज याच पत्राच्या द्वारें कसा उत्कृष्ट दूर केला होता, याचा त्या विद्वान् पत्रकर्त्यानें उल्लेख केला होता.

अर्वाचीन महाराष्ट्रांत जसे एक नामांकित डॉक्टर हे सरदार बनले, तसे एक उत्कृष्ट शिल्पीहि उच्च पदास चढले. मुंबई येथील 'स्कूल ऑफ् आर्ट' चे प्रिन्सिपॉल मिस्टर ग्रिफिथ यांनीं ज्यांस प्रशंसापत्र दिलें होतें, मुंबईतील 'आर्ट-सोसाइटी' कडून ज्यांस व्हिक्टोरिया-पदक मिळालें होतें, त्या रा० गणपत काशिनाथ म्हातरे या तरुण शिल्पकारास '१९०० च्या पॅरिस-प्रदर्शनां' त, त्यांच्या 'सरस्वती' या प्लॅस्टर ऑफ् पॅरिसच्या चुन्यानें केलेल्या सर्वथैव उत्तम व प्रेक्षणीय मूर्तीबद्दल, सन्मानसूचक प्रशंसापत्र प्राप्त झालें. तिचा तो डौलदार मुकुट, तिची ती सौम्य मुद्रा,

तिची ती शरीराची सुंदर ठेवण, तिच्या मोराची ती तडफ हीं सर्व अलौकिक ठरलीं.

१९०१ सालीं पेन्शन घेणारे प्रोफेसर गोविंद विठ्ठल करकरे ( डेक्कन कॉलेजांतील गणितगुरु ) यांची पूर्वपीठिकाहि उत्साह-वर्धक होती. यांच्या लहानपणीं त्यांस मिस्टर टक्कर या सिव्हि-लियनानें आपला पुत्र समजून, पुण्याहून केंब्रिज् येथील सेंट जॉन्स कॉलेजांत पाठविलें होतें. तेथें, ते ' सीनियर ऑप्टिम् ' म्हणून गणित विषयांत पदवीधर होऊन, १८९७ त हिंदुस्थानांत परत आले होते. तेव्हां, ते मुंबईविश्वविद्यालयाचे ' फेलो, ' मुंबईच्या शाळाखात्यांतील ईशान्य प्रांताचे इन्स्पेक्टर, मुंबईच्या एलफिन्स्टन कॉलेजांतील गणितविषयाचे अध्यापक, कृष्णशास्त्री चिपळूणकरांमागून रिपोर्टर अशा मानास चढत आले होते.

प्रोफेसर करकरे यांच्या आंगच्या बुद्धिमत्तेस इंग्रजांचा उदार हस्तप्रसाद प्राप्त होतांच त्यांचें दैन्य नष्ट झालें. अर्वाचीन महा-राष्ट्रास त्याच न्यायानें महदाश्रय इष्ट आहे. व त्यास प्रभुकृपेनें तो प्राप्तहि झाला आहे. मात्र त्याचें सार्थक करणें, हें प्रत्येक विचारी देशभक्ताचें आद्यकर्तव्य आहे. अशी भावना ज्यांच्या कृतींत निरंतर व्यक्त होत असून, नृपति-जनपद-हिताचें दुर्लभ कर्तृत्व ज्यांच्या चरित्रांत सतत स्पष्ट दिसत असून, ज्यांनीं लीलेनें भवजलाचें तरण केलें, ते न्यायमूर्ति रानडे हे आपल्या५९व्या वर्षी ता० १६ जॅन्युअरी १९०१ ला हा लोक सोडून गेले. त्यांनीं जवळजवळ ४० वर्षे शिक्षणविषयक, सामाजिक, औद्योगिक, राजकीय व धार्मिक विचा-रांत क्रांति घडवून आणिली. त्यामुळें अर्वाचीन महाराष्ट्रास त्यांनीं

संघशक्तीची महती कळविली. संघशक्तीमुळें कोणतेंही सार्वजनिक कार्य, एका व्यक्तीचा नाश होतांच नाश पावत नाहीं; तसेंच ' पिंडे पिंडे मतिर्भिन्ना ' या वचनानुसार व्यक्तिमात्राच्या गुणांचें चीज होऊन, ' दसकी लकडी एकका बोजा ' असा प्रकार होऊन, अंगावर घेतलेलें काम तडीस जातें. ' मराठी राजसत्तेच्या उदया ' च्या प्रस्तावनेंत त्यांनीं हेंच तत्त्व हिंदुस्थानच्या भावी स्थितीस लावून दाखविण्याचें श्रेय प्रथम संपादन केलें. हें ध्येय अयोग्य नव्हे, असें मिस्टर टप्पर, आय्. सी. एस्. यांसारख्या दूरदृष्टि उदार इंग्रजांचेंहि मत होतें.

मुंबईच्या टौनहॉलमध्यें गव्हर्नरसाहेबांच्या अध्यक्षतेखालीं भरलेल्या स्मारक सभेंत न्यायमूर्तींच्या पदीं १४ वर्षें मिलिंदायमान झालेले प्रो० गोखले यांनीं आपल्या गुरुवर्यांचें यथातथ्य वर्णन करून म्हटलें कीं, " रा० रानडे हे सर्व देशभर पसरलेल्या अनेक तरुणजनांना प्रकाश व उष्णता देऊन प्रत्येकास आपापल्या कक्षेंत व आपापल्या त्रिज्येनें प्रदक्षिणा करण्यास लावणाऱ्या मध्यबिंदुस्थ सूर्याप्रमाणें होते. अशा उमेदवारांच्या ठायीं ते जी भक्ति उत्पन्न करीत असत, ती अत्यंत विलक्षण असे; व ज्या तरुण गृहस्थांचें त्यांच्याशीं संघट्टण होत असे, त्यांस तर त्यांच्या तोंडून जें निघे तें ब्रह्मवाक्य वाटे, व त्यांनीं जर आपली पाठ थोपटली तर आपली यात्रा सफळ झाली, असें त्यांस भासे. खरोखर, आचार्यांचे उत्तमोत्तम गुण रा० रानडे यांच्या अंगीं वास करीत होते. असे गुरु आपणांस सोडून गेले, तेव्हां आपल्या अडखळणाऱ्या पावलांस जिनें आतांपर्यंत वाट दाखविली, तो ज्योति नष्ट झाल्याबद्दल आपणांस कसेंसेंच वाटलें, तर त्यांत

नवल काय ? तरी पण आमची नम्रपणाची अशी समजूत आहे कीं, ज्यानें या राष्ट्रास रा० रानडे हे अर्पण केले होते, तो कदाचित् दुसऱ्यांस योग्यवेळीं जन्मास घालील. तोंपर्यंत आमचें हें कर्तव्यकर्म आहे कीं, आह्मीं त्यांचें नामस्मरण केलें पाहिजे; त्यांचें उदाहरण डोळ्यांसमोर ठेविलें पाहिजे; व ज्या राष्ट्रांत रानड्यांसारखा पुरुष पैदा झाला, त्यास आपल्या भावी स्थितीविषयीं निराश होण्याची अवश्यकता नाहीं, या भरंवशावर आम्हीं त्यांच्या गुरुमंत्राप्रमाणें चाललें पाहिजे. ”

पुढील आठवड्यांत ( म्हणजे ता० २२ जानेवारी १९०१ ला ) महाराणी व्हिक्टोरिया या, आपल्या ८३ व्या वर्षी ६४ वर्षे सुरळीत राज्य करून परलोकवासी झाल्या. इंग्लंडमधील राजसत्ता ही जरी सार्वभौम व पार्लमेंट यांमध्यें दुभागलेली व नियमित आहे, तरी इलिजाबेथ राणीप्रमाणें महाराणीसाहेबांच्या अंतःकरणांत देशभक्ति पूर्णपणें बिंबलेली असल्यामुळें, त्यांच्या शब्दाला राज्यकारभारांत मान असे. याचे अर्वाचीन महाराष्ट्राच्या परिचयांतलें ताजें उदाहरण म्हटलें म्हणजे, रा० टिळकांना मुदतीअगोदर बंधमुक्त करण्याकरितां त्यांनीं केलेली १८९८ तील मध्यस्थी, हें होय. त्यांचा एकंदर रोंख, आपलें राष्ट्र पक्षाभिमानास पेटून त्याची हानि न हावी, याकडे होता.

महाराणीसाहेबांच्या मागें त्यांचे ज्येष्ठपुत्र हे सातवे एडवर्ड या नांवानें गादीवर बसले. या मंगलसमयाच्या स्मरणार्थ, राष्ट्रीयसभेनें वेळोवेळीं केलेल्या मागणीप्रमाणें मिठावरचा व प्राप्तीवरचा असे दोन कर कमी करण्यांत आले. हा कर दर मणीं रुपये २॥ पडत असे, तो रु० २ झाला; व वार्षिक रु० ५०० च्या

उत्पन्नापासून अधिक उत्पन्नावर कर बसत असे, तर आतां वार्षिक रु० १००० च्या उत्पन्नाहून अधिक उत्पन्नावर कर बसूं लागला. त्यामुळें गोरगरीब व मध्यम स्थितींतील प्रजेचें बरेंच कल्याण झालें. लोकांस जीवनसर्वस्व असें जें लवण व आपदर्थ रक्षिलेलें धन यांचा अधिकांशानें उपभोग घेण्याचा सुयोग आला.

तोंच अर्वाचीन महाराष्ट्रांतील जमीनमहसुलाच्या बाकीसाठीं, सरकारकडे जमीन जप्त होऊन सावकारहस्तें तिच्या स्वत्व-निवृत्तीस प्रतिबंध करणारा १९०१ सालचा ६ वा कायदा ( क्र. १५३ ) पसार झाला. त्याच्या खर्ड्याचें पहिलें वाचन, कौंसिन्लच्या वहिवाटीविरुद्ध, महाबळेश्वरीं मे महिन्यांत अशा रीतीनें झालें कीं, त्यामुळें दप्तरांतील जे कायमचे ठराव होते, त्यांस हरताळ लागला. त्याच बैठकींत, त्या खर्ड्यावर अभिप्राय देण्याकरितां एक निवडक मंडळी नेमण्यांत आली. व्हाइसरॉय-साहेबांच्या कौन्सिलची देखील अशी वहिवाट आहे कीं, पहिल्या बैठकीनंतर अभिप्रायार्थ खर्ड्यांच्या प्रती सभासदांकडे पाठवून, त्यावर त्यांचे अभिप्राय आले कीं, त्या खर्ड्याची हकीकत देण्या-करितां एक निवडक मंडळी नेमावयाची. परंतु प्रस्तुत प्रसंगीं, लोकांस विचार करण्यास सवड देण्यापूर्वींच, खर्ड्यांच्या हकीकतीचा विचार करण्यास निवडक मंडळी सरसावली ! म्हणून लोकपक्षाचे सभासद नामदार मिस्टर फेरोजशहा मेहता, सर भालचंद्र, मेसर्स पारख, कहान व गोखले यांनीं त्या ' घे सुरी व घाल उरीं ' कृत्याचा पूर्ण निषेध केला. त्यांच्या मतें, जोंपर्यंत मिळेल तेवढें कर्ज

१. १८९८ त, अलिबाग येथें कारणपरत्वें रा. सा. गोविंद वासुदेव कानिटकर बी. ए. एल्. एल्. बी. या अनुभवी मुनसफांची गांठ पडली होती.

करून आपल्या जमिनीवर धाड न येईल, तोंपर्यंत रयत आपल्या जिवावरचें संकट शेंपटावर घालवूं पाहील. एवढें मात्र होईल कीं, सावकाराची वर कमान होईल. त्यांच्या शर्ती कडक होतील. त्याचें शीर चढेल. याप्रमाणें प्रस्तुत कायद्यानें, शेतकऱ्यांचा कर्जबाजारीपणा कमी न होतां वाढेल; दुष्काळांत सरकारी वसूल झपाट्यानें हातीं येईल; सुटी व तहकुबी यांना टाळा देऊन, आपली भरपाई करून घेण्याची ही राजनीति शेतकऱ्यांच्या नजरेस येईल; सावकारांसहि साहाय्य होणार नाहीं; साधारण गय करण्याऐवजीं, ते दिवाणी कोर्टाच्या भरीस पडून, डिक्री व विक्री यांनीं आपला कार्यभाग करून घेतील. अतएव, या खर्ड्याचा विचार करण्याकरितां, त्याची तारीख लांबविण्याची सूचना, नामदार मिस्टर मेहता यांनीं कै. न्यायमूर्ति रानडे यांजवळून अगोदर घेतलेल्या सल्लयाच्या[1] जोरावर केली. तिचें पुष्टीकरण करितांना, नामदार मिस्टर गोखले यांनीं अत्यंत जोरदार भाषण केलें. आपल्या बिनतोड कोटिक्रमाच्या अंतीं काकुळतीस येऊन, त्यांनीं गव्हरनरसाहेबांस असें म्हटलें कीं, "आपण लोकानियुक्त सभा-

---

मागील पृष्ठावरून पुढे चालू.

तेव्हां त्यांनीं आपला अनुभव असा सांगितला कीं, कोंकणपट्टींत वसती दाट व दारिद्य अफाट, म्हणून पैसे घेण्याच्या हुकूमनाम्यावरूनहि जमीन विकतां येते. परंतु देशावर तसें नाहीं. तिकडे काळीला आई समजतात. वाटेल तें करतील, परंतु जमीन म्हणून विकावयास धजणार नाहींत.

१. अलाहाबादकर बाबू सी. वाय्. चिंतामणी-प्रकाशित 'नामदार फेरोजशहा मेहता यांचीं भाषणें' ( पृ. ६७२ वें ) पहा.

२ मद्रासकर नटेश अँड कंपनी प्रकाशित 'नामदार गोखले यांचें चरित्र' ( पृ० १२ वें ) पहा.

सदांचा अनादर करूं नये! आपल्या बहुमताची राक्षसी शक्ति राजनिष्ठा संपादन करण्यांत खर्च करावी ! " या हृदयद्रावक भाषणानें सरकारच्या हृदयास पाझर फुटला नाहीं ! कारण सरकारची अशी दृढ समजूत होती कीं, आपल्या कृतीमुळें महाराष्ट्रांतील गरीब झालेल्या शेतकऱ्यांच्या जमिनी भांडवलवाल्यांच्या घशांत पडणार नाहींत. भांडवलवाल्यांच्या मोठ्या प्रमाणावरील जास्त किफायतीची, थोड्या मजुरांची, यांत्रिक तऱ्हेची जमिनीची लागवड ही लहान प्रमाणावरील कमी किफायतीची, फार मजुरांची, चालू शेतकरी मालकांची जमिनीची लागवड ही कांहीं अल्प अनुकूल स्थितींतील जिल्ह्यांखेरीज बाकीच्या देशांतील पुष्कळांचे पुष्कळ हित साधणारी म्हणूनच योग्य नव्हे, तर येथील सध्यांच्या शेतीच्या स्थितीला शोभण्यासारखी आहे। आपला हा सात्त्विकपणा व आपलें हें व्यवहारचातुर्य सुज्ञांस संमत होण्यासारखें आहे; दृष्टीस पडणारे त्याचे परिणाम जरी मनांत भरण्यासारखे नसले, तरी त्यांवरून रयतेचा जो मूर्खपणा व तिची जी दैना यांचा १९ व्या शतकारंभींच्या गव्हर्नरांनीं पूर्ण विचार करून त्यांस उत्तेजनहि दिलें होतें, त्यांपासून तिला वांचविण्याचा आपला कृतसंकल्प व्यक्त होत आहे.

तेव्हां यापुढें कौन्सिलांत हजर राहून, सदर्हू खर्ड्यासंबंधीं जबाबदारी आपणांवर यत्किंचित्‌हि पडूं नये, म्हणून लोकनियुक्त सभासदांनीं तेथून आपला पाय काढिला. हें त्यांचें नीतिधैर्य वस्तुतः अपूर्व, अद्वितीय, भूषणावह व संस्मरणीय होय.

# प्रकरण १२ वें.



## मधलीं दहा वर्षें.

१९०२ मध्यें, नामदार मिस्टर फेरोजशहा मेहता यांनीं वरिष्ठ कायदेकौन्सिलांतील आपली सभासदाची जागा सोडिल्यावर, मुंबईच्या कायदेकौन्सिलांतील लोकनियुक्त सभासदांनीं, तीकरितां, नामदार गोखले यांस निवडून दिलें. मिस्टर मेहता यांनीं वाद-विवादास नवीन रंग आणिल्याबद्दल अँग्लोइंडियनांनीं त्यांस ठपका दिला होता. म्हणूनच त्यांची सर्व हिंदुस्थानभर वाहवा झाली. मिस्टर गोखले यांची मजल तर त्याहूनहि पलीकडे जाऊन, त्यांनीं आपल्या पहिल्या पहिल्या भाषणांत सालीना अंदाजपत्रका-वरील लोकनियुक्त सभासदांच्या टीकेस अगदीं नवें स्वरूप दिलें. कर देणाऱ्यांवर फुकट बोजा, म्हणून सरकारी तिजोरींतील मागील पांच वर्षांच्या एकंदर रु० २२,००,००,००० शिलकेवर त्यांचा कटाक्ष, करभार उतरविण्याविषयींचा त्यांचा कोटिक्रम, देशाच्या भरभराटीविषयींच्या असत्यकल्पनेचें खंडण, देशांत विद्याप्रसारा-( विशेषतः प्राथमिक शिक्षणप्रसारा– ) ची अत्यंत आवश्यकता, इत्यादि विषयांचें सांगोपांग विवेचन पाहून, सर्व हिंदुस्थानचें लक्ष्य त्यांकडे वेधलें. त्यांची अंतर्दृष्टीहि झाली. त्यांस असें कळूं लागलें कीं, १९ व्या शतकांतील पहिली पन्नाशी ही ब्रिटिशसत्तेचा विजय, ब्रिटिशसत्तेचा प्रसार, ब्रिटिशसत्तेचें दृढीकरण यांत जाऊन, दुसरी पन्नाशी ही पाश्चात्त्य कल्पनांप्रमाणें, सुधारलेल्या सरकारचा

राज्यशकट सुरळीत चालविण्याकडे गेली, तर नवीन शतकाच्या मुहूर्तावर लोकांच्या औद्योगिक व शिक्षणविषयक मोठ्या सुधारणेस प्रारंभ होण्याचा रंग आहे. कारण विलायती कापड देशांत अधिकाधिक येऊन, त्यास देशी कापडाबरोबर स्वस्ताईत टक्कर देतां यावी म्हणून देशी मालावरहि अश्रुतपूर्व जकात बसून, देशी उद्योगधंद्यांत मंदता आली आहे; साळी लोक शेतींत पडूं लागले आहेत. आपल्या दारिद्र्याची परमावधि व अन्नाची महर्घता ही सरकारनेंहि मोकळ्या मनानें कबूलें केली असून, अधिक सुधारलेल्या देशांतून सरकार रयतेच्या नैतिक व भौतिक कल्याणाकडे जसें सर्वस्वीं लक्ष्य देतें, तसें आपल्या सरकारास लक्ष्य दिल्यावांचून गत्यंतर नाहीं. गेल्या वीस वर्षांत, दुष्काळ व ग्रंथिक संनिपात हे जमेस न धरले तरी, वार्षिक मृत्युसंख्या एकसारखी वृद्धिंगत होत आहे—यावरून

---

१. नामदार गोखले यांची साक्ष अशी आहे:—

‘No doubt there are here and there signs of an awakening to the dangers of the situation, but the first condition of this awakening producing any appreciable practical results is that the fact of our deep and deepening poverty and of the real exigencies of the economic position should come to be frankly recognized by the Government of this country.’

The Hon. Mr. G. K. Gokhale's Speech on the Financial Statement of the Govt. of India for 1903-04 ( Marh 25, 1903 ), p. 8.

लोकसंख्येपैकीं एकसारख्या वाढत्या प्रमाणांत असलेल्या व्यक्तींस अर्धपोटीं रहावें लागत आहे, असें दिसत आहे; गेल्या दहा वर्षांतील लोकसंख्येची वाढ ही साधारण वाढीहून पुष्कळ कमी झाली आहे. जुन्या प्रांतांत ऐन लागवडीच्या जमिनींची संख्या घटली आहे; व मुख्य पिकांचीहि साधारण स्थिति खालावत आहे; शेतकरी लोकांचा कर्जबाजारीपणा अतोनात वाढला आहे; गेल्या ५ वर्षांत पिकें व जनावरें यांच्यापायीं, ३,००,००,००,००० रु० चें त्यांचें नुकसानें झालें आहे; सरकारच्या चलनी नाण्यासंबंधीं कायद्यानें त्यांच्या रुपयांच्या लहानसहान शिलकेची किंमत अत्यंत उतरली आहे; गेल्या वीसएक वर्षांतील वाढत्या बाजारभावाप्रमाणें, मजुरांची मजुरी मात्र वाढली नाहीं.

१९०३ मधील महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे होळकर सरकारचा राजीनामा ही होय. श्रीमंत महाराज शिवाजीराव होळकर यांनीं शरीराच्या अस्वस्थतेमुळें, निराशावाद अंगिकारून, गेल्या ऑगस्ट महिन्यांत जो राजीनामा हिंदुस्थानसरकारकडे पाठविला होता, तो सेक्रेटरी यांच्या पसंतीनंतर मंजूर झाला. ता० ३१ जॅन्युअरी १९०३ रोजीं सकाळीं एक लहानसा दरबार ‘ एजंट टु-द-गव्हर्नर जनरल ’ यांच्या अध्यक्षतेखालीं भरला. त्यांत ती गोष्ट जाहीर करण्यांत आली. नंतर महाराजांनीं भाषण केलें. त्यांनीं लोकांस असें आश्वासन दिलें कीं, नवीन अमलांत तिजोरी

---

१. सदर्हू नामदारांच्या साक्षींत असा उल्लेख आहे. ‘ Their losses in crops and cattle during the last five years have been estimated at 300 crores of rupees. ’—*Ibid* (p. 8).

आंजपर्यंत जशी भरपूर राहिली होती, तशी राहील, संस्थानांत संस्थानांतलेच कामगार ठेवले जातील; अहिल्याबाईचा धर्मादाय अविच्छिन्न चालू राहील; तरुण राजपुत्रांच्या शिक्षणाविषयीं अत्यंत कळकळ दाखविली जाईल; ब्रिटिश रेसिडेंटच्या अध्यक्षतेखालीं असलेल्या नवीन अमलांत अधिकारी राजनिष्ठेनें वागतील. नंतर, ए. जी. जी. नें महाराजांचा बडेजाव करून असें म्हटलें कीं, " महाराजांचा आजपर्यंत जसा सत्कार होत असे, तसाच पुढें होत राहील. " येणेंप्रमाणें हा खेदकारक समारंभ थोडक्यांत आटोपून, दुपारच्या स्पेशल ट्रेननें महाराज इंदुरापासून ५० मैल दक्षिणेस असलेल्या बढवईस गेले. तेथें नर्मदातटाकीं एकांतवासाच्या आवडत्या हवाशीर बंगल्यांत सालीना रु०, ४,००,००० पेन्शनवर ते राहिले. त्यांच्या मागें त्यांचे १३ वर्षांचे एकुलते एक पुत्र, बाळासाहेब ऊर्फ सवाई तुकोजीराव हे गादीवर बसले, व दिवाण रायबहादुर नानकचंद सी. आय्. ई. यांच्या अध्यक्षतेखालीं चालू ' कौन्सिल ऑफ् रीजन्सी ' हस्तें राज्यकारभार चालला.

पुढील वर्षी रत्नागिरी येथें ' खोतीसभा ' व नाशीक येथें ' भारत-नाट्य-समाज ' यांच्या पहिल्या बैठकी झाल्या. त्याच्या पुढील वर्षी, मुंबई येथें ' भारतमहिलापरिषदे ' चा जन्म ' हिंदी राष्ट्रीय सभे ' च्या उत्संगावर फ्रामजी कावसजी इन्स्टिटयूटमध्यें झाला. तिचें अध्यक्षस्थान कै० न्यायमूर्ति रानडे यांच्या सुशिक्षित पत्नी श्रीमती रमाबाई रानडे यांनीं मंडित केलें. त्यांनीं अध्यक्ष या नात्यानें भिन्नभिन्न जातींच्या ७००|८०० स्त्रियांच्या श्रोतृसमाजास उद्देशून अत्यंत मधुरस्वरानें मराठींत भाषण केलें. त्या म्हणाल्या कीं, " मी आज जवळजवळ चार वर्षांनंतर आप-

णांसमोर आलें आहें. त्या वेळच्या व आजच्या माझ्या स्थितींत जमीनअस्मानाचें अंतर पडलें आहे. तीच ही मुंबई, तेंच हें स्थान व त्याच ह्या आपण असूनहि, मला हें सर्व नवीन वाटत आहे. ज्यांच्या प्रेमल व पवित्र सहवासांत माझीं २७ वर्षें गेलीं, त्यांचें वियोगजन्य दुःख आपणांसमोर प्रदर्शित करणें हें येथें मला उचित नाहीं. दैवानें जी स्थिति मला प्राप्त झाली आहे, तींत समाधान मानून, तेंच चरणकमल मनांत वागवून, विवेक करून, आपलें कर्तव्यकर्म करण्यांत तत्पर असावें, हेंच मला योग्य आहे. परंतु अत्यंत खेदाची गोष्ट ही आहे कीं, मला तेवढें सामर्थ्य नाहीं. मला नेहमीं उपदेश करीत असत कीं, 'सुखदुःख हे शरीराचे भोग व मनाचे विकार आहेत. त्यांना महत्त्व न देतां प्रत्येकानें आपापलें कर्तव्यकर्म बजाविलें, म्हणजेच शरीराचें सार्थक होतें.' व या उपदेशाप्रमाणें त्यांचें वर्तन होतें. त्यांच्या रात्रीच्या रात्री झोंपेशिवाय जात असत. शरीराला त्रास होत असतांहि, जर आपलें कर्तव्यकर्म त्यांस करितां आलें, तर त्या त्रासाचा त्यांस विसर पडत असे. अशा सत्संगतीचा लाभ होऊनहि, त्या दैवी गुणाचा अल्पांशहि माझ्यांत उतरला नाहीं, याचें मला राहून राहून आश्चर्य वाटतें. नाहींतर, जें महत्कार्य करण्यांत मीं आज १८ वर्षें तनमनधन लावून अविश्रांत श्रम केले, तेंच महत्कार्य करण्याचा आजचा प्रसंग असूनहि, आपल्या आमंत्रणाची गरज मला लागती काय ? किंवा डॉ० भांडारकर यांस मला आग्रह करावा लागता काय ? कसेंही असो, मी आज आपणांसमोर उभी आहें. मी विद्वान् नव्हे किंवा या परिषदेचा अध्यक्ष होण्यास योग्य नव्हे. देवांच्या चरणकमलांला पुष्पमाला अर्पण करितात. ती निर्माल्य

झाली, तरी तीसंबंधीं आपल्या ठायीं एक प्रकारचा पूज्यभाव असतो. त्या दृष्टीनें मला हा मोठा मान मिळाला आहे, तो विशेष भूषणप्रद समजून मी आपली मोठी आभारी आहें. " अशा सुंदर व समयोचित प्रस्तावनेनंतर, ' हिंदी सामाजिक परिषदें ' तून ' भारत-महिला-परिषदे ' ची परिणति कशी झाली, तें रमाबाईंनीं प्रतिपादन केलें. ही स्वतंत्र संस्था, स्वाभाविक शालीनतेस अनुसरून युरोप व अमेरिका येथील स्त्रियांच्या सभांप्रमाणें रुग्णालय, कन्या-शाळा, अनाथबालिकाश्रम, कारागृह, वेड्यांचें इस्पितळ इत्यादि वेळोवेळीं पाहून, सध्यांच्या सुशिक्षित स्त्रियांनी त्यांतील व्यंगें दूर करण्यास झटण्याच्या हेतूनें काढिलेली होती.

' भारत-महिला-परिषदे ' च्या हेतूप्रमाणें, नामदार गोखले यांनीं, ता० १२ जून १९०५ रोजीं, पुणें येथील ' फर्ग्युसन कॉलेजा ' जवळ, रु० १,००,००० खर्चून, 'भारत-सेवक-मंडळी' स्थापिली. ' केसरी ' पत्राकरितां, रा० टिळकांनीं मराठी ' लिनोटाइप ' यंत्र शोधिलें. पण त्याचा खप होण्याचा हवा तितका संभव नसल्या-मुळें, विलायतच्या कारखानदारांनीं तें तयार करण्याची छाती केली नाहीं. या वर्षांतील अत्यंत महत्त्वाची गोष्ट म्हटली म्हणजे युवराजांचें युवराज्ञीसह या देशीं आगमन ही होय. आपल्या पूज्य पित्याप्रमाणें, त्यांनीं आपल्या भावी प्रजेवरील प्रेम अशा रीतीनें उत्कृष्ट प्रकट केलें. या गोष्टीनंतरची गोष्ट, बनारस येथील ' हिंदी राष्ट्रीय सभे ' च्या अध्यक्षाचा मान नामदार गोखले यांस प्राप्त

१. ' सुंदरीसुबोध ' या गुजराथी मासिक पुस्तकां ( वर्ष २ रें, अंक ५ वा ) त व ' सरस्वती ' या हिंदी मासिक पुस्तकां ( १९०५ चा १ ला अंक ) त सदर्हू भाषणाचा असा गौरव झालेला आहे.

झाला ही होय. त्यांनीं अल्पावधींत जुळविलेलें भाषण असें होतें कीं, लॉर्ड कर्झन ( हिंदुस्थानचे तत्कालीन व्हाइसरॉय ) हे औरंगजेब बादशहाप्रमाणें असून, बंगालच्या फाळणीमुळें बंगालनें विलायती मालावर घातलेला बहिष्कार सयुक्तिक आहे; स्वदेशी माल वापरणें हें अत्यंत हितावह अतएव अवश्य आहे. राष्ट्रीय सभेच्या हेतूंचें विवरण करून, अधिकारिवर्गाच्या विरोधाचें आविष्करण करून, कांहीं सुधारणा करणें इष्ट आहे; नवे स्टेटसेक्रेटरी लॉर्ड मोर्ले ( ' ग्लॅडस्टन-चरित्र'कार ) यांविषयीं उल्लेख करून, हिंदुस्थानच्या भावी स्थितीविषयीं न्यायमूर्ति रानडे यांचें अवतरण दिलें आहे. सारांश, नामदार गोखले यांनीं आपली कामगिरी इतकी उत्कृष्ट रीतीनें बजाविली कीं, राष्ट्रीयसभा ही त्यांवर खूश होऊन,तिनें त्यांस आपलें प्रतिनिधि म्हणून विलायतेंतील नवीन पार्लमेंटमध्यें हिंदुस्थानाविषयीं लोकमत जागृत करण्याकरितां पाठविलें.

पुढील वर्षीं, ' मुंबई इलाख्यांतील कोर्ट-ऑफ्-वार्डस् अॅक्ट ' पास झाला. त्यामुळें, अज्ञान व नालायक अशा वारसांच्या इस्टेटी कलेक्टरांच्या पूर्ण देखरेखीखालीं आल्या. त्यांत, सरकारनें श्रीमंतलोकांस अजाण समजून आपल्या पोळीवर तूप ओढिलें, असा सर फेरोजशहा मेहता यांनीं पक्ष धरून, प्रतिपक्षी डॉ० भांडारकर यांसारख्या संस्कृतभाषाभिज्ञास इंग्रजी राज्य म्हणजे केवळ रामराज्य वाटत आहे, तो त्यांचा भ्रम आहे; असें स्पष्टपणें कौन्सिलांत बोलून दाखविलें. या वाग्युद्धांत, विद्वत्ता व व्यवहारचातुर्य याच्या बळाबळाची परीक्षा झाली.

या वर्षाच्या कलकत्त्यांतील ' राष्ट्रीय सभे ' च्या बैठकींत, नामदार गोखले यांनीं विलायतेंतील आपली कामगिरी कथन केली.

त्यांनीं नवीन स्टेटसेक्रेटरींची भेट घेऊन, नवीन पार्लमेंटमध्यें उदारमतवाद्यांची सरशी होईल, असा आशाजनक कथाभाग निवेदन केला. त्यांच्या खटपटीमुळें, बंगाल्यांतील सभा, राष्ट्रीय गीतें, समारंभ यांवरील बंदी नाहींशी झाली, हांकलून दिलेल्या विद्यार्थ्यांस सरकारी शाळांत पुन्हा घेण्याविषयीं हुकूम सुटले, असें म्हणतात. येणेंप्रमाणें,अर्वाचीन महाराष्ट्राची वंगबंधूंविषयींची सहानुभूति कृतीत उतरली.

याच ' राष्ट्रीय सभे ' च्या बैठकींत, नामदार दादाभाई नौरोजी यांच्या अध्यक्षतेखालीं ठरल्याप्रमाणें राष्ट्रीयशिक्षणाचा प्रचार पाडण्याकरितां, रा० टिळकांनीं येथें ' महाराष्ट्रविद्याप्रसारक मंडळी ' व तिच्या आश्रयाखालीं ' समर्थविद्यालय ' काढिलें. व १९०७ च्या नागपुरांतील ' राष्ट्रीय सभे ' च्या बैठकींत, राष्ट्रीय पक्षाची सरशी होईल असें पाहून, नामदार मेहता, गोखले, वाच्छा इत्यादि नेमस्त मंडळीनें तिची बैठक आयत्या वेळीं सुरत येथें नेण्याचें ठरवून, डॉ० राशबिहारी घोस एम्. ए. डी. एल्. यांस अध्यक्ष निवडिलें. ते आपणांस पसंत नाहींत; कारण, गेल्या राष्ट्रीय सभेंतील राष्ट्रीयशिक्षणादि चार ठराव ते पाळणार नाहींत; अशी राष्ट्रीयपक्षाचे पुढारी रा० टिळक यांनीं हरकत घेतली. तेव्हां स्वागतकमिटी त्यांवर तुटून पडली. परंतु त्या दुःसह वाक्शरांनीं त्यांनीं आपल्या मनाची समता ढळूं दिली नाहीं. खुर्च्या, टेबलें, जोडे अंगावर आले, तरी ते आपल्या आसनावरून हलले नाहींत. तेव्हां, मेथादि मंडळीनें तेथून पाय काढिला.[1] अशी दुफळी ' राष्ट्रीय सभें ' त झाली.

---

१. रा० देवस्थळी कृत ' सुरत–कलह–शतक ' ( आर्या ७०–७५ व्या ) हें लघुकाव्य पहा.

रा० टिळकांनीं राष्ट्रीय सभेंत आपल्या पक्षाच्या रक्षणार्थ जशी कामगिरी केली, तशी कनिष्ठवर्गाच्या उन्नत्यर्थ मद्यपाननिषेधक चळवळ सुरू केली. तिचें प्रतिबिंब रा० काणेकृत ' त्रिमूर्ति ' या सुंदर नाटकांत व दातेकृत ' मद्यपाननिषेधक ' पद्यें व राक्षेकृत ' दारूचीं पदें ' यांत दिसूं लागलें. एकट्या पुणें जिल्ह्यांत, एका वर्षांत व्रतस्थ झालेल्या लोकांत ३५०० गॅलन दारूचा खप बंद पडून, त्यांनीं जवळजवळ रु० २,००,००० कसे मिळविले याविषयींच्या तांबड्या रंगाच्या शाईतील ठळक अक्षरांच्या जाहिराती शहरांतून गल्लोगल्लीं व गांवड्यांतून चवाठ्यावर फडकूं लागल्या !

अशा तऱ्हेची परोपरीची स्वदेशसेवा सुमारें २८ वर्षे करीत असतां, रा० टिळक यांवर तिसरें संकट आलें. ' देशाचें दुर्दैव ' हा ता० १२ मे १९०८ च्या ' केसरीं ' तील अग्रलेख राजद्रोहात्मक ठरून, ता. २२ जुलै १९०८ ला मुंबई हायकोर्टानें त्यांस ६ वर्षे काळें पाणी व रु० १००० दंड अशी शिक्षा केली. या खटल्यांत, आरोपीनें स्वतः सारखे सहा दिवस चालविलेल्या उत्तरपक्षास सरकारी बॅरिस्टरांनीं चर्वितचर्वण, भाकडकथा व बुडत्याचा पाय चिखलांत—नव्हे बुडत्यानें गवताच्या काडीचा आश्रय करण्यासारखें--लेखिलें; व १८९७ त ज्यांनीं आरोपीचें वकीलपत्र घेतलें होतें, त्या न्यायमूर्ति झालेल्या दावरांनीं आरोपीच्या वादग्रस्त लेखावरून त्यास बुद्धिभ्रंश झालेला आहे, असें

---

१ रा० टिळकांचे शिष्य प्रो० परांजपे, एम्. ए. ( भगवानदास संस्कृत-स्कॉलर ) ' काळ ' या वजनदार साप्ताहिकाचे कर्ते त्यांस ह्याच सुमारास, ह्याच गुन्ह्याबद्दल १।। वर्षांची सक्तमजुरीची शिक्षा झाली.

म्हटलें. तेव्हां, रा० टिळकांचा उत्तरपक्ष कितपत सबळ किंवा दुर्बळ होता तें पाहिलें पाहिजे. त्यांचें म्हणणें असें होतें कीं, 'पूर्वपक्षानें आपल्या लेखांतील कोणत्या वाक्यांवर आक्षेप घेतला होता, तें आपणांस कळविलें नव्हतें; परंतु विलायतेस गेलेल्या रूटरच्या तारेवरून, आपणांस त्यांचा कांहींसा सुगावा लागला. सरकारच्या प्रतिबंधक नीतीवर टीका लिहितांना, आपण जी भाषा वापरली होती, ती रशियन सरकारच्या जुलमाविषयीं लिहितांना १९०६ त 'पॉयोनियर' या अलाहाबादच्या वजनदार ॲंग्लो-इंडियन दैनिक पत्रानें वापरलेल्या भाषेहून अधिक सौम्य होती. बॉंबचे अत्याचार हे 'राष्ट्रीय सभे' च्या चर्चेचे परिणाम नसून, अधिकारिवर्गाच्या उद्दामपणाचे प्रतिध्वनि होत; व अधिकारिवर्ग म्हणजे सरकार नव्हे. 'डी—सेंट्रलिझेशन ( कामाच्या फाळणीचे ) कमिशन, समोर पूर्वीं साक्ष दिल्याप्रमाणें, आपण तत्काळ स्वराज्य मागत नाहीं; व स्वराज्यें मागणें हा राजद्रोह नव्हे, असा कलकत्ता हायकोर्टाचा ठराव आहे.'

---

१ याच नांवाचें एक इंग्रजी पाक्षिक बाबू बिपिनचंद्रपाल हे लंडनमध्यें चालवीत. त्यांतील 'बॉंबमीमांसा' ह्या लेखाचें परीक्षण सदहू पत्रकर्त्याचे हिंदुस्थानांतील सोलएजंट जी 'वर्तमान एजन्सी' तिचे व्यवस्थापक व 'राष्ट्रमत' या मराठी दैनिक पत्राचे चालक रा० गणेश बळवंत मोडक यांनीं ता० १० जुलै १९०९ च्या आपल्या पत्राच्या अंकांत केल्यामुळें, त्यांवर राजद्रोहाचा गुन्हा शाबीत होऊन, त्यांस एक महिन्याची साधी कैद झाली. व नवीन प्रेसॲक्ट प्रमाणें, 'काळ' 'राष्ट्रमत' 'हिंदुपंच' इ० पत्रें व त्यांचे छापखाने बंद झाले. ( १९१० ). तसेंच, रा० केशव नारायण दामले ( संन्यासी ) यांनीं 'युद्धांत जय मिळविल्याशिवाय स्वराज्यप्राप्ति नाहीं' असें 'एकश्लोकीगीते' सारख्या तत्त्वविवेचक गीतेंतील एका श्लोकावरील टीकेच्या आपल्या पुस्तकांत लिहिल्या-बद्दल त्यांस शिक्षा झाली.

या खटल्याचे वेळीं हायकोर्टाभोंवतीं मोठा बंदोबस्त ठेविला होता. शेवटल्या दिवशीं रात्रीं, बराच वेळ फैसला वाचून दाखविण्यांत गेल्यानंतर, आरोपीस तेव्हांच्या तेव्हांच नेण्यांत आलें. तेथून त्यांस एडनला नेणार अशी अफवा उठून, शेवटीं त्यांस मंडालेस नेण्यांत आलें. दर्म्यान्, शिक्षेच्या दुसऱ्या दिवशीं, गिरण्यांतील ज्या मजुरांस व गोरगरिबांस रा० टिळकांनीं उघड्या मैदानांत मद्यपाननिषेधक हितोपदेश केला होता, त्यांत चळवळ उडाली. त्यांनीं सहा दिवस सारखा संप केला. जे कोणी त्यांच्या आड येत, त्यांवर ते तुटून पडत. अशा रीतीनें सर्व अफाट मुंबई शहरभर दंगे झाले. तो टिळकांवरील खटला व हे मजुरांचे दंगे यांत कार्यकारणभाव नाहीं, असें ‘ लंडन टाइम्स्, ’ ‘ डेली न्यूज्, ’ ‘ मॉर्निंग लीडर ’ इत्यादि इंग्लंडांतील वजनदार दैनिकपत्रें म्हणूं लागलीं. पण ‘ रिव्ह्यू ऑफ् रिव्ह्यूज् ’ सारख्या इंग्लंडांतील महत्त्वाच्या मासिक-पुस्तकांनीं वास्तविक प्रकार मोठ्या उदार बुद्धीनें प्रकट करून, राष्ट्रीयपक्षानें साधारण जनतेवर सर्व हिंदुस्थानांत अशी कोठेंहि छाप बसविली नाहीं, अशी त्या पक्षाच्या नेतृशिरोमणीची प्रशंसा केली.

मुंबईच्या दंग्याचा शेक जत, सोलापूर, विजापूर येथपर्यंत पोंचून, १९०८–०९ त, तंट्या भिल्लाप्रमाणें, नाना मसाल हा ‘ स्वदेशी ’ चा भक्त पुंडाई करूं लागला. ‘ दिव्याखालीं अंधेर ’ कसा असतो, हें त्यानें पोलिसांस दाखविलें. शेवटीं त्यांच्याच तावडींत सांपडून, त्यास रीतसर शिक्षा झाली.

मध्यंतरीं मलबारी शेट यांनीं केलेली ‘ सेवासदना ’ ची स्थापना ( १९०८ ), ‘ मिसो-टाइप ’ यंत्राची युक्ति ( १९०९ ), बडोदें येथील ‘ साहित्य–संमेलन ’ ( १९०९ ) अशा भिन्न

भिन्न प्रकारच्या गोष्टी घडून, त्या सालींच नवीन ' हिंदी कायदे-कौन्सिलाचा कायदा ' होऊन, राजदरबारांत प्रजापक्षास अधिक मान मिळाला. मात्र, विद्वान् कौन्सिलर निवडून येण्यास हरकत होऊन ज्यांची संख्या कमी, त्या मुसलमानांच्या पूर्वगौरवास्तव त्यांस निवडणुकीचा विशेष हक्क प्राप्त झाला. त्याअन्वयें, राष्ट्रीय पक्षाचा एक प्रमुख गृहस्थ रा० नरसिंह चिंतामण केळकर बी. ए. एल्एल्. बी. ( ' केसरी ' व ' मराठा ' यांचे संपादक ) यांस मुंबईच्या कायदे-कौन्सिलांत सभासद होण्याची अपात्रता, कलेक्टर-कमिशनरांनीं मंजुरी दिल्यावर, सरकारनें ऐन-वेळीं ( म्हणजे मतदारांनीं मतें देण्यास सुरवात केल्यावर ) मात्र प्रसिद्ध केली. त्यावर त्यांनीं सरकारकडे अशी यादी ता० ७ डिसेंबर १९०९ ला पाठविली कीं, असा हुकूम सोडणें हें आपल्या व आपल्याप्रमाणें मतदारांच्या संबंधानें अत्यंत अन्यायाचें आहे. शिवाय, असा ठराव काढण्यासारखे आपणांमध्यें काय दोष आहेत, त्यांबद्दल, जरूर असल्यास, सरकारनें खुलासा करावा. पण, त्यांत त्यांस यश आलें नाहीं. सरकारकडून त्यांस असें उत्तर ता० १० डिसेंबर १९०९ला आलें कीं,सरकारनें या बाबतींत जो ठराव केला आहे, तो पूर्णविचारान्तीं केलेला असून, तो परत घेतां येत नाहीं. याबद्दल, नामदार गव्हर्नरसाहेबांस फार दिलगिरी वाटते.

ता० २१ डिसेंबर १९०९ रोजीं रात्रीं, नाशिकचे लोकप्रिय कलेक्टर मिस्टर जॅक्सन, आय्. सी. एस्. , हे दुसऱ्या जिल्ह्यांत बदलून जाणार, म्हणून, त्यांच्या सन्मानार्थ, ' विजयानंद ' नाटक-गृहांत किर्लोस्कर संगीत मंडळीचा ' शारदा ' नाटकाचा प्रयोग कर-ण्याचें ठरलें होतें,त्याप्रमाणें साहेबमजकुरांची स्वारी आपल्या मडमेसह

तो खेळ पाहण्यास येतांच, कोणी अनंत लक्ष्मण कान्हेरे (मोंगलाईतील औरंगाबाद येथील २३ वर्षांचा तरुण ) यानें ब्रौनिंग पिस्तुल त्यांवर झाडून, त्यांचा प्राण घेतला ! व कोटाच्या आंत ठेविलेल्या अशाच दुसऱ्या पिस्तुलानें अगर विषारी पेढ्यानें तो आत्महत्या करून घेणार होता. इतक्यांत, साहेबांबरोबर असलेले रा० खोपकर ( हुजूर डेप्युटी कलेक्टर ) यांनीं त्यास धरिलें. या खुनाचें अप्रत्यक्ष कारण रा० कृष्णाजी प्रभाकर खाडिलकर बी. ए., ' केसरी ' चे संपादक, यांनीं लिहिलेल्या ' कीचकवध ' या औपरोधिक नाटकाचे प्रयोग, अशी ' टाइम्स ऑफ् इंडिया ' पत्रकारांची मनोदेवता त्यांस सांगते. त्याचें प्रत्यक्ष कारण असें समजतें कीं, ता० १८ मार्च १९०८ ला, नाशिक येथें रा० गणेश दामोदर सावरकर यांनीं प्रसिद्ध केलेली ' लघुअभिनवभारतमाला ' या स्फुटकाव्यांतील राजद्रोहावरून, सदहू जॅक्सन साहेबांनीं काळे पाण्याची शिक्षा त्यांस केली होती; तिचा सूड उगविण्याकरितां, त्यांचे बंधु रा० विनायक दामोदर सावरकर, मिस्टर श्यामजी कृष्ण वर्मा एम्. ए. ( ऑक्सन ) , लंडन येथील ' इंडियन सोशियॉलजिस्ट ' ( हिंदी समाजशास्त्रवेत्ता ) चे संपादक यांचे स्कॉलर ( आश्रित ) हे बॅरिस्टरीच्या अभ्यासाकरितां विलायतेंत राहत असून, त्यांनीं तेथून व्यूह रचिला.

तो सरकारनें युक्तिप्रयुक्तींनें फोडिला. सरकारी पेन्शनर म्हणून एक पोलिसमध्यें परदेशी अंमलदार होते. ते नाशिक येथील सार्वजानिक गणपतीसमोरील ' मित्रमेळ्या ' चे सभासद दोन वर्षें होते. ते सरकारचे चित्रगुप्त म्हणून नव्हते, तर मनोभावानें होते. परंतु, जेव्हां ' मित्रमेळा ' हा ' अभिनव भारत ' या नांवाखालीं राजद्रो-

हाचीं भयंकर तत्त्वें प्रचलित करून, तशी कृति करून दाखवूं लागला, तेव्हां सदर्हू राजनिष्ठ वृद्ध सेवकास त्यांतून आपलें अंग काढून घ्यावें असें सहज वाटून, त्यानें त्याप्रमाणें आपल्या सभासदत्वाचा राजीनामा दिला. पुढें, जॅक्सनसाहेबांचा खून झाल्यावर, गुन्हेगार कान्हेरे यांचे साथीदारांस चतुर्भुज करण्यांत आलें. त्यांजवळून असें कळलें कीं, रा० विनायक दामोदर सावरकर, 'मॅझिनी-चरित्रा ' चे भाषांतरकार, यांनीं नाशिक येथें स्वदेशास पारतंत्र्य-शृंखलेंतून मुक्त करण्याच्या हेतूनें, मॅझिनीप्रमाणें ठिकठिकाणीं कृष्णकारस्थानी मंडळ्या स्थापण्याच्या विचारानें, पराक्रम व ज्ञान-प्रसार यांच्या जोरावर, करामत करून दाखविण्याची हिंमत बांधिली. त्यांनीं नाशिक येथें १९०४ त ' मित्रमेळ्या ' ची प्राण-प्रतिष्ठा केली होती. त्याच्या शाखा इगतपुरी, औरंगाबाद, मुंबई व लंडन येथें पसरल्या. त्यांत १७ पासून ४८ वयांचे ३७ ब्राह्मण असून, त्यांपैकीं ६ पदवीधर, एम्. ए. व १ एलएल्. बी. असे होते. १९०६ सालीं, सदर्हू सावरकर हे कायद्याच्या अभ्यासा-करितां विलायतेस गेले असतां, त्यापूर्वीं हिंदुस्थानांत त्यांनीं जीं भाषणें केलीं होतीं व त्यानंतर राष्ट्रीयमतच नव्हे तर अराजकपक्ष-प्रतिपादनार्थ जी चळवळ त्यांनीं लंडनांत केली, त्याची चौकशी ' पळून गेलेल्या गुन्हेगारांच्या कायद्या ' अन्वयें होत नाहीं; जो गुन्हा विलायतेंत घडला, त्याची चौकशी विलायतेंतील कायद्या-प्रमाणें झाली पाहिजे; आपणास आपल्या तर्फेचे साक्षीदार विलाय-तेंतून हिंदुस्थानांत नेतां येणार नाहींत, सबब, आपणास चौकशी-करितां हिंदुस्थानांत पाठविणें हें अन्यायाचें कृत्य असून, आपणास वाजवीपेक्षां जास्त कडक शासन केल्यासारखें होईल. या हरकतीस

वाटाण्याच्या अक्षता मिळून, ता० १३ मार्च १९१० ला दोघां हिंदी गुप्त पोलिसांच्या मदतीनें पकडलेल्या सावरकरांस ' पळून गेलेल्या गुन्हेगारांच्या कायद्या ' अन्वयें हिंदुस्थानांत पाठविण्यांत यावें असा लंडन येथील ' किंग्स बेंच ' या कोर्टानें ठराव केला. त्यावर अपील व वेगळा अर्ज फुकट गेला. तेव्हां, ' मोरिया ' या आगबोटीनें पॉवरसाहेब व बोटीचे स्टशुअर्ड यांच्या अटकेंतून हिंदुस्थानांत येत असतां, वाटेंत मार्सेल या फ्रेंच बंदरांत बोट येतांच लघवीच्या निमित्तानें पोर्टहोल ( तोफ मारण्याचें भोंक ) मधून समुद्रांत उडी टाकून, सावरकरांनीं पोबारा ठोकिला. धक्क्यापर्यंत पोहत जाऊन, ते तेथील फ्रेंच पोलिसास म्हणाले कीं, " फ्रेंच सरकारनें माझें रक्षण करावें म्हणून, मला आपल्या मॅजिस्ट्रेटसाहेबांकडे न्या. " इतक्यांत, दोघा हिंदी पोलिसांनीं त्यांस पकडिलें. एकानें त्यांची तंगडी धरिली; दुसऱ्यानें त्यांच्या गळ्यास हात घातला. अशा रीतीनें त्यांस पुन्हा पकडून, त्यांनीं त्यांस बोटीवर नेलें. फ्रेंच मॅजिस्ट्रेटानें सावरकरांस असें कळविलें कीं, ' तुम्ही आमचें सरकार व तुमचें सरकार या दोहोंकडे दाद मागा. परंतु, मुंबईस पाय ठेवितांच, त्यांस न्यायासनासमोर उभें करण्याची कडेकोट तयारी जारीनें चालू झाली. हायकोर्टासारख्या वरिष्ठ कोर्टास राष्ट्राराष्ट्रांच्या झगड्याशीं कांहीं कर्तव्य नसल्यामुळें, सावरकरांस मूग गिळून ' आलेल्या भोगास सादर ' व्हावें लागलें.

' नाशिकच्या कटा ' चें येणेंप्रमाणें, समुन्मूलन चालू असतां, १९१० च्या जूनच्या आरंभीं, १९०८ च्या बे-कायदेशीर अत्याचारांच्या स्वरूपाच्या नवीन प्रबंधांतील फौजदारी कायद्याच्या दुरुस्तीच्या कायद्याअन्वयें, ' बे-कायदा समित्या—सभा ' वगैरे

बंद करणाऱ्या १६ व्या कलमाखालीं, हिंदुस्थानसरकारनें स्वतः घेऊन ठेविलेल्या अधिकाराच्या जोरावर, ता० १० जून १९१० ला सिमल्याहून निघालेल्या हिंदुस्थानसरकारच्या आज्ञापत्रिके-( गॅझेट ) च्या जादा अंकांतून, तळेगांव ( दाभाडे ) येथील ' समर्थविद्यालय ' ही संस्था गैरकायदेशीर आहे, असें जाहीर करण्यांत आलें. त्यांत, हें कारण सांगण्यांत आलें होतें कीं, ' समर्थ-विद्यालया ' चा हेतु कायदेशीर सुव्यवस्था राखण्याच्या कामीं अडथळा करण्याचा असून, सार्वजनिक शांततेस हें विद्यालय विघातक आहे. ' या कारणाच्या सत्यासत्यतेवर सदहू ठरावाची न्याय्यान्याय्यता अवलंबून आहे. ' महाराष्ट्रविद्याप्रसारक मंडळा ' च्या किंवा ' समर्थविद्यालया ' च्या हस्तपत्रकांतील शब्दांतून, सदहू ठरावाचें कारण कसें सप्रमाण सिद्ध करतां आलें, हा एक महत्त्वाचा प्रश्न होता. त्याचें एक उत्तर असें कीं, सदहू हस्तपत्रका-वरूनच रु० ७५,००० वर गेलेल्या फंडाचे ' केसरी ' त प्रसिद्ध झालेले हजारों वर्गणीदार सर्व मतांचे, सर्व दर्ज्यांचे, सर्व जातींचे होते. दुसरें असें कीं, सदहू ' विद्यालय ' स्थापन झाल्या-पासूनच्या ३।४ वर्षांतील धामधुमींत त्यांतील एकही विद्यार्थी सांपडून शिक्षेस पात्र झाला नव्हता. तिसरें असें कीं, आपल्या अनेक छाप्यांत पोलिसांस ' समर्थविद्यालयां ' त नांव ठेवण्या-सारखें कांहीं एक आढळलें नव्हतें. चौथें असें कीं, प्रो० विष्णु गोविंद विजापूरकर-एम्. ए. ( भाऊ दाजी संस्कृत प्राइझमन, ' ग्रंथ-माला ' व ' विश्ववृत्त ' यांचे संपादक व ' समर्थविद्यालया ' चे उत्पादक ) यांनीं गव्हर्नरसाहेबांची भेट घेऊन, सदहू संस्थे-विषयींचा सरकारचा संशय दूर करण्याचा केलेला उपक्रम, मध्यंतरीं

उपस्थित झालेल्या ‘ विश्ववृत्ता ’ वरील राजद्रोहाच्या खटल्यामुळें तितकाच राहिला होता; तो त्यांच्या जागीं नागपुरांतील ४०० रु. दर-महाच्या निमसरकारी हेडमास्तरीस तिलांजली देऊन आलेले रा० जनार्दन विनायक ओक, एम्. ए. ( युनिव्हर्सिटी स्कॉलर ), यांनीं १९०९ त पूर्ण केला होता. ‘ विद्यालयां ’ त राजद्रोही शिक्षण दिलें जात नाहीं, अशी अगोदर खातरजमा झाल्यावर, त्यांना गव्हर्नर साहेबांनीं भेटीस बोलाविलें होतें. इतकें करूनहि, शेवटीं जें व्हावयाचें, तेंच झालें. त्या शेवटल्या ठरावावर दाद मागण्याकरितां, रा० ओक यांनीं गव्हर्नरसाहेबांस तार केली. तिला उलट उत्तर असें आलें कीं, ‘ आपण आपलें म्हणणें आमचे ज्युडिशल सेक्रेटरी यांस लिहून कळविणें. ’ त्याप्रमाणें, रा० ओक यांनीं एक कलमवार अर्ज त्यांकडे रवाना केला.

‘ समर्थविद्यालया ’ चें चालक जें ‘ महाराष्ट्र-विद्याप्रसारक-मंडळ, ’ त्यांत रा० टिळक हे राष्ट्रीय पक्षाचे पुढारी असल्यामुळें, तें बंद झालें. परंतु, नेमस्त पक्षाचे पुढारी जे नामदार गोखले त्यांच्या खटपटीनें, ‘ रानडे–औद्योगिक धंदेशिक्षणसंस्था[1] ’ स्थापन झाली ( १९११ ). ता० ६ मे १९१० ला विलायतेंत आपल्या ६७ वे वर्षी परलोकवासी झालेले शांतताप्रिय सातवे एडवर्ड बादशहा यांच्या मुंबईटौनहॉलमधील स्मारकसभेस मुंबईच्या ‘ टाइम्स ’ पत्रां-तून नामदार रावबहादूर रंगराव नरसिंह मुधोळकर, बी. ए. एल्

---

१ हिच्या ३ शाखा आहेतः—( १ ) औद्योगिक रसायनशास्त्राची प्रयोग-शाला; ( २ ) व्यापारी वस्तूंविषयीं सरकारी व स्थानिक माहिती गोळा करणारी संस्था, पुस्तकालय व पदार्थसंग्रहालय; व ( ३ ) तयार झालेल्या उमेदवारांस शिष्यवृत्ति देऊन, परदेशीं पाठविण्याकरितां निधि.

एल्, बी. यांनीं सुचविल्याप्रमाणें, कै. न्यायमूर्ति रानडे यांचा प्रथमप्रतिपादित विषय होता. तेव्हां, त्यांच्या स्मरणार्थ, त्यांचे सच्छिष्य नामदार गोखले यांनीं वर्गणीनें जमविलेले रु० ८०,००० व त्यांवरील तेथपर्यंतचें व्याज अदमासें रु० २०,००० हें पुणें येथें सदहू संस्था काढण्याकडे लावण्यांत आलें. त्यांपैकीं रु० २०,००० इमारतीकडे व रु० १०,००० यंत्रसामग्रीच्या पहिल्या हप्त्याकडे लागले असून, बाकीचे शिष्यवृत्तींकरितां व्याजीं लावण्यांत आले. मिरज संस्थानचे अधिपति गंगाधरराव पटवर्धन यांनीं आपल्या कै० मातुः-श्रीच्या स्मरणार्थ काढून ठेविलेल्या रु० ३०,००० च्या व्याजांतून सदहू संस्थेंतील शिष्यांस वेतन देण्याचें योजिलें. १९०४ सालींच, मुंबईसरकारनें वरील चळवळीस आपली संमति प्रदर्शित करून, प्रस्तुत गृहप्रवेशप्रसंगीं, नामदार सर जॉर्ज क्लार्क या गव्हर्नरसाहेबांनीं न्यायमूर्ति रानडे यांचे ' हिंदी अर्थशास्त्रावरील निबंध ' व विशे-षतः १८९३ तील ' औद्योगिक परिषदे ' समोरील त्यांचें व्याख्यान यांचा आपणांस तद्विषयक भाषणांत कसा उपयोग झाला तें सांगून, अशा सद्धेतूस्तव पैसे खर्च करण्याकरितां लोकल-बोर्डांनीं मंजुरी मागितली, तर सरकार तिकडे कृपादृष्टि दाखवील असें म्हटलें. जातां जातां, प्रस्तुतच्या बेताबाताच्या आरंभार्थ नाम-दार गोखले यांनीं जे अविश्रांत श्रम केले होते, त्यांबद्दल त्यांची वाहवा करून गव्हर्नरसाहेबांनीं अशी आशा प्रकट केली कीं, ' ज्या महागुरूचें नांव या संस्थेनें धारण केलें आहे, त्याच्या तंत्रानें ती चालून, खरा देशभक्त कसा असतो व त्याच्या हातून काय घडतें, एवढेंच भावी पिढीस दाखविण्यास नव्हे, तर हिंदुस्थानची जी

प्रगति व्हावी असें आपण सर्वजण इच्छितों तिच्या, अभिवृद्धीस या संस्थेचें साहाय्य व्हावें.'

ता० २५ नोव्हेंबर १९१० ला, संध्याकाळीं, मुंबईतर्फे विश्वविद्यालयाच्या भव्य दिवाणखान्यांत लॉर्ड मिंटो या स्वदेशीं परत जाणाऱ्या व्हाइसरॉयसाहेबांस मेजवानी झाली. त्यावेळीं, शहरच्या वतीनें नामदार गोखले यांनी त्यांचें अभीष्ट चिंतून, भाषण केलें. तेव्हां लॉर्ड मिंटो यांनीं उत्तरादाखल असें म्हटलें कीं, 'मिस्टर गोखले यांनीं माझें योगक्षेम इतकें अंतःकरणपूर्वक व इतक्या वक्तृत्वपूर्ण भाषेंत केलें आहे कीं, त्यांचे व तुह्मां सर्वांचे आभार कसे मानावेत हेंच मला समजत नाहीं. मी आपल्या कारकीर्दींत जें कांहीं घडवून आणण्याची खटपट चालविली होती, त्याचा मिस्टर गोखले यांनीं इतका गौरव केला आहे, व त्यावर आपल्या वक्तृत्वाचें इतकें प्रदर्शन केलें आहे कीं, त्यास उत्तर देणें मला जड जात आहे. परंतु, मी तुह्मांस खात्रीपूर्वक असें सांगतों कीं, माझ्या कामाच्या मुदतीच्या अखेरीस, तुह्मीं जें हें माझें व माझ्या पत्नीचें संस्मरणीय स्वागत केलें आहे, त्याची मला अत्यंत कदर वाटते. लोकमताचे पुढारी म्हणून, ज्या सुप्रसिद्ध मुत्सद्याचीं भाषणें कौन्सिलांत आजवर मी मोठ्या उत्सुकतेनें श्रवण करीत आलों व ज्याचे मजवर अनंत उपकार झाले आहेत, त्यानें माझ्या गुणांचें चीज केल्यास, त्याची थोरवी मी अत्यंत मोठी समजतों.'

रा० टिळक व मिस्टर गोखले यांनीं देशसेवेस आरंभ करितांना, एक ध्येय आपल्यापुढें ठेविलें होतें. पुढें, त्यांत अंतर पडून, प्रत्येकानें देशसेवेचा आपापला पंथ सुधारला. शेवटीं, एकाचें तोंड

पूर्वेस, तर दुसऱ्याचें पश्चिमेस झालें; एकास कारागृहवास, तर दुसऱ्यास राजगृहवास घडला; एकाच्या कार्यास आडकाठी, तर दुसऱ्याच्या कार्यास सहानुभूति प्राप्त झाली. या परस्पर तुलनेवरून, अर्वाचीन महाराष्ट्रांत कोणतीहि उपयुक्त संस्था चिरंतन चालू रहावी, अशी इच्छा करणाऱ्या चालकानें आपली तारतम्यबुद्धि कोठवर चालवून कृतकृत्यता संपादन करावी, हें इतिहासभक्तांस वेगळें सांगणें नलगे.

ता० २ डिसेंबर १९१० ला, ' मुंबईच्या ट्रॅम्वे कंपनीं ' तील ड्राइव्हर व कंडक्टर अशा ७० जणांची एक जंगी सभा भरून, तींत त्या लोकांनीं आपणांवर होणारा जुलूम कंपनीच्या कानावर कायदेशीर रीतीनें घालण्याकरितां तिला सॉलिसिटरमार्फत अर्ज व २४ तासांची नोटीस दिली. तिचा आशय असा कीं, ' ड्रायव्हर लोकांचे पगार दरमहा रु० २० पासून रु० ३० पर्यंत व कंडक्टरलोकांचे रु० १५ पासून रु० ३५ पर्यंत असावेत; उशिरां कामावर आल्याबद्दल पगार कापूं नयेत; ज्या एका एतद्देशीय वरिष्ठ अधिकाऱ्यापासून आपणांस त्रास होत आहे, त्यास कामावरून दूर करावें; आपलें मागणें मंजूर न झाल्यास आपण संप करूं, तेव्हां ' तोंड दाबून बुक्क्यांचा मार ' या न्यायानें आपणांस पोलिसच्या कचाटींत आणूं नये. ' या नोटिशीचें उत्तर वेळेवर न मिळाल्यामुळें, सदरहू नोकरांनीं कंपनीचें काम बंद पाडिलें. नंतर, ता० ५ ला, मॅनेजिंग डायरेक्टर यांनीं त्यांस असें उत्तर पाठविलें कीं, मीं तुमच्या अर्जावर सह्या करणाऱ्यांपैकीं कांहीं जणांना अर्जांतील मजकुराची माहिती आहे कीं नाहीं तें पाहिलें. परंतु त्या दिशेनें

आपली निराशा झाली. सबब, तुह्मीं माझ्याकडे एक डेप्युटेशन पाठवावें, म्हणजे काय तो विचार करितां येईल. ता० ७ ला संप तसाच कापाच्या मैदानांत राहून, संपवाले तेथेंच उघड्यावर निजून राहिले. तेव्हां दोघां हिंदू गृहस्थांनीं त्यांना मेवामिठाई, तांदूळ इत्यादि शिधा पुरविला. कंपनीनें आपले हेडक्लार्क यांस त्यांची समजूत घालण्याकरितां त्यांकडे पाठवून, आपण त्यांस कोणकोणत्या सवलती देणार आहों, हें एका सर्क्युलरद्वारें त्यांस समजावून सांगण्याकरितां त्यांकडे आपले दोन इन्स्पेक्टर रवाना केले. मॅनेजिंग डायरेक्टर यांनीं आपला पक्ष प्रकट केला. ते म्हणाले कीं, ' कांहीं थोड्या उपद्यापी मंडळींच्या नादीं लागून, पुष्कळ जणांनीं आपल्या पायावर धोंडा पाडून घेतला आहे. ट्रॅम चालविण्याच्या कामांत विघ्न आलें आहे. तरी, सार्वजानिक आपत्ति दूर करण्याच्या कामांत कंपनीकडून सर्व तऱ्हेचा प्रयत्न होत आहे. '

## प्रकरण १३ वें.



### बादशहांचें आगमन ( १९११ ).

पुढील वर्षी, ता० २ डिसेंबर १९११ लाच, नवीन बादशहा पांचवे जॉर्ज हे ' मदिना ' या खासगी आगबोटींतून सहकुटुंब मुंबईस येऊन दाखल झाले. त्यांचा पाहुणचार चार दिवस मोठ्या थाटाचा झाला. आपण कोणाच्या राजछत्राखालीं आहों, हें प्रजेस

प्रत्यक्ष पाहण्याचा हा पहिलाच योग असल्यामुळें, राजदर्शना-विषयीं प्रजेच्या मनांत अत्यंत उत्कट इच्छा उत्पन्न झालेली दृष्टीस पडली.

सकाळीं ८ वाजतां, ' मदिना ' आगबोट दूर दिसल्याची इशारत ३ तोफांनीं झाली. सुमारें ९॥ वाजतां, ३१ तोफांची सलामी होऊन, ४ क्रूझरांमागून ती बंदरांत आली. धक्क्यापासून २॥ मैलांच्या टापूंत मच्छीमारी बोटी व इतर होड्या यांस सक्त मनाई होती. एक तासानें अपॉलो बंदर व भोंवतालचा सर्व प्रदेश यांतहि येण्याची सर्वांस मनाई झाली. कांहीं वेळानें व्हाइसरॉयसाहेब हे पांढऱ्या पोषाखांत व गव्हर्नरसाहेब हे निळ्या पोषाखांत आपापल्या गाड्यांत बसून, अर्ध्या तासाच्या अंतरानें बोटीवर गेले.

४ वाजतां, बादशहा बंदरावर उतरणार म्हणून सर्वत्र जय्यत तयारी झाली. बंदरावर उतरल्यावर, कांहीं गोऱ्या लोकांच्या भेटी होऊन, मुद्दाम तयार केलेल्या व ध्वजापताकादिकांनीं शृंगारलेल्या उघड्या नाटकगृहांत मुंबईच्या म्युनिसिपल कॉर्पोरेशनतर्फे मानपत्र देण्याचा विधि व्हावयाचा होता. त्याकरितां, एक तास आधीं निमंत्रित गृहस्थ हजर होते. गव्हर्नरसाहेब हे निळ्या पोषाखांत ३॥ वाजतां आले. व्हाइसरॉयसाहेब हे पांढऱ्या पोषाखांत ३॥। वाजतां आले. नंतर, सलामीच्या तोफा होऊन, बादशहा हे ऐन वेळेवर आले. तेव्हां, व्हाइसरॉयसाहेबांनीं बादशहा व बादशाहीण यांचें स्वागत करून, कांहीं अधिकाऱ्यांस व थोड्या गृहस्थांस बादशहांपुढें नेऊन, त्यांची भेट करून दिली. नंतर, मंडपांतून उघड्या नाटकगृहांतील उच्चासनाकडे येऊन, टाळ्यांच्या कडकडाटानें

---

१ ' चित्रमय जगत् ' ( वर्ष २ रें अंक १२ वा ) पहा.

झालेला संतोष प्रदर्शित करण्याकरितां, ते लोकमान्य अभ्यागत अल्पकाळ तेथेंच उभे राहिले. बादशहांनीं ‘ ॲडमिरल ’ चा पांढरा पोषाख केला असून, बादशाहिणींनीं ‘ बिस्कुटा ’ च्या रंगाचा पोषाख केला होता—त्यांनीं पुष्पांचा मुगुट केलेली टोपी घातली होती. दोघे आसनांवर विराजमान झाल्यावर, बादशहांच्या उजव्या बाजूस गव्हर्नरजनरलसाहेब व बादशाहिणीच्या डाव्या बाजूस गव्हर्नरसाहेब हे उभे राहिले. नंतर, गव्हर्नरसाहेब यांनीं खूण केल्या-वरून, सर फेरोजशहा मेहता हे उच्चासनाच्या पायऱ्यांच्या पाय-थ्याशीं जाऊन आपल्या गंभीर व जोरदार आवाजानें मुंबईकॉर्पोरेश-नचें मानपत्र वाचूं लागले. त्याचा सारांश असा कीं, मुंबई शह-रच्या म्युनिसिपल कॉर्पोरेशनचें अध्यक्ष व सभासद हे मुंबापुरस्थांच्या वतीनें, आपण हिंदुस्थानच्या किनाऱ्यावर पाय ठेविल्या वेळीं, आपलें मनःपूर्वक स्वागत करून अशा मंगल व थोर प्रसंगीं आह्मां सर्वांच्या ठायीं वसत असलेली राजनिष्ठा व आह्मांस होत असलेला आनंद व्यक्त करण्याची आपणांजवळ परवानगी मागतों. आजचा हा प्रसंग म्हणजे हिंदुस्थानच्या इतिहासांतच नव्हे, तर आपल्या साम्रा-ज्याच्या इतिहासांतही अपूर्व होय. आपण बादशहा म्हणून येथें आलात, त्यामुळें हें उघड झालें कीं, इंग्लंडच्या राजघराण्यांत हिंदुस्थानाला मान आहे; व हिंदुस्थानच्या बादशहानें धारण केलेला मुकुट हें येथील सर्व लोकांच्या एकीकरणाचें चिन्ह होय. पूर्वेकडील सुधारणा व पश्चिमेकडील सुधारणा यांचें एकिकरण होऊन उन्नतिचक्र फिरावें, ही जी ब्रिटिशसत्ताधारी मंडळाची इच्छा ती आमच्या मुंबईशहरांत फलद्रूप होत आहे. आमची अशी प्रार्थना आहे कीं, आपलें राज्य, महाराणी व्हिक्टोरिया व सातवे

एडवर्ड यांच्याप्रमाणें, ज्ञानसंपन्न, सहानुभूतिदर्शक, व प्रेमभरित असावें !

देवालयाच्या आकाराच्या सोन्यारुप्याच्या करंड्यांत घालून, सर फेरोजशहा मेहता यांनीं तें मानपत्र बादशहापुढें ठेवून, लेडी मेहता यांनीं बादशाहिणींस पुष्पगुच्छ अर्पण केला. नंतर, बादशहांचें उत्तरादाखल असें भाषण झालें कीं, ' या मुंबईशहरांत व आपणां-सर्वांच्या सन्निध आज जो मी आलों आहें, तो मी नवखा म्हणून आलों नाहीं; सहा वर्षांपूर्वींच्या स्वागताची माझी आठवण अजून गेली नाहीं. मुंबईच्या किनाऱ्याजवळ येत असतां, उंच उंच माडांचीं झाडें, जणूं काय समुद्राच्या उदरांतूनच तीं वर आलेलीं असावीं, अशी तीं मला प्रथम दिसल्यामुळें मला जो आनंद झाला, तो अजून मी विसरलों नाहीं. त्या वेळीं, मला जें कांहीं हिंदुस्थानच्या लोकांविषयीं ज्ञान प्राप्त झालें, त्यानें ह्या देशांतील निरनिराळ्या लोकांबद्दल माझी सहानुभूति विशेष दृढ झाली, व माझे वडील परलोकवासी झाले, त्या दुःखदायक प्रसंगीं माझे वाडवडील धारण करीत आलेलीं राज्यसूत्रें धारण करण्याचा मला प्रसंग आला, तेव्हां पहिला व अगदीं मनापासूनचा माझा विचार हा कीं, हिंदुस्थान देशीं पुनः जाऊन आपल्या प्रजाजनांस पहावें. आज मी आपल्या राणीसह आपणांपुढें उभा आहें, या गोष्टीवरून माझी ती इच्छा आज सफल झाली, व ही मोठीच गोष्ट आहे असें मी समजतों. आज येथें आल्यावर मला धन्यता वाटत आहे. तिचें कारण असें कीं, वेळींच पाऊस पडल्यामुळें, ह्या इलाख्याच्या कांहीं भागांत दुष्काळाची भीति व काळजी वाटत होती ती टळून, आतां सर्वत्र आबादानी होईल असा रंग दिसत आहे. आज आपण व आपले पूर्वज

या सर्वांनीं मुंबई शहर हें ब्रिटिश मुकुटांतील एक माणिक बनविलें आहे. आपण केलेल्या या जंगी स्वागताबद्दल मी आपले मनापासून आभार मानितों. आपणांत शांतता व समृद्धि असावी अशी परमेश्वराजवळ आमची मनापासून प्रार्थना आहे. '

नंतर, सर्व लोकांस थोडें वांकून पुन्हा पुन्हा सलाम केल्यावर, बादशहांची स्वारी निघाली. सर्वांपुढें व्हिंसेंट हे डेप्युटी साहेब कमिशनर ( पोलिस ) मोटारमधून निघाले. त्यामागून फौज, त्यामागून तोफखाना, त्यामागून बादशहांची गाडी, त्यामागून स्टेटसेक्रेटरी व गव्हर्नरजनरल यांची गाडी, त्यामागून गव्हर्नर यांची गाडी व त्यामागून फौज अशी मिरवणूक चालली. दुतर्फा लष्करी लोक उभे असून, त्यांमागें प्रेक्षकांकरितां ' स्टँड ' उभारलेले होते. ध्वजा, तोरणें, पुष्पमाला यांनीं दोन्ही बाजूंची घरें सजविलेलीं असून, खिडक्या व सज्जे राजदर्शनार्थ जमलेल्या लोकांनीं गजबजून गेलेले होते. ठिकठिकाणीं भव्य व शोभिवंत कमानी केलेल्या असून, त्यांवर सुवर्णाक्षरांनीं बादशहांचें अभीष्टचिंतक वाक्यें झळकत होतीं. बादशहांची गाडी समोर येतांच,लहान मुलें आपल्या हातांतील पताका फडकावीत होतीं. तीं तोंडानें जयजयकार करीत होतीं. जरा पुढें गेल्यावर, मुजरे करून, बादशहा या सन्मानाचा स्वीकार करीत होते. त्यांची गाडी तासाला ८ मैलप्रमाणें सपाट्यानें जात असल्यामुळें, प्रजाजनांस राजदर्शन यथास्थित मात्र घडलें नाहीं. ५॥ च्या सुमारास, अपॉलो बंदरावरील नाटकगृहांत मार्गप्रतीक्षा करीत बसलेल्या मंडळीस पुनः मुजरा करून, बादशहा आपल्या आगबोटीवर परत गेले.

रात्रीं, सरकारी व सार्वजनिक इमारतींवर रोषनाई केली होती. त्या विद्युत्प्रकाशानें लकाकत होत्या. दुसरे दिवशीं, दुपारी बादशहांच्या सन्मानार्थ, गव्हर्नर साहेबांच्या बंगल्यावर उपहारसमारंभ होऊन, सायंकाळीं चर्चमध्यें प्रार्थना झाली. बिशपसाहेबांनीं 'इंग्लंडचें हिंदुस्थानांतील कर्तव्य' हा विषय घेतला होता. आपल्या 'अर्वाचीन महाराष्ट्रा' ची प्रार्थनाही अशीच महाकविवचनांत करावयाची आहे—

***'प्रवर्ततां प्रकृतिहिताय पार्थिवः'।**

* 'पृथ्वीपतीची प्रवृत्ति प्रजेच्या कल्याणाकडे व्हावी!'

---

# परिशिष्ट १ लें.



प्र० ३ रें, पृ० २५ वें, यांत बाजीरावसाहेबांची वृद्धावस्था व मृत्यु यांविषयीं जें लिहिलें आहे, तें के-कृत 'शिपायांच्या युद्धाच्या इतिहासा' (भा० १ ला, पृ० १०० वें.) च्या आधारानें लिहिलें आहे. परंतु, अलीकडील शोधावरून असें समजतें कीं, बाजीरावसाहेबांची वृद्धावस्था ही त्यांस कोणत्याहि प्रकारें कष्टप्रद दिसत नसे; त्यांनीं आपलें शरीर शेवटपर्यंत तयार ठेविलेलें होतें; व त्यांचा मृत्यु दोन वर्षे अगोदर म्हणजे १८५१ सनांत झाला होता. (वे० शा० सं० गणेश सदाशिवशास्त्री लेले-कृत 'तीर्थयात्रा-प्रबंध,' पृ० १४१ वें, पहा).

दोन वर्षांपूर्वी म्हणजे १८४९ त, श्रीमंत रघुनाथराव विठ्ठल ऊर्फ आण्णासाहेब विंचूरकर ( राजे उमदे तुलमुल्क बहादर, दक्षिणेंतील पहिल्या प्रतीचे सरदार व कंपॅनियन ऑफ् द मोस्ट एक्झॉल्टेड् ऑर्डर ऑफ् द स्टार ऑफ् इंडिया ) हे मोठे उदार, स्वधर्मनिष्ठ व सदाचारसंपन्न संस्थानिक काशीयात्रेस निघाले असतां, ब्रह्मावर्त येथें जाऊन श्रीमंत बाजीरावसाहेबांस भेटले होते. तेव्हां त्यांनीं आपल्या ह्या जुन्या आश्रिताचें प्रेमळपणें स्वागत केलें होतें. रघुनाथरावांस आपल्याजवळ बसवून, त्यांचे अंगावरून हात फिरवून, बाजीरावसाहेब त्यांस म्हणाले कीं, " आम्ही येथें आल्यापासून आमचे सरदारांपैकीं, रघुनाथराव, तुम्हीच येऊन भेटलांत ! येणेंकरून संतोष वाटतो ! " या स्नेहाच्या भाषणपद्धतीवरून, इतिहासवाचकांच्या एक गोष्ट स्पष्ट लक्ष्यांत येईल. ती ही कीं, बाजीरावसाहेबांस ब्रह्मावर्तांतील ३० वर्षांचा एकांतवास जाणवत असून, आपण होतों कोण व झालों कोण या स्थित्यन्तराचा, मनुष्यस्वभावानुसार, खेद होत असावा. ( सदर्हू ' तीर्थयात्रा-प्रबंध, ' पृ० ८० वें, पहा ).

बाजीरावसाहेबांचे ज्येष्ठ दत्तकपुत्र, नानासाहेब व वर आलेले रघुनाथराव विंचूरकर यांचें वय समान ( म्हणजे २५ वर्षांचें ) असल्यामुळें परस्परांचा मोठा स्नेह जडून, रघुनाथरावांवर नानासाहेब बहुत लोभ करीत असत. रघुनाथराव हे रोज सकाळीं ५ वाजल्यापासून ७ वाजेपर्यंत घोड्याचे फेर व बोथाटीचे खेळ पाहून, नानासाहेबांच्या वेगळ्या वाड्यांत त्यांचे पंक्तीस भोजन करून, बिऱ्हाडीं येत असत. नानासाहेबांकडे रात्रीं कधी कधीं तद्देशीय कंपन्यांचे नाच, देशी गाणाऱ्यांच्या बैठकी, गवयांचीं

गार्णी होत असत. त्या मजलसीस रघुनाथराव हे बहुतकरून जात असत. ( सदर्हू ' तीर्थयात्रा-प्रबंध, ' पृ० ८१ वें, पहा ).

काशीयात्रेहून परत येतांना, ब्रह्मावर्त येथें श्रीमंत बाजीरावसाहेब हे आसन्नमरण व गतप्राण झाल्यावर, रघुनाथरावांनीं त्यांचे अकरावे दिवसाला, आपल्या जहागिरींतून वाटेल तितकें भूमिदान करण्यास नानासाहेबांस विनंति केली होती. परंतु नेत्रांत अश्रु आणून नानासाहेबांनीं ती अमान्य करून, इंग्रजसरकारकडून महाराजांस चालत आलेली नेमणूक आपणाकडे चालण्याची उमेद नाहीं व खर्च कमी करण्याची पंचाइत आहे म्हणून गव्हर्नरजनरलसाहेबांस विनंति कर्तव्य आहे असें रघुनाथरावांस कळवून, तेवढ्याकरितां कांहीं दिवस तेथें पुन्हा येण्याविषयीं सुचवून, त्यांस निरोप देतांना पोषाख आणविला. परंतु रघुनाथरावांनीं तो शोकजनक प्रसंग लक्ष्यांत आणून, त्याचा स्वीकार केला नाहीं; फक्त नानासाहेबांनीं दिलेला स्वतः बसावयाचा घोडा देशीं घेऊन जाण्याचें कबूल केलें. येणेंप्रमाणें, ' सरकारचें तेलहि पदरांत घ्यावें ' ही वडिलांची म्हण त्यांनीं खरी केली ( सदर्हू ' तीर्थयात्रा-प्रबंध, ' पृ० १४३ वें, पहा ).

# परिशिष्ट २ रें.

प्र० ४ थें, पृ० ३५ वें. यांत, पुढें 'नानासाहेबांचें काय झालें तें अवगत नाहीं ' असें विधान आलें आहे. परंतु अलीकडील शोधा-

वरून असें समजतें कीं, नानासाहेब हे सपरिवार जे उत्तरेस गेले, ते अडचणी व हालअपेष्टा खात कसेबसे नेपाळांत शिरले. त्यावेळीं, त्यांच्या बरोबर त्यांच्या मातुःश्री सईबाईसाहेब, त्यांचें स्वतःचें कुटुंब, बाळासाहेब व त्यांचे कुटुंब व रावसाहेब वगैरे मंडळी होती.....त्या कालीं नेपाळांत जंगबहादुराचा अंमल होता; त्यास तशी बातमी लागली कीं, त्याच्या प्रांतांतून बाहेर जावें लागे. बाहेर जावयाचें म्हणजे इंग्रजी-हद्दींत. तेथें निभाव लागेनासा झाला—व ८।१५ दिवसांतच लागेनासा होई—म्हणजे पुन्हा नेपाळेश्वराच्या हद्दींत शिरणें कपाळीं येई. असे गोते खात खात, शके १७८० ( सन १८५८ ) चा भाद्रपद मास आला; म्हणजे १७७९ च्या आषाढापासून १७८० च्या भाद्रपदापर्यंत १४ महिने ही मंडळी वनवास करीत होती. शेवटीं शके १७८० च्या भाद्रपदांत, नेपाळ हद्दींत ' ठाड्या ' ( या गांवा ) पासून ७ कोसांवर स्वारीचा मुक्काम असतां, तेथें दगदगीनें हलक होऊन, नानासाहेबांस दोषी ज्वर लागून, त्यांनच त्यांचा अंत भाद्रपद वद्य १४ बुधवारीं झाला....त्यांची उत्तरक्रिया ' ठाडा ' ( देवखरी ) येथें झाली....त्या कालीं कुसुमाबाईसाहेब आपटे (बाजीरावसाहेबांची औरस कन्या, वय १२ ) या तेथें होत्या. त्यांना सर्व गोष्टी यथास्थित कळत होत्या व त्यांनींच मेहरनजर करून ही हृदयद्रावक हकीकत इत्थंभूत मित्तीसुद्धां निवेदन केली.

' नानासाहेबांपूर्वी ३ महिने, म्हणजे ज्येष्ठ वद्य अमावास्येस, बाळासाहेब हे दोषी ज्वरानेंच नेपाळांत डांग येथें निधन पावले. '

' रावसाहेब हे स्वारीला सोडून, इंग्रजी हद्दींत ग्वाल्हेरीकडे गेले. तेथें थोड्याच दिवसांत ते धरले जाऊन, त्यांना देहान्त दंड झाला. त्यांच्या स्त्री ( रमाबाई ) चाही भयंकर अंत झाला असें ऐकतों. '....

‘ बाकी राहिलेल्या स्त्रियांस मात्र नेपाळसरकारापासून फारसा त्रास पोंचला नाहीं....त्यांनीं जवळचे जडजवाहीर मोडून, ‘ थापोथलीं ’ त जागा विकत घेऊन, ३।४ लक्षांचे ३।४ जहागिरी गांव खरेदी करून, त्यांच्या ५।७ हजार उत्पन्नावर गुजराण चालविली. सईबाई ( बाजीरावसाहेबांची स्त्री ), काशीबाई ( बाळासाहेबांची स्त्री ) व सारजाबाई ( नानासाहेबांची स्त्री ) यांपैकीं पहिल्या शके १८१८ त वारल्या, व बाकीच्या अगोदर कांहीं वर्षें गत झाल्या. ह्या तिन्ही बायांनीं अत्यंत साधुरीतीनें कालक्रमणा केली. कुसुमाबाई ( बाजीरावसाहेबांची औरस कन्या ) यांना, गर्दी नाहींशी झाल्यावर, त्यांचे श्वशुर बाबासाहेब आपटे यांनीं रेसिडेंटाच्या परवानगीनें खाटमंडूहून इंदुरास आणिलें. त्या सध्यां हरि हरि म्हणत काशीवास करून आहेत. नंतर, बिनवारसी जहागीर म्हणून नेपाळसरकारनें ती जप्त केली. सध्यां भगवा झेंडा व पेशव्यांची गादी असलेलें लक्ष्मीनारायणाचें देवस्थान मात्र एका कऱ्हाडे कुटुंबाकडे चालू आहे ....(रा० वि० का० राजवाडे यांनीं दिलेली ‘ बाजीरावसाहेब पेशवे यांच्या कुटुंबाची शेवटची हकीकत ’—‘ केसरी, ’ ११–२–१३ ).

पेशव्यांच्या बाईसाहेबांनीं आपले जवळचें जवाहीर देऊन राणीगंज म्हणून जें गांव नेपाळसरकाराकडून विकत घेऊन, पेशव्यांची गादी, शिवाजीचा भगवा झेंडा, व रामाचें मंदिर बांधून ठेवलें आहे, त्याची आजन्म ब्रह्मचारी राहून, ज्या रा० महादेव वासुदेव तांबे यांनीं बाईसाहेब वारल्यानंतर, व राणीगंज, व तेथील देवस्थान, देवाचीं उपकरणीं व देवाची जमीन हीं नेपाळसरकारनें जप्त करून घेतल्यावरहि आपल्या कामांत आळस न करून, सेवा

केली होती; ते पेशवाईचे शेवटले सेवक आपल्या ६३ वे वर्षीं ता० ३-११-१९१३ रोजीं समाधिस्थ झाले. ( राणीगंजाहून रा० गो० वि० तांबे यांनीं ता० २५-११-१३ च्या ' केसरीं ' त प्रसिद्ध केलेलें पत्र पहा ).

# परिशिष्ट ३ रें.



' अर्वाचीन महाराष्ट्र ' चें सूक्ष्म निरीक्षण करणाऱ्यांच्या नजरेस एक गोष्ट आल्यावांचून राहणार नाहीं. ती ही कीं, अर्वाचीन महाराष्ट्रांतील समाज द्विधा झालेला आहे. त्या द्विधाभावाची मीमांसा पोक्तपणानें करणें हा इतिहासकाराचा अधिकार आहे. तदनुसार, प्रस्तुत अल्पकृतीची सांगता करावयाची राहिली आहे. ती अशी—

| जुन्या मताचे लोक. | नवीन मताचे लोक. |
|---|---|
| १. हे एका अतिप्राचीन व अत्युच्च धर्माचे अभिमानी आहेत. त्यांस धर्मव्यवहाराचा भंग व्हावा असें वाटत नाहीं. | १. हे नानामतांनीं व्याप्त होऊन, त्यांची मतें नानाकार झालीं आहेत. त्यांस प्राचीन धर्माचा वाटावा तितका गौरव वाटत नाहीं. |
| २. ते कोटयवधि आहेत. | २. ते सहस्रावधि आहेत. |
| ३. ते स्त्रियांस अन्नवस्त्रधनादिकांनीं शोभवून, त्यांचें पावित्र्य रक्षण करण्यास झटतात; त्यांस | ३. ते परदेशच्या नानाप्रकारच्या वस्तूंनीं आपलें घर शोभवून, पुनर्विवाह, विवर्णविवाह, जाति- |

| | |
|---|---|
| निराधार ठेवूं इच्छीत नसतात; त्यांचे प्रेमबंधन चिरस्थायि करण्याचे आचार भिन्न आहेत. | भ्रष्टता यांस प्रोत्साहन देणारे आहेत; स्त्रीपुरुषांतील ऐक्यास धोका देणारें स्त्रीपुरुषस्वातंत्र्य उत्पन्न करणारे आहेत. |
| ४. त्यांची प्रत्येक गोष्ट तावून सुलाखून घेतलेली आहे. | ४. ते जी जी नवी गोष्ट पुढें आणितात, ती अनुभवून पाहतात, व शेवटीं ठेंच लागली कीं शहाणे होतात. |
| ५. त्यांस एकंदर साधेपणा व पोक्तपणा आवडतो. त्यांस मुकाट्यानें कृति करून दाखविणें बरें वाटतें. | ५. त्यांस डामडौलाची हाव, वृथावल्गना व कार्यशून्यता हीं गौण वाटत नाहींत असें दिसतें. |

अशी स्थूलमानानें परस्परांची तुलना[1] करून, समाजाचें पाऊल कोठें पडत आहे हें पाहणें कठीण आहे, तरी यशवंतराव देवमामलेदार व न्यायमूर्ति रानडे या दोन महाव्यक्तींतील तारतम्य हें ' अर्वाचीन महाराष्ट्रा ' स दिक्सूचकयंत्राप्रमाणें उपयुक्त आहे. दोघेही राजसेवेंत आयुष्य घालवून, जीविताची इतिकर्तव्यता ओळखणारे होते. त्यांस कोणकोणत्या कोटींत घालावें याचा निर्णय करणें हें सामान्य व्यक्तीस सुलभ आहे. राजा भर्तृहरि या नामांकित कवीनें असा धोपट मार्ग दाखविला आहे:—

---

१ या दिशेनें सौ० लिंगम्माबाई माघे यांनीं अल्प साहस केलेलें आहे. (' सुधारक, ' वर्ष ८ वें, अंक २९ वा ' पहा. )

‡ एके सत्पुरुषाः परार्थघटकाः स्वार्थान् परित्यज्य ये
सामान्यास्तु परार्थमुद्यमभृताः स्वार्थाविरोधेन ये ।
तेऽमी मानवराक्षसाः परहितं स्वार्थाय निघ्नन्ति ये
ये तु घ्नन्ति निरर्थकं परहितं ते के न जानीमहे ॥

# परिशिष्ट ४ थें.



' अर्वाचीन महाराष्ट्रा ' चें लक्षण ठरविण्यास, आणखी एक मोठें साधन आहे. प्राचीन व अर्वाचीन मराठी ग्रंथकारांची तुलना करणें हें होय.

| प्राचीन ग्रंथकार. | अर्वाचीन ग्रंथकार. |
|---|---|
| १. हे बहुतकरून साधुसंतांच्या मालिकेंतील असत. | १. हे बहुतकरून कुटुंबवत्सल आहेत. |
| २. त्यांना एकांतवासाचा लाभ सहज मिळत असे. | २. त्यांना एकांतवासाचा लाभ होण्यास पंचाईत पडते. |
| ३. त्यांस संसाराची चिंता नसे. | ३. त्यांस संसाराची चिंता असते. |
| ४. त्यांच्या कृतींचें परीक्षण व तदनुसार तिला मिळणारा आश्रय | ४. वर्तमानपत्रें, मासिकपुस्तकें, परीक्षक मंडळ्या इत्यादींचा वेधक |

‡ स्वार्थबुद्धि पूर्णपणें सोडून, परार्थ घडवून आणणारे जे कोणी असतात, ते सत्पुरुष होत; स्वार्थ साधून, परार्थ संपादणारे जे कोणी असतात, ते सामान्य जन होत; स्वार्थाकरितां पराहिताचा स्वाहाकार करणारे जे कोणी असतात, ते मनुष्यरूपी राक्षस होत; परंतु निरर्थक पराहिताची होळी करणारे जे कोणी असतात, ते कोण हें आम्हांस समजत नाहीं.

याची अडचण पडत नसे. त्यांच्या शिष्यमंडळांत वाचक व आश्रयदाते यांची वाण नसे.

दृष्टिप्रसाद त्यांस ग्रहण करावा लागून, आश्रयाचा अभावें पदोपदीं नडत असतो.

---

१ एवढे बरकि खरें कीं, जसे ' गुजराथ व्हरनॅक्युलर सोसायटी ' चे मुरब्बी मुंबईचे माजी गव्हर्नर लॉर्ड रे हे आहेत; जसे ' नागरी-प्रचारिणीसभे ' चे ऑनररी सभासद संयुक्तप्रांतांचे श्रीमान् लेफ्टेनंट-गव्हर्नर, सर ला टच् हे आहेत; जसे ' साहित्यसभे ' चे अभिभावक महामान्य वंगेश्वर बहादूर, सर जॉन वुडबर्न, हे आहेत; तसे आपल्या ' डेकन व्हरनॅक्युलर ट्रँस्लेशन सोसायटी ' चे आश्रयदाते मुंबईसरकार, हे होत. तें इतर प्रांतातील बडेसाहेबांप्रमाणें, व्यक्तिदृष्ट्या तुटपुंज्या तात्कालिक किंवा कागदी ऐवज देणारें नव्हे; तर सोसायटीच्या उत्पन्नांत जवळजवळ दुपटी ( रु० १००० ) ची भर घालणारें प्रामाणिक प्रस्थ होय. आतां, ज्या कामाबद्दल सोसायटीस हा आश्रय मिळतो, तें काम पूर्वी ' दक्षिणा प्राइझ कमिटी ' करी. तिची पूर्वपीठिका इतिहासप्रसिद्धच आहे ( १९०५ सालच्या ' ग्रंथमाले ' तील 'भाषोन्नति व राष्ट्रोन्नति' हा प्रस्तुत पुस्तककर्त्यांचा लेख पहा).

रा० गोविंद वासुदेव आपटे बी. ए. यांचेहि असेंच मत आहे: ' इंग्लंडांत, लेखनव्यवसायाला जी आज उत्कर्षावस्था आली आहे, ती कांहीं आकस्मिक नव्हे. जॉन्सनच्या वेळेपासून आजपर्यंत जी १५०।२०० वर्षें गेलीं, त्या अवधींत इंग्रजी वाङ्मय ( १ ) उद्योग, ( २ ) इंग्रजी राज्याचा विस्तार, ( ३ ) लोकांत शिक्षणाचा प्रसार, ( ४ ) सरकारी आश्रयापेक्षां लोकाश्रयाची महती, (५) राष्ट्रीय हिताचे कामीं उपयुक्त होतील अशा ग्रंथांची रचना व (६) संघशक्ति या सहा गोष्टींमुळे क्रमशः अभ्युदय पावून आजच्या स्थितीस पोंचले आहे... आमच्या लेखनव्यवसायांत वरील ६ कारणांचा बहुतेक अभाव आहे असें दिसतें, ( सदर्हू रा० आपटे यांचा ' लेखनव्यवसाय ' हा ' विविधज्ञानविस्तार ' च्या ३१ व्या वर्षातील २ ऱ्या अंकांतला लेख पहा.

| | |
|---|---|
| ५. 'थोडो खाय, तो घणो खाय' या गुर्जरलोकप्रवादाप्रमाणें, त्यांच्या कृतीच्या प्रती मोठ्या कष्टानें प्राप्त होत असल्यामुळें, त्या बहुमोल व परमपूज्य होत असत. | ५. त्यांस प्रकाशनाची सामग्री मृगजलवत् भासते; द्रव्याभावामुळें, स्वतः प्रकाशक होतां येत नाहीं, इतर प्रकाशकांचा व्यापारी बाणा त्यांस पेलत नाहीं, इतकेंच नव्हे, तर त्यांचें सहानुभूतिपूर्वक साहाय्य मिळणें अत्यंत कठीण असतें. |

सारांश, 'अर्वाचीन महाराष्ट्रा' ची जर कोठें दिशाभूल होत असेल, तर ती इथें होत आहे. याचा काय परिणाम होईल हें नव्यानें सांगण्याची गरज नाहीं. वाङ्मयाची अत्युच्चकोटि म्हणजे 'कविता'. पण, तिच्याकडे संपन्न, सहृदय, लेखनपटु वाचकांचेंहि दुर्लक्ष्य आहे. या गोष्टीस सबळ प्रमाण म्हणजे 'काव्यरत्नावली' ची गेल्या २४ वर्षांची दुःखद स्थिति हें होय. इकडे 'अर्वाचीन महाराष्ट्र' हें वाङ्मयदृष्ट्या वालुकामय मरुप्रदेश म्हणून कंठशोष करावा, व इकडे वाङ्मयाचे म्हणजे राष्ट्राचे प्राण जे कवि त्यांच्या दिव्यवाणीस मूकत्वाप्रत न्यावी असा विपरीत प्रकार दृग्गोचर होत आहे. यांस म्हणजे पारतंत्र्य नडतें असा भाव नाहीं. बंगालनें जें कार्य ग्रंथभूमिकेंत करून दाखविलें आहे, तें महाराष्ट्रास करून दाखवितां येण्यासारखें आहे. त्यास सत्यसंकल्पाचें बळ हवें आहे. तेवढें मिळालें कीं, त्यास दाता भगवान् दूर नाहीं.

---

# परिशिष्ट ५ वें.



' क्वीन्स कॉलेज ' ( बनारस ) येथील गणितगुरु डॉ० गणेश-प्रसाद व ' अँग्लो-ओरिएंटल महॉमेडन-कॉलेज ' ( अलीगड ) येथील गणितगुरु ' डॉ० झिय्याउद्दिन या व्यवसायबंधूंवर आपल्या अप्रातिम स्वार्थत्यागानें छाप बसविणारे नामदार प्रिन्सिपाल रघुनाथ पुरुषोत्तम परांजपे एम्. ए. बी. एस्. सी. ( सीनियर रँग्लर ), फर्ग्यूसन कॉलेज ( पुणें ); हे ज्या ' डेक्कन एज्युकेशन सोसायटी ' चे सभासद आहेत, तिचे १९०३ सालापासून जीव कीं प्राण आहेत; नव्हे, तर ते सर्व अर्वाचीन महाराष्ट्राची बुद्धिमत्ता, सौजन्य, स्वदेशभक्ति यांचे उत्तम निदर्शक होत. ते अनुभवानें कमी असल्यामुळें, प्रथम स्वशिष्येशीं विवाह करण्याच्या दोषास, रूढिदृष्ट्या पात्र झाले असले; तरी, तशी काकदृष्टिच उचित नसल्यामुळें, ते सर्व देशभर वंदनीय व अलंकरणीय असे महात्मे म्हणून गाजत आहेत. त्याच्या सारख्यांच्या विस्मरणपापाचें क्षालन निदान परिशिष्टद्वारें होईल अशी आशा आहे.

# प्रश्नावलि.



१. ' इतिहासा ची ' आधुनिक व्याख्या कशी आहे ? त्याची उपयुक्तता कशांत आहे ? त्याचे प्राचीन व अर्वाचीन असे भेद करितां येतात काय ? चित्रीकरण व अनुमितिकरण यां अनुकूल गोष्टींचा लाभ दोहोंपासून सारखाच होतो काय ? सारखाच असल्यास, ' अर्वाचीन महाराष्ट्र ' चा इतिहास आजपर्यंत कां निर्माण झाला नाहीं ?

२. ' बाजीरावसाहेबांनीं कितीही अपराध केले असले तरी ते राज्यकारभार सोडून देतील, तर त्यापासून मला दुःख होईल ' हे उद्गार कोणाचे आहेत ? याप्रमाणें, ते काढणाऱ्याच्या हातून कृति होण्यास कोणत्या गोष्टी आडव्या येत गेल्या ?

३. पेशवे सरकारशीं झालेल्या शेवटल्या तहनाम्याचें महत्त्व कशांत आहे ?

४. श्रीमंतांचें स्वभावचित्र द्या.

५. पेशवाई जाण्यास, बाजीरावसाहेब हे कितपत कारणीभूत झाले ?

६. कंपनीचा अंमल स्थिर करण्याकरितां, कोणीं कशा प्रकारची राजनीति अंगिकारिली होती ?

७. तीवरून कोणाचा कसा गैरसमज झाला होता ? त्यामुळें त्यांचे हातून कोणता अनर्थ घडला होता ? त्याबद्दल त्यांस कोणतें प्रायश्चित्त मिळालें होतें ?

८. इंग्रजी अंमलाची शिस्त कोणीं कशी घालून दिली ?

९. ' एल्फिन्स्टनशाही ' चें इंगित काय होतें ?

१०. स्वभावदृष्ट्या, बाजीरावसाहेब व एल्फिन्स्टनसाहेब यांची तुलना करा.

११. माल्कमसाहेबांच्या कारकीर्दींतील ठळक गोष्टी देऊन, त्यांस एवढी लोकप्रियता कशानें प्राप्त झाली तें लिहा.

१२. सातारकरांस कां पदच्युतच करण्यांत आलें ? त्यांचें संस्थान कां खालसा करण्यांत आलें नाहीं ?

१३. दृढ व उदार इंग्रजी राजसत्तेंत, महाराष्ट्रास आपली शिपाईगिरी कोठें कशी गाजवितां आली ? तीवरून, महाराष्ट्राची सोज्ज्वल राजनिष्ठा कितपत प्रकट झाली ?

१४. राघोजी आंग्रे यांच्या अधिकारास ' अंगारका ' ची उपमा कोणीं कां दिली ? त्यांचें संस्थान कां गेलें ?

१५. कोल्हापूरचे बाबासाहेब व सांवतवाडीचे फोंडसांवत हे इंग्रजी अंमल कितपत जुमानीत असत ? त्यां सारख्यांना कह्यांत ठेवण्याकरितां सरकारनें काय केलें ?

१६. दरोडेखोर राघोजी अंग्र्याच्या पुंडाईची हकीकत द्या.

१७. सातारचें संस्थान कोणत्या कोटिक्रमावर खालसा करण्यांत आलें ?

१८. '५७ सालच्या बंडाला कारण काय झालें ?

१९. कानपूरच्या घोर पापाचा दोष नानासाहेबांवर कितपत येतो ?

२०. महाराणी लक्ष्मीबाई ( झांशी ) व नानासाहेब यांचें सूत्र कसें जुळलें ? नानासाहेबांनीं केलेल्या कानपूरच्या हल्ल्याची

राणीसाहेबांनीं केलेल्या झांशीच्या बचावाशीं तुलना करतां येईल ?

२१. शिंदेहोळकरांनीं आपापली राजनिष्ठा कसकशी व्यक्त केली ?

२२. रंगो बापूजी हे कोण असून, त्यांस कां बंड करावें असें वाटलें ? त्याचा परिणाम काय झाला ?

२३. दक्षिण महाराष्ट्रांत बंडाळी कां माजली ? व तिचा मोड कसा झाला ?

२४. '५७ सालच्या बंडाचें तात्पर्य ? त्याचा बींमोड करण्याकरितां झालेला खर्च भागविण्याची सरकारनें काय तोड काढिली ?

२५. ' बॅंक बे कंपनी ' च्या भ्रमाचा भोपळा कधी, व कसा फुटला ?

२६. महाराष्ट्रांत सुधारक व जुन्या मताची चळवळ कशी सुरू झाली ?

२७. श्रीमंत मल्हारराव महाराज गायकवाड यांवर कोणते आरोप येऊन, त्यांतून त्यांची कितपत मुक्तता झाली ?

२८. शेतकऱ्यांच्या दंग्याची हकीकत द्या. त्यांच्या दुःख निवारणार्थ सरकारनें काय केलें ? तें कितपत हितावह झालें ?

२९. स्वामी दयानंदसरस्वती यांची कोणीं कसकशी संभावना केली ?

३०. युवराजाच्या आदरसत्काराचें वर्णन द्या.

३१. ' दुष्काळ ' दुःखनिवारणार्थ कोणते उपाय निघाले ?

३२. कृष्णशास्त्री चिपळूणकर व विष्णु परशुरामशास्त्री पंडित या

शास्त्रिद्वयांनीं महाराष्ट्राची प्रवृत्ति कोणत्या दिशेची आहे हें दाखविलें

३३. ‘ अबकारी ॲक्ट ’ व ‘ खोतीकायदा ’ यांचा लोकांवर काय परिणाम झाला ? त्यांनीं त्यांवर कांहीं खटपट केली काय ?

३४. वासुदेव बळवंत फडके यांची कोणती महत्त्वाकांक्षा होती ? ती कितपत फळास आली ? तीपासून बोध ?

३५. शिक्षणप्रसारार्थ कोणत्या संस्था कशा, कधीं. व कोठें निर्माण झाल्या ?

३६. लॉर्ड रिपन साहेबांनीं रावसाहेब मंडलिकांसंबंधीं आपली गुणज्ञता कशी, व कधीं प्रकट केली ? व तिचा परिणाम ?

३७. हिंदी कायदेकौन्सिलाची परिणति कशांत होण्याचा रंग आहे ? याविषयीं एखादा प्रयोग करून पाहण्याची इच्छा कधीं कोणास झालेली आहे ? तदनुसार कांहीं कृति घडलेली आहे ? तिचा सांगोपांग विचार ?

३८. लॉर्ड रिपन व महाराणी व्हिक्टोरिया यांची स्मृति जागृत रहावी, म्हणून मुंबईसारख्या मोठ्या शहरानें काय केलें ? त्यास सरकारची सहानुभूति कशा तऱ्हेची मिळाली ?

३९. राज्यव्यवस्थेच्या अंतरंगाचें प्रकाशचित्र ‘ अर्वाचीन महाराष्ट्रा ’ स पहाण्यास कधीं, व कशी संधि मिळाली ? तीपासून त्यास बोध घेण्यासारख्या गोष्टी कोणत्या ?

४०. ‘ अर्वाचीन महाराष्ट्रां ’ तील स्त्रीशिक्षणाची प्रगति कितपत होण्यासारखी आहे यासंबंधीं दिग्दर्शन करा.

४१. ' बुटीप्रकरणा ' ची संक्षिप्त हकीकत देऊन, तीपासून एतद्देशीय संस्थानांवर सार्वभौम सरकारची देखरेख ठेवण्याची तऱ्हा कशी कळून येण्यासारखी आहे, तें लिहा.

४२. नेक नामदार मिस्टर दादाभाई नौरोजी यांचा पार्लमेंटसभेंत कोणत्या तत्त्वावर प्रवेश होऊन, त्यांनीं एकंदर हिंदुस्थानच्या वर्तानें तेथें कोणत्या धोरणानें प्रथम भाषण केलें तें लिहा.

४३. शेट जावजी दादाजी चौधरी यांनीं अवनत राष्ट्र उन्नत दशेस आणण्याचा कोणता राजमार्ग दाखविला तें लिहा.

४४. ' मुंबईचा दंगा ' कसा, कोठें, व केव्हां उद्भवला ? तो कसा शांत झाला ?

४५. न्यायमूर्ति तेलंग यांचें स्वभावचित्र व जीवितकर्तव्य यांविषयीं लिहा.

४६. न्यायमूर्ति तेलंग यांच्या अकालीं मृत्यूवरून कोणता महत्त्वाचा वाद उपस्थित झाला ? त्याची फलश्रुति काय झाली ? तिचें प्रत्यंतर काय झालें ? तें लिहा.

४७. डॉ० भांडारकर यांची महती कशांत आहे तें थोडक्यांत द्या.

४८. ' आपट-कमिशन ' ची संक्षिप्त हकीकत द्या.

४९. १८९५ चें ऐतिहासिक महत्त्व द्या.

५०. १८९६ तील दुष्काळ व ग्रंथिकसन्निपात ( प्लेग ) या प्रसंगांतील ' सार्वजनिक सभे ' ची कामगिरी संक्षिप्तपणानें द्या.

५१. स्पर्शजन्य रोगाच्या कायद्याविषयीं विवेचन करा.

५२. ‘ अग्रायण ’ व ‘ आर्यांचें आर्टिक सदन ’ यांचें महत्त्व काय आहे तें विहंगमदृष्ट्या कथन करा.

५३. पंडिता रमाबाईनीं शिक्षण व उद्योग या बाबतीत कितपत पाऊल मार्गेपुढें टाकलें आहे तें लिहा.

५४. ‘ देव मामलेदार ’ व ‘ भाऊमहाराज दळवी ’ यांची तुलना करा.

५५. ‘ ताईमहाराजांच्या मुकदम्या ’ ची हकीकत देऊन, त्याची इतिश्री कशी झाली तें द्या.

५६. ‘ तारमास्तरांच्या संपा ’ चें संक्षिप्त वर्णन करून, त्याचें तात्पर्य लिहा.

५७. न्यायमूर्ति रानडे यांनीं अर्वाचीन महाराष्ट्रास कोणता आशावाद पटविला त्याचें दिग्दर्शन करा.

५८. महाराणी व्हिक्टोरिया यांचें प्रजाप्रेम सोदाहरण व्यक्त करून दाखवा.

५९. सातवे एडवर्ड बादशहा यांनीं आपल्या राज्यारोहणप्रसंगीं कोणत्या चिरस्मरणीय देणग्या आपणांस दिल्या, त्या संक्षेपानें लिहा.

६० ‘ प्रजापक्षाचा अप्रतिमप्रतिकार ’ कोणत्या प्रसंगीं लोकनिदर्शनास आला.

६१. नामदार गोखले यांविषयीं ( १ ) बाबू रमेशचंद्र दत्त आय्. सी. एस्., सी. आय्. ई., यांनीं असें म्हटलें कीं, “ ते

हिंदुस्थानांत अद्वितीय होणार ! " ( २ ) लॉर्ड कर्झन साहेबांनीं यांस सी. आय्. ई. ही पदवी अर्पण करितांना, असे उद्गार काढिले कीं, " हिंदुस्थानांत असे देशभक्त अधिक निर्माण होतील, तर बरें ! " या दोन साक्षींचें महत्त्व कशांत आहे ?

६२. होळकरसरकारनीं राज्यत्याग कां केला ? त्यानंतर यांची सोय हिंदुस्थानसरकारनें काय केली ? त्यांच्या मागें राज्य-कारभार कोणाचे हातीं कसा आला ?

६३. ' भारतमहिलापरिषदे ' चें महत्त्व सारांशरूपानें द्या.

६४. ' हिंदी राष्ट्रीयसभे ' च्या अध्यक्षाचा मान अर्वाचीन महाराष्ट्राच्या वांट्यास केव्हां आला ? ती कामगिरी त्याकडून कितपत पार पडली ?

६५. ' राष्ट्रीय ' व ' नेमस्त ' या दोन पक्षांतील विरोध हा केव्हां परमावधीप्रत पोंचला ? त्यापासून काय निष्पन्न झालें ?

६६. ' मुंबईतील मजुरांच्या दंग्यां ' चा टिळकांवरील खट-ल्यांशीं अर्थाअर्थी संबंध असल्यास, त्याचें सोपपत्तिक विवेचन करा.

६७. रा० टिळक व नामदार गोखले यांची तुलना करून, तीपासून काय बोध घेण्यासारखा आहे तो लिहा.

६८. ' बादशहाच्या आगमना ' चें वर्णन करून, त्यापासून कोणता अलभ्य लाभ झाला तें थोडक्यांत लिहा.

६९. ' तुकोजी जयाजी असे थोर राजे
जयांचीं पदें सेविती-हेंचि साजे !–

भला लाट जाफत्त देई जयाला
असा साधु लाभे महाराष्ट्रभूला.
तुकारामवाणी, जटाधारी दास-
किती गाजले ते ! भले तेचि खास.
तरी शास्त्रपारंगतां इंग्रजांना
जया पाहुनी होय आनंद तोना ! '

ही उक्ति कोणास उद्देशून आहे त्याचें अल्पचरित्र द्या.

७०. पुढील वचन ज्या महाव्यक्तींस लागू पडत असेल, त्यांचा उल्लेख करा—

' धन्य तोचि विबुधमान्य शरण वासुदेवा ! '



# सूचीपत्र.



( पुढील उल्लेख पृष्ठसंख्येसंबंधीं आहे. )

थ



द



ध



न



प

र



ल



व



श

स



ह

# शुद्धिपत्र.



| पृष्ठ | पंक्ति. | अशुद्ध. | शुद्ध. |
|---|---|---|---|
| विस्तृत मुखपृष्ठ | ८ | ग्वालियर | ग्वॉलियर |
| बिरुदावलि | १८ | Renemebeed | Remembered |
| अर्पणपत्रिका | ९ | बल गणोन्नतिप्रद | बधुगणोन्नतिप्रद |
| १ | १५ | ३७५–३७६ वीं | सदर्हू आवृत्ति, भा० १ ला, प्र० ११ वें, ३७५–३७६ वीं. |
| २ | ६ | ब्रह्मवर्तास | ब्रह्मावर्तास |
| ३ | ९ | नोकरचाकरांची | नोकराचाकरांची |
| ,, | १८ | द्वेपी. | द्वेषी |
| ,, | २१ | अमत | असत |
| ,, | २३ | डोंगळेच | डेंगळेच |
| ६ | २० | पॉर्टिंजर | पॉटिंजर |
| ,, | १ | चॉप्लिन | चॅप्लिन |
| ,, | १७ | मराठ्याच्या | मराठ्यांच्या |
| ७ | ५ | नशिक | नाशिक |
| ,, | १४ | तत्कळ | तात्काल |
| १४ | १५ | अपातिम | अप्रातिम |
| ,, | १७ | पुरुप | पुरुष |
| ,, | २३ | वालीं | आली |
| ,, | ,, | संभापण | संभाषण |
| ,, | २६ | भा० रा | भा० २ रा |

| | | | |
|---|---|---|---|
| १७ | २ | १८७२–५७ | १८२७–५७ |
| ,, | १८ | ‘ मालकमचरित्र ’ | ‘ मालकमचरित्र व पत्रव्यवहार ’ |
| २० | २१ | खांद्याशीं | यांच्या खांद्याशीं |
| २१ | ५ | तर | तेव्हां |
| ,, | ८ | तत्काळ | तात्काळ |
| २२ | १५ | ल्यूज | ह्यूज |
| ,, | १८ | एलिफन्स्टनसाहेबांचा | १ एलिंफस्टनसाहेबांचा |
| ,, | २३ | १ कॉक्सकृत | कॉक्सकृत |
| २३ | ,, | १८५३ | १८५१ |
| २६ | ७ | झाशी | झांशी. |
| ,, | ११ | पगडा | नीतीचा पगडा |
| ,, | १५ | टीप २९ वी | टीप १ ली |
| ,, | २० | रेखांची, प्रस्तावना | लेखांची प्रस्तावना, |
| ३१ | १९ | आहे; | आहे: |
| ,, | २४ | चालू | चालू |
| ३२ | ३ | ——— | ——— |
| ३२ | ४ | नानानें | नानासाहेबांनीं |
| ,, | १६ | विष्णुभट | विष्णुभट्ट |
| ३५ | १३ | प्रांतात | प्रांतांत |
| ३६ | २२ | ११८९ | १८५७ |
| ३७ | १८ | बाइंची | बाईंची |
| ४० | ५ | बगलें | बुगुलें |
| ,, | १७ | दिसे. | दिसे |

| | | | |
|---|---|---|---|
| ४२ | ४ | हत्त्येपेक्षां | हत्येपेक्षां |
| ४४ | १७ | हुमनाबाद | हुमणाबाद |
| ४५ | २७ | चालूं | चालू |
| ४७ | ७ | गेळ्यांचा | गोळ्यांचा. |
| ,, | १४ | सावतवाडी | सावंतवाडी |
| ,, | २४ | कॉर्नक् | कारनॅक् |
| ४८ | १८ | दत्तविधानावर | दत्तविधानावर |
| ४९ | १३ | सतारच्या | सातारच्या |
| ५० | ७ | सातारचें | सातारचे |
| ५१ | २ | लोकप्रवृत्ति·सुखार्थ | लोकप्रवृत्ति सुखार्थ |
| ,, | ११ | दुसऱ्याच्या | दुसऱ्याचा |
| ,, | १९ | correspoudence | Correspondence |
| ५३ | १५ | १८३१ | १८७१ |
| ,, | १६ | उत्पाद | उत्पादक |
| ,, | १७ | ( बालबोध; दिसेंबर १८८४ ) | ( बालबोध, डिसेंबर १८८४ ) |
| ,, | २२ | चालूं | चालू |
| ५५ | १ | आहेत.— | आहेत— |
| ५६ | १ | त्या | या |
| ५७ | २१ | अंगांगीभाव | अंगांगिभाव |
| ५८ | १३ | उर्दू | उर्दूत |
| ५९ | १४ | आगोदरच | अगोदरच |
| ,, | ,, | अजूबाजूचे | आजूबाजूचे |
| ६० | १ | लुटालूट | दुकानांत लुटालूट |

| | | | |
|---|---|---|---|
| ६१ | ६ | आटपे | आपटे |
| ,, | १५ | आदितवार | अदितवार |
| ,, | २४ | आवृति, आ० | आवृत्ति |
| ,, | २६ | प० ५४–५७ | पृ० ५४–५७ |
| ६३ | ३ | महाराष्ट्र. | अर्वाचीन महाराष्ट्र |
| ,, | २२ | प० २०८ | पृ० २०८ |
| ६४ | ६ | ऐनजिनसा | ऐनजिनसी |
| ६५ | २ | धर्मादायावर त्यानें | धर्मादायावर |
| ,, | २० | दारोदार | दारोंदार |
| ६६ | १ | पाश्चात्त्य | पाश्चात्य |
| ,, | ११ | वाङ्मय सेवा | वाङ्मयसेवा |
| ६९ | २१ | thjs | this. |
| ,, | २२ | aasessment | assessment |
| ,, | २५ | *87th* March | *17th* March |
| ७० | १६ | सरकार देण्याचा | सरकार-देण्याचा |
| ७७ | २२ | कारभार | करभार |
| ७८ | ११ | आत्महत्त्या | आत्महत्या |
| ८० | ८३ | ७८ सर विलियम हंटर | सर विलियम हंटर ( पृ० ८१ तील ' सुधारणेच्या दिशे ' वरील टीप |
| ८२ | ८ | घरणें | धरणें |
| ८३ | ४ | गोहत्त्या | गोहत्या |
| ८५ | १७ | नादत | नांदत |
| ९२ | १७ | ब्राह्मण-क्रॉफर्ड | ब्राह्मण क्राफर्ड |

| | | | |
|---|---|---|---|
| ९३ | २३ | ८० त्यांचा हेतु | १ त्यांचा हेतु |
| ९६ | ९ | -व | व |
| ९७ | १० | सावंत. | सामंत |
| ९८ | १९ | Courage & | Courage |
| ,, | २१ | hrevadleut but | prevalent |
| ,, | २२ | Eradicafing | Eradicating |
| ,, | ,, | ( 1891 ) | ( 1891 ), |
| ९९ | २ | आय्. सी. एस् सी. एम्. जी | आय्. सी. एस्., सी. एम् जी., |
| ,, | ३ | आरोपि | आरोप |
| १०० | ५ | मामलेदासस | त्या मामलेदारास |
| १०१ | ६ | वर्षाचें | वर्षांचें |
| १०३ | १० | ' मद्यपाननिषेधावर | ' मद्यपाननिषेधा ' वर |
| १०५ | ११ | खुद्द | तर खुद्द |
| ११२ | ३ | ग्लॉडस्टन | ग्लॅडस्टन |
| ,, | १३ | नामदार | नेक नामदार |
| ११४ | ३ | इंतिहासकारानें | इतिहासकारानें |
| ११६ | ८ | त्यांस | त्यांत |
| ,, | २० | प्र० वें ( पृ० २२७वें) | ( पृ० २२७ वें ) |
| ११२ | २१ | पद्धति | जमीनमहसुलाची पद्धति |
| १२४ | ४ | या, | या |
| १२५ | १३ | पुढें—चौकशी | पुढें चौकशी |
| ,, | १४ | पिशुन वार्तेवरून | पिशुनवार्तेवरून |
| ,, | २० | वृत्तान्तात | वृत्तान्तांत |

| | | | |
|---|---|---|---|
| १२७ | १८ | ( मध्यन्तरीं ’ | [ मध्यन्तरीं |
| ,, | २२ | सूचनाहीं ’ | सूचना हीं |
| ,, | २४ | ‘ सत्संग ’ | १ ‘ सत्संग ’ |
| १२८ | ३ | पाश्चात्त्य | पाश्चात्य |
| १२८ | ६ | तारमास्तरांच्या | कंपनीनें तारमास्तरांच्या |
| १३१ | ८ | १८९७ | १८६७ |
| ,, | १३ | आंगच्या | अंगच्या |
| १३२ | २३ | तो | ती. |
| १३८ | २४ | Marh | March |
| १४० | ३ | राजपुत्रांच्या | राजपुत्राच्या |
| १५५ | २२ | एक | एकच |
| १६१ | ६ | व्हिंसेंट हे डेप्युटी साहेब कामिशनर | व्हिंसेंट हे डेप्युटी कामिशनर साहेब |
| १६३ | ११ | ‘येणेंकरून संतोष वाटतो !’ | ‘येणें करून संतोष वाटतो ! ( सदहू ‘ तीर्थयात्राप्रबंध ’ पृ० ८० वें पहा ) |
| १७३ | १४ | स्वभावचित्र | स्वभावचित्र |
| १७८ | १९ | निदर्शनास आला. | निदर्शनास आला ? |
| १७९ | ३ | काढिलें | काढिले |